मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीची पुस्तकमाला.

पुस्तक २८ वें.



# ऐतिहासिक स्त्रिया.

[ भाग १ ला. ]



---

लेखक

श्रीयुत दिनकर सखाराम वर्दे, बी. ए. एल्एल्. बी.

---

द्वितीयावृत्ति.

---

प्रकाशक.

मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी,

गिरगांव-मुंबई.

---

किंमत ०-१२-० ]  [ आगस्ट, १९२१.

# अनुक्रमणिका.

---



---

# लेखकाचे दोन शब्द.

इतिहासविषय मला आवडत असल्यामुळें या विषयावरील जे कांहीं ग्रंथ माझ्या वाचण्यांत आले त्यांत थोर पराक्रमी स्त्रियांविषयीं कमी-अधिक विस्तारानें वारंवार उल्लेख आले. अशा स्त्रियांचीं कांहीं चरित्रेंहि वाचण्यांत येऊन गेलीं. प्रस्तुत पुस्तकासारखें एखादें पुस्तक लिहावें असें कधीं कधीं मनांत येई, परंतु तो विचार कायम टिकत नसल्यामुळें नुसतीं टिपणेंहि जेव्हांच्या तेव्हां करून ठेवण्याचें काम झालें नाहीं.

श्रीयुत काशिनाथ रघुनाथ मित्र यांच्या आग्रहामुळें हा प्रयत्न माझ्या हातून झाला आहे. नित्याच्या कामांचा नेट जास्त असल्यामुळें वाचलेल्या पुस्तकांपैकीं पुष्कळ पुस्तकें परत पाहण्यास मिळालीं नाहींत. तथापि ज्या गोष्टी नमूद केल्या आहेत त्या आधार पाहून घातलेल्या आहेत. संशय वाटला तेथें एल्फिन्स्टन, टॉड, ग्रांट डफ आणि फेरिस्ता यांचे ग्रंथ पाहावे लागले. मि. जॉन पूल यांनीं 'Women's influence in the east झणून जें पुस्तक लिहिलें आहे त्याचा उपयोग मला पुष्कळ झाला. तसेंच श्रीयुत कृष्णराव अर्जुन केळुसकर यांनीं लिहिलेलें छत्रपति शिवाजीमहाराज यांचें चरित्र जिजाबाईचें चरित्र लिहितांना माझ्या पुष्कळ उपयोगीं पडलें. या सर्व ग्रंथकारांचा मी अत्यंत ऋणी आहें.

पुस्तक निर्दोष असेल असें मला मुळींच वाटत नाहीं; झणून यांत असलेले दोष कोणीं कळविल्यास त्यांचे उपकार होतील.

मुंबई, जून १९०७. लेखक.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

कोणत्याहि राष्ट्राच्या मदतीस त्या राष्ट्रांतील माणसाचे गुण हेंच मुख्यांतलें मुख्य कारण आहे; आणि चांगल्या गुणाचा उगम मातृशिक्षणाच्या प्रभावानें जसा होतो, तसा तो इतर शिक्षणानें होत नसतो, हेंहि निर्विवाद आहे. जशा आया तशीं मुलें, हा नियम सर्व स्थळीं आणि सर्व काळीं सारखाच दृष्टीस पडतो. आद्यस्नेही, आद्यगुरु आणि आद्यदैवत या सर्वांचा अंतर्भाव मातेमध्येंच होत असल्यामुळें मातृस्तन्यानें जसें शरीराचें पोषण होतें, तसेंच मातृशिक्षण आणि मातृस्वभाव यांच्या योगानें मुलांच्या अंत:करणांस आणि मनांस विवक्षित दिशा मिळून त्या दिशेनें त्यांचीं मनें आणि अंतःकरणें परिपक्व होत जातात. पुढें तारुण्यदशा प्राप्त झाल्यावर पुरुषाच्या आयुष्यक्रमावर स्त्रीसहवासाचा परिणाम अत्यंत महत्वाचा होत असतो. सारांश, ज्यांच्या योगानें राष्ट्रांची स्थापना, स्थिति आणि लय हीं घडून येतात, असे गुण, स्त्री आणि पुरुष यांच्या अत्यंत निकट संबंधापासूनच निर्माण होतात, व हे गुण ज्या मानानें राष्ट्राच्या परिस्थितीस अनुकूल असतील त्या मानानें राष्ट्राची भरभराट होत असते. प्रतिकूल परिस्थितीस आपल्या ताब्यांत आणण्यास जे गुण आवश्यक असतात त्या गुणांची प्राप्ति करून घेणें, हाच स्त्रीपुरुषांच्या शिक्षणाचा मुख्य हेतु आहे.

राष्ट्रांची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं त्या त्या राष्ट्रांतील स्त्रीपुरुषांच्या गुणदोषांमुळेंच घडून येत असतात. ज्या मानानें पुरुष त्या मानानें—किंबहुना, त्याहूनहि जास्त—स्त्रिया आपले स्वभाव आणि कृति यांच्या योगानें राष्ट्राचा इतिहास बनवितात. क्रियासिद्धीस आव-

श्यक असलेलें सामर्थ्य पुरुषांकडे जितकें असतें तितकें तें स्त्रियांकडे नसतें. आणि त्यामुळेंच राष्ट्राच्या घडामोडींत स्त्रियांपेक्षां पुरुषांचा प्रत्यक्ष संबंध पुष्कळच दिसून येतो. परंतु सत्क्रियेला प्रोत्साहन देण्याचें काम पुष्कळ अंशीं स्त्रियांकडेच असतें व त्यांचा संबंध अप्रत्यक्ष जरी असला तरी तो पुरुषांच्या संबंधापेक्षां जास्त महत्वाचा असतो. असें जरी आहे, तरी अनेक महत्वाच्या प्रसंगीं हीं दोनहि कामें आपल्याकडे घेऊन जगाच्या इतिहासांत ज्यांनीं चिरस्थायी कीर्ति संपादन केली आहे अशा पुष्कळ स्त्रिया प्रत्येक देशांत होऊन गेल्या आहे; इतकेंच नव्हे, तर आपल्या गुणांनीं आणि कर्तबगारीनें राष्ट्राच्या सुधारणेचें काम प्रत्यक्षपणें हातीं घेऊन तें रंगारूपास आणीत असलेल्या स्त्रिया आजहि विद्यमान आहेत.

हिरे, माणिक, पाच, इंद्रनीळ वगैरे मौल्यवान रत्नें खाणींत सांपडतात; परंतु इतिहास ही खाण निराळ्या प्रकारची आहे.' हिऱ्यांच्या खाणींत हिरेच सांपडावयाचे; त्याचप्रमाणें इतर मौल्यवान् रत्नांच्या खाणींत एकाच प्रकारचीं रत्नें सांपडावयाचीं. इतिहासाच्या खाणींत जीं रत्नें सांपडतात तीं निरनिराळ्या तेजाचीं असतात. ' आपल्यास एकाच प्रकारचीं हवींत तर तीं आपण निवडून घ्यावीं. परंतु तशीं निवडूनसुद्धां एक दुसऱ्यासारखें अगदीं बरोबर मिळेलच, असें नाहीं. एकामध्यें एका विशिष्ट गुणाचें तेज अधिक तर दुसऱ्यामध्यें त्या गुणाचा प्रकाश कमी, पण दुसऱ्याच एखाद्या गुणाची प्रभा जास्त असावयाची. कोठें पातिव्रत्य जास्ती, तर कोठें हिंमत, महत्वाकांक्षा हे गुण अधिक प्रमाणानें दिसून येतील. कोठें स्वामिभक्ति विशेष प्रकाशित असेल तर कोठें देशभक्तीचें तेज जाज्वल्य पहावयास मिळेल. सारांश, कोणत्याहि एखाद्या विशिष्ट गुणाच्या कामीं अधिक वर्चस्वा-

मुळें त्या त्या स्त्रीचा अगर पुरुषाचा इतिहासावर परिणाम झालेला आढळून येईल. ह्मणूनच सर्व इतिहासप्रसिद्ध स्त्रिया आणि पुरुष आपल्या गुणांच्या श्रेष्ठत्वानें स्मरणीय व उदाहरणीय असे होऊन गेले आहेत.

सीतेचें पातिव्रत्य आणि रामाचें पत्निप्रेम यांच्या योगानें रामायण बनलें. कुंतीचें पुत्रवात्सल्य आणि द्रौपदीची कर्तव्यनिष्ठा हीं भारताचीं मुख्य अंगें आहेत. जिजाबाईसारख्या मातुःश्रीचा लाभ शिवाजीला झाला ह्मणूनच महाराष्ट्राच्या पातशाहीची प्राणप्रतिष्ठा झाली. अलेक्झांडर बादशहास त्याच्या आईनें जें शिक्षण दिलें त्याचा परिणाम आरिस्टॉटलच्या शिक्षणाहूनहि जास्त झालेला असा आपण पाहतों. नेपोलियनाला आपल्या आईपासून जें शिक्षण मिळालें तोच त्याच्या पुढील चरित्राचा पाया झाला. आल्फ्रेड धि ग्रेट, पीटर धि ग्रेट वगैरे नामांकित राष्ट्रसंस्थापक, त्यांना मिळालेल्या मातृशिक्षणामुळेंच नांवा-लौकिकास चढले.सारांश, अप्रत्यक्षपणें राष्ट्राच्या इतिहासास कारणीभूत झालेल्या या थोर स्त्रियांसारखीं पुष्कळ उदाहरणें इतिहासांत जशीं आढळून येतात, तशींच आपल्या चातुर्यानें, शौर्यानें आणि कर्तव्य-निष्ठेनें जातीनें पराक्रम गाजविलेल्या अशा थोर स्त्रियांचीं अनेक उदा-हरणें सर्व देशांच्या इतिहासांत आढळून येतील.

वरील त्रोटक विवेचनावरून राष्ट्राच्या इतिहासांत स्त्रियांचें महत्व किती आहे, हें सहज दिसून येईल. ज्या थोर स्त्रियांनीं आपल्या गुणांनीं, आणि कर्तबगारीनें आपापल्या राष्ट्राच्या इतिहासास शोभा आणि महत्व आणलें आहे, त्यांची थोडीशी ओळख आमच्या महाराष्ट्र भगिनी वाचकांस करून द्यावी या हेतूनें आमच्या, त्याचप्रमाणें परदेशच्याहि इतिहासप्रसिद्ध थोर स्त्रियांचीं त्रोटक चरित्रें या पुस्तकांत प्रसिद्ध कर-ण्याचें आह्मीं योजिलें आहे.

पुराणप्रसिद्ध अशा थोर स्त्रियांचा परिचय आमचे पुराणग्रंथ आणि कथा यांच्या द्वारें आमच्या भगिनीवर्गास अगोदरच थोडाबहुत झालेला आहेच. ह्मणून प्राचीन इतिहासाकडे न वळतां अर्वाचीन इतिहासाच्या खाणींत प्रवेश करून जीं स्त्रीरत्नें आमच्या दृष्टीस पडतील त्यांचा हार गुंफून तो आमच्या प्रिय भगिनींस सप्रेम अर्पण करण्याचा मानस आहे.

आमच्या देशाचा अर्वाचीन इतिहास हिंदू आणि मुसलमान या दोन जातींच्या लोकांनीं बनविलेला असल्यामुळें दोनहि जातींतील इतिहास-प्रसिद्ध स्त्रियांचीं चरित्रें देण्याचा आमचा मानस आहे. एकमेकांच्या ऐतिहासिक स्त्रीपुरुषांच्या ओळखीनें एकमेकांविषयीं आदर वृद्धिंगत होतो, आणि सध्याच्या स्थितींत तर अशा ओळखीची विशेष जरूरहि आहे. मागील इतिहासाच्या अभ्यासानें आमच्या पूर्वजांच्या अंगच्या गुणांचें आह्मांस सदोदित स्मरण राहील आणि त्यांच्या हातून ज्या चुका झाल्या असतील त्याहि आमच्या स्मरणांतून कधीं जावयाच्या नाहींत.

गिरगांव, मुंबई.
जून १९०७.

प्रकाशक.

## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

पहिल्या आवृत्तीप्रमाणेंच ही दुसरी आवृत्ति छापली आहे.

गिरगांव, मुंबई.
आगस्ट १९२१.

प्रकाशक.

# ऐतिहासिक स्त्रिया



## वीरपत्नी ताराबाई

अन्हलवाडा येथें राज्य करीत असलेले महाविख्यात बल्हार राजे यांचा वंशज, आणि सोळंकी कुळांत जन्मास आलेला बिडोरचा राणा राव सूरनाथ, त्याची ताराबाई ही कन्या होय. अफगाण सरदारांनीं बल्हार राजांस अन्हलवाडा येथून तेराव्या शतकांत हांकून लावल्यानंतर ते मध्यहिंदुस्तानांत गेले व तेथें टंकथोदा शहर आणि आसपासचा प्रदेश यांच्यावर आपला अंमल बसवून त्या ठिकाणीं राज्य करून राहिले. राव सूरनाथास तर सिला नामक एका बलाढ्य अफगाण सरदारानें तेथूनहि हांकून लावलें. याप्रमाणें आपल्या पूर्वजांचें राज्य बलिष्ठ शत्रूनें आपल्यापासून हिरावून घेतल्यामुळें राव सूरनाथ तेथून निघाला आणि मेवाड प्रांतांत अरवली डोंगराच्या पायथ्याशीं बिडोर येथें जाऊन राहिला.

सोळाव्या शतकाच्या आरंभीं अफगाण लोकांनीं या घराण्यावर जे हल्ले केले, त्या हल्ल्यांच्या धामधुमीच्या वेळीं ताराबाईचा जन्म झाला. ताराबाई जसजशी मोठी होऊं लागली, तसतसा तिला तिचा बाप आपल्या पराभवाच्या गोष्टी विशेष विस्तारानें सांगूं लागला व तीहि त्या गोष्टी विशेष उत्सुकतेनें कान देऊन ऐकत असे. तिची ती उत्सुकता पाहून, ही मुलगी न होतां जर मुलगा होता तर कितीतरी चांगलें झालें असतें, असें राव सूरनाथास वाटे. अशाच स्वभावाचा

व एवढ्या वयाचा आपणास मुलगा असता, तर लवकरच तो युद्ध-विद्येंत निपुण होऊन शत्रूपासून आपलें राज्य फिरून जिंकून घेण्याच्या कामीं त्याच्या तरवारीची आपणांस पुष्कळ मदत झाली असती, असें वारंवार त्याच्या मनांत येई व आपल्या खडतर भवितव्यतेविषयीं तो वारंवार दुःख करीत असे. त्या वेळच्या इतिहासावरून ताराबाईच्या आईविषयीं कांहींच माहिती मिळत नाहीं. यावरून ही मुलगी जन्मतांच, किंवा पुढें थोड्या दिवसांनीं, राव सूरनाथाची पत्नी इहलोक सोडून गेली असावी, असें अनुमान निघतें. अशी स्थिति असल्यामुळें ताराबाईस लहानपणीं सर्व शिक्षण बापाकडूनच मिळालें. अर्थात् तें राजकन्येपेक्षां राजपुत्रास जसें मिळावें तशाच प्रकारचें मिळालें होतें.

आपल्या कन्येच्या अंगचा तेजस्वीपणा पाहून राव सूरनाथास मोठा अभिमान वाटे. राजपुत्रास योग्य अशा सर्व प्रकारच्या खेळांची त्यानें तिला गोडी लावली होती. धनुष्य कसें धरावें, बाण कसा लावावा, नेम कसे मारावे, भाला कसा फेंकावा, वगैरे सर्व लष्करी कसब तिला शिकविलें होतें. शिवाय, स्त्रीजातीस योग्य असें घरगुती व्यवस्थेचेंहि शिक्षण तिला दिलेलें होतें. घराबाहेर मोकळ्या हवेंत शिपाईबाण्याचे खेळ खेळत असतां तिला नेहमीं जो व्यायाम होत असे, त्याच्या योगानें तिचा बांधा सुदृढ होऊन तिची अंगकांति सतेज आणि सुंदर अशी बनली होती. ताराबाईच्या वयास चौदा वर्षें झालीं तेव्हांच तिनें आपला स्त्रीजातीचा पोषाख आणि व्यवसाय सोडून दिला आणि आपल्या बापाच्या एखाद्या सरदाराप्रमाणें पोषाखाची पद्धत सुरू ठेवली. ती उत्तम रीतीनें घोड्यावर बसण्यास शिकली, इतकेंच नव्हे, तर घोडा भरधांव जात असतां नेमावर बिनचूक बाण टाकण्यांत तिचा हातखंडा असे.

राव सूरनाथानें आपलें राज्य अफगाणलोकांपासून मिळविण्यासाठीं पुष्कळ वेळ प्रयत्न केले, तथापि त्यांत त्याला यश आलें नाहीं; परंतु आतां आपली एकुलतीएक तथापि शूर आणि बाणेदार मुलगी प्रौढ झाली असून पुन: एकवार चाल करून गेल्यास लढाईंत होणारा त्रास आणि संकट सहज सोसण्याइतकें सामर्थ्य तिच्या अंगीं आलें आहे असें जेव्हां त्याला वाटलें, तेव्हां त्यानें मोठ्या निश्चयानें लढाईची तयारी केली. ताराबाई एका खंद्या काठेवाडी घोड्यावर स्वार झाली आणि हातांत धनुष्य, पाठीवर भाता आणि कमरेस तरवार अशा शिपाई वेषानें ती बापाबरोबर युद्धास निघाली. ही मोहीम लहानशीच होती, तथापि ताराबाईनें तींत आपलें शौर्य आणि पराक्रम हीं चांगलींच गाजविलीं. दुर्दैवानें तिच्या शौर्याचा राव सूरनाथास कांहीं उपयोग होऊं दिला नाहीं. पुन: अफगाण सैन्य विजयी झालें आणि राव सूरनाथास पराभूत होऊन कन्येसहवर्तमान मागें फिरावें लागलें. इतकें झालें, तरी बाप आणि मुलगी या दोघांनीं आपला धीर सोडला नाहीं. त्यांनीं आपल्या सैन्यांत पुन: भरती केली, आणि सुदैवाचा दिवस उजाडतांच या आपल्या प्रयत्नास पुन: सुरुवात करावी, अशा बेतानें तीं वाट पाहत राहिलीं.

ताराबाई आपल्या पित्यासहवर्तमान बिडोरसारख्या लहानशा शहरांत जरी रहात असे, तरी तिच्या सौंदर्याची आणि शूरपणाची कीर्ति राजपुतान्यांत सर्वत्र पसरली होती. दूर देशचे तरुण राजे आणि सरदार यांनीं तिच्याबद्दल मागण्या घातल्या. या तरुण राजेरजवाड्यांत मेवाडचा राणा रायमल्ल याचा तिसरा मुलगा जयमल्ल हाहि एक होता. हा राजपुत्र शूर परंतु आग्रही स्वभावाचा होता. जयमल्लानें ताराबाईस वरण्याची आपली इच्छा राव सूरनाथापाशीं

प्रकट करतांच "टंकथोदा शहर शत्रूपासून घेऊन तेथें माझ्या पित्याची स्थापना करावी; मग आपणास वरण्यास मी सिद्ध होईन," असा निश्चयाचा जबाब ताराबाईनें त्याला पाठविला. जयमल्लानेंहि ही अट कबूल केली; परंतु सैन्य वगैरे जमविण्याच्या खटपटीस न लागतां तो बिडोर येथील राजवाड्याजवळ आळसानें पडून राहिला.

ताराबाईची प्रत्यक्ष गांठ घेऊन तिला आपलीशी करावी या उत्कट इच्छेनें, आपण कबूल केलेली अट पुरी केली नाहीं ही गोष्ट मनांत न आणतां बेफाम होऊन जयमल्ल एके दिवशीं तिच्या दरवाज्याजवळ गेला. हा असा बेशरमपणें आपल्या मुलीच्या दरवाज्याजवळ आला आहे व आतां आंत प्रवेश करणार असें राव सूरनाथानें पाहतांच तो अत्यंत क्रोधायमान होऊन त्यानें आपल्या तरवारीनें तेथच्या तेथें त्याला ठार केला.

रजपूतलोकांत अशा प्रकारचें कृत्य ह्मणजे कुटुंबकलहाचें एक कारण होत असे; इतकेंच नव्हे तर कितीएक वर्षे न विझणारा असा युद्धाग्नि याच्या योगानें प्रज्वलित होई; परंतु मेवाडचा राणा रायमल्ल हा विचारी असल्यामुळें, पुत्राच्या वधाचा सूड घेण्याविषयीं त्याच्या पदरच्या लोकांनीं त्याला आग्रह केला असतांहि त्यांचें ह्मणणें त्यानें मुळींच मनावर घेतलें नाहीं. उलट, राव सूरनाथासारख्या वृद्ध, कुलीन आणि संकटांत सांपडलेल्या गृहस्थाची अब्रू घेण्याचा आपल्या मुलानें प्रयत्न केल्यामुळें त्याला यथायोग्य प्रायश्चित्त मिळालें, असेंच त्यानें ह्मटलें. पुढें, 'ताराबाई आपणास वरण्यास सिद्ध असेल तर जें जयमल्लाकडून झालें नाहीं तें आपण करूं,' असें अभिवचन त्याचा भाऊ पृथ्वीराज यानें दिलें. या पृथ्वीराजाच्या शौर्याची कीर्ति त्या वेळेपासून आजपर्यंत राजपुतान्यांत एकसारखी दुमदुमत आहे.

राणा रायमल्ल याला जयमल्ल, पृथ्वीराज आणि संग असे तिघे बलवान्, प्रतापी आणि शूर असे पुत्र होते. यांचा आपापसांत जर कलह नसता, तर मेवाडचें राज्य त्या तिघांच्या सामर्थ्यानें पुष्कळच ऊर्जितदशेस आलें असतें. हे तिघे भाऊ आणि त्यांचा चुलता सुराजमल्ल या चौघांचें एके दिवशीं खोल खलबत चाललें. रायमल्लाच्या पश्चात् मेवाडच्या गादीवर कोण बसणार, या विषयींचेंच हें खलबत होतें. हा विचार चालला असतां पृथ्वीराजानें मेवाडचें राज्य आपल्याच नशिबांत असल्याविषयीं बाकीच्यांस सांगितलें; परंतु त्यांना तें पटलें नाहीं. त्यांचा विचार असा झाला, कीं, आपण सर्वांनीं मिळून चारुणीदेवीच्या देवळांत जावें, आणि देवीच्या पुजारणीकडून कोणाच्या नशिबांत काय आहे याचा उलगडा करून घ्यावा. हें देऊळ उदेपूरच्या पूर्वेस दहा मैलांवर आहे.

हे चारहि इसम त्या ठिकाणीं जाऊन देवळाच्या भगतिणीच्या घरीं गेले. पृथ्वीराज आणि जयमल्ल प्रथम आंत गेले आणि एका आसनावर बसले. मागाहून राजपुत्र संग आला. तो जवळच पडलेल्या व्याघ्रांबरावर बसला आणि सुराजमल्ल त्याच्याजवळ त्या व्याघ्रांबरावर गुढघा टेंकून बसला. पृथ्वीराजानें भगतिणीस आपल्या येण्याचा उद्देश सांगतांच तिनें व्याघ्रांबराकडे बोट दाखविलें, व जो त्याच्यावर बसला आहे त्याला राज्य मिळून ज्यानें गुडघा टेंकला आहे त्याला त्या राज्याचा थोडासा अंश मिळेल, असें सांगितलें; परंतु पृथ्वीराजाची खात्री झाली नाहीं. त्या बाईचें भविष्य खोटें पाडावें ह्मणून त्यानें आपला भाऊ संग याला तेथच्या तेथें ठार मारण्याच्या उद्देशानें आपली तरवार म्यानांतून सर्रकन् बाहेर काढली. सुराजमल्लानें पृथ्वीराजाचा तो बेत ओळखून त्याच्या तरवारीचा वार संगावर बस-

णार इतक्यांत तो पुढें झाला. पुढें जी झटपट झाली, तींत सुराजमल्लास जबर जखम झाली; परंतु त्यानें पृथ्वीराजासहि जायबंदी केलें. पृथ्वीराजाच्या तलवारीनें झालेल्या पांच जखमांनिशीं राजपुत्र संग देवळाबाहेर निसटला. एक बाण डोळ्यांत शिरून त्याच्या योगानें त्याचा डोळा कायमचा गेला. संग पळत असतां पृथ्वीराजाचें अपुरें राहिलेलें काम आपण पुरें करावें ह्मणून जयमल्ल त्याच्यामागून धावला; परंतु संग त्याच्या हातीं लागला नाहीं. पुढें पुष्कळ वर्षें या भावांच्या भीतीनें तो अज्ञातवासांत राहिला व अखेरीस भगतिणीनें सांगितलेल्या भविष्याप्रमाणें मेवाडचें राज्य त्यालाच मिळालें.

ताराबाईची प्राप्ति करून घेण्यासाठीं जयमल्लानें जें उतावळपणाचें व अविचाराचें वर्तन केलें त्यामुळें तो आपल्या प्राणास कसा मुकला तें वर सांगितलेंच आहे. देवळांतल्या भांडणांत झालेल्या जखमा बऱ्या झाल्यावर पृथ्वीराजानें ताराबाईच्या प्राप्तीची खटपट केली. जयमल्लापेक्षां अब्रूची चाड त्याला जास्त होती व त्यामुळें या खटपटींत त्याला यश येण्याचा संभव जास्त होता.

पृथ्वीराजानें बिडोर येथें जाऊन आपलें मनोगत ताराबाईस कळवितांच तिनें जयमल्लास जो जबाब दिला होता तोच पृथ्वीराजास दिला. पृथ्वीराजाची सर्वांच्या तोंडीं झालेली कीर्ति, त्याचा बाणेदारपणा, त्याचें अनुपम शौर्य आणि त्याचें अद्वितीय सौंदर्य या गुणांनीं मोहित झालेल्या ताराबाईनें या वेळीं दिलेला जबाब अगदीं मनापासून दिला होता. तिचें मन या शूर, तरुण राजबिंड्यावर पूर्णपणें बसलें असल्यामुळें आपला इच्छित कार्यभाग यांच्या हातून तडीस केव्हां जातो आणि लग्नाची माळ केव्हां पडते, असें तिला होऊन गेलें होतें. 'मी थोडा शहर मिळवून देईन; हें काम माझ्या हातून

झालें नाहीं तर मी खऱ्या रजपूतबीजाचाच नव्हें,' असे निकराचे शब्द पृथ्वीराजाच्या तोंडून निघालेले तिच्या जेव्हां कानीं पडले तेव्हां तिला पराकाष्ठेचें समाधान झालें. बोललेले शब्द खरे करण्याची हिंमत आपल्या भावी वराच्या अंगीं भरपूर आहे अशी तिची खात्री असल्या-मुळें पृथ्वीराजाविषयीं तिला मोठा अभिमान वाटला.

टंकथोदा शहरावर छापा घालून तें काबीज करण्याचा बेत तर ठरलाच. मोहरमच्या सणाच्या दिवशीं शहरांत जी गडबड उडेल त्या गडबडींत आपण आपला बेत साधावा, अशी पृथ्वीराजानें मसलत करून पांचशें सड्या स्वारांनिशीं तो या मोहिमेवर निघाला. त्याच्या-बरोबर वीरपत्नी ताराबाईहि निघाली. पृथ्वीराजाच्या प्रतिज्ञेप्रमाणें टंक-थोदा शहर घेऊन राव सूरनाथाची त्याच्या वडिलांच्या गादीवर स्थापना केल्यानंतरच त्या दोघांचा विवाहविधि व्हावयाचा असें जरी ठरलें होतें, तथापि ताराबाईनें त्याला मनानें आधींच वरलें असल्यामुळें आपल्या प्रिय पतीची कीर्ति आणि संकटें यांत आपण भागीदार व्हावें, या इच्छेनें त्याच्याबरोबर या मोहिमेवर आपण जाणार, असा तिनें आग्रहच धरिला. आपल्या प्राणप्रियेचें शौर्य आणि तिचा निर्धार हीं पाहून पृथ्वीराजानेंहि ती गोष्ट कबूल केली. ताबूद शहराच्या चौकांत नेऊन ठेवतात न ठेवतात इतक्यांत पृथ्वीराज आणि ताराबाई टंक-थोदा येथें जाऊन पोहोंचलीं.

पृथ्वीराज, ताराबाई आणि त्यांचा एक विश्वासू आणि निधड्या छातीचा स्वार अशा तिघांनीं शहरांत प्रवेश करून तीं तिघें ताबू-दाच्या घोळक्यांत शिरलीं. तेथील अफगाण सरदार आपल्या वाड्याच्या गच्चीवर पोषाख चढवीत होता. पोषाख चढवून झाल्यावर तो खालीं उतरणार आणि ताबूदांबरोबर असलेल्या मंडळींत सामील होणार,

इतक्यांत एक गोष्ट अचानक घडून आली. त्या सरदारानें गच्चीवरून हीं घोळक्यांत शिरलेलीं तीन परकी माणसें पाहतांच चौकशी करण्यासाठीं तो आपल्या अंमलदाराकडे वळतो न वळतो तोंच पृथ्वीराजानें खालून फेंकलेला भाला त्याच्या अंगांत घुसला आणि लगेच ताराबाईच्या हातच्या धनुष्यापासून मोठ्या वेगानें सुटलेला एक बाण त्याच्या छातींतून आरपार निघून गेला ! अफगाण सरदार उभा होता तेथेंच गतप्राण होऊन पडल्यानंतर मोठीच धांदल उडाली, आणि जो तो या परकी माणसांचा शोध करूं लागला. पृथ्वीराज, ताराबाई आणि त्यांच्याबरोबरचा स्वार अशीं तिघेंहि तेथून तेव्हांच निसटून आपल्या सैन्यास जाऊन मिळण्यासाठीं शहरच्या वेशीजवळ येऊन पहातात तर तेथें हत्तीचा पहारा असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. आतां कसें करावें या विचारांत तीं तिघेंहि पडलीं. परंतु ताराबाईचें प्रसंगावधान विलक्षण असल्यामुळें तिनें क्षणाचाहि विलंब न लावतां आपल्या कमरेस असलेला निमचा उपसून त्यानें त्या हत्तीची सोंडच उतरली. हत्ती चींचीं करीत बाजूस सरतांच तिघेंहि दरवाज्यांतून बाहेर पडून मोठ्या त्वरेनें आपल्या सैन्यांत जाऊन पोहोंचलीं.

सैन्यांत जाऊन पोहोंचल्यावर त्यांनीं तसाच शहरावर एकदम हल्ला चढविला. पृथ्वीराजाजवळचे स्वार निवडक असल्यामुळें त्यांतील दरएक स्वार ह्मणजे शूर योद्धाच होता. त्यांत ताराबाईसारखी जातीनें लढत असलेली शूर स्त्री ह्मणजे राक्षसांचा संहार करण्यास प्रत्यक्ष अवतरलेल्या भवानीसारखी तेजःपुंज दिसत होती. तिच्या शौर्यानें आणि हिंमतीनें प्रत्येक स्वाराचें शौर्य कैकपटीनें वृद्धिंगत झालें. या छोटेखानी परंतु हातावर शीर घेऊन लढत असलेल्या सैन्यासमोर अफगाण सैन्याचें कांहीं चालेनासें होऊन ते लोक शहर सोडून पळून

गेले जे शहरांत सांपडले त्यांची कत्तल झाली. आपला पूर्वीचा राजा आणि त्याची रणशूर कन्या पूर्ववत् आपल्या नगरांत येऊन राज्य करणार हें पाहून प्रत्येक नागरिकास अत्यंत आनंद झाला. राव सूरनाथ नगरांत प्रवेश करतांच नागरिकांनीं आनंदातिशयानें जो जयघोष केला त्यानें सर्व दिशा दणाणून गेल्या.

राव सूरनाथाची गादीवर पुनः स्थापना झाल्यानंतर लौकरच पृथ्वीराज आणि ताराबाई यांचा मोठ्या थाटानें विवाह झाला. दोघांचीं अंतःकरणें एकमेकांमध्यें पूर्णपणें प्रतिबिंबित झालीं होतीं. रूप आणि गुण यांनीं परस्परांस अत्यंत अनुरूप असें पृथ्वीराज आणि ताराबाई यांच्यासारखें जोडपें त्या वेळीं अन्यत्र क्वचित्च सांपडलें असतें. लग्न झाल्यावर या दांपत्यानें एकमेकांच्या सहवासांत टंकथोदा येथें मोठ्या आनंदानें कांहीं काळ घालविला आणि आपल्या वृद्ध पित्यास फिरून प्राप्त झालेल्या राज्याची व्यवस्था लावण्याच्या कामीं ताराबाईनें त्याचप्रमाणें पृथ्वीराजानेंहि पुष्कळ मदत केली.

टंकथोदा शहरांत पूर्ववत् शांतता नांदूं लागल्यावर पृथ्वीराज आणि ताराबाई या उभयतांस पुनः समरांगणावर पराक्रम करण्याची अनिवार इच्छा उत्पन्न झाली, ह्मणून मेवाड येथें जाऊन तेथें कशी काय व्यवस्था चालली आहे तें पहावें, या हेतूनें तीं दोघेंहि तिकडे जाण्यास निघालीं. पृथ्वीराज मेवाड येथें जाऊन पोहोंचल्यावर आपला पिता रायमल्ल हा मोठ्या पेंचांत सांपडल्याचें त्याला दिसून आलें. त्याचा चुलता सुराजमल्ल यास पुजारणीनें मेवाडच्या राज्याचा कांहीं भाग मिळेल असें भविष्य सांगितलें असल्याचें आमच्या वाचकांस पूर्वी कळलें आहेच. राज्याचा कांहीं अंश आपणास मिळेल असें जें तिनें सांगितलें तें खरें नसून सर्वच राज्य आपणास मिळेल असें सुराज-

मल्लास वाटल्यावरून तो सर्व राज्य बळकावण्याच्या हेतूनें राजद्रोही खटपटींत गुंतला होता. पृथ्वीराज आणि त्याची पत्नी तेथें गेलीं त्या वेळीं त्याचा सर्व घाट जमून आलेला होता.

माळव्याचा सुलतान आणि इतर सरदार यांची मदत घेऊन त्यानें बंडाचें निशाण उभारलें आणि सैन्यानिशीं रायमल्लावर स्वारी केली. रायमल्लानें आयत्या वेळीं जमा झालें तितकें सैन्य जमवून लढाईस तोंड दिलें. परंतु विजयश्रीचा रंग उलट बाजूस दिसूं लागल्यामुळें त्याची पांचांवर धारण बसली. इतक्यांत पृथ्वीराज आपल्या शूर स्त्रीसहवर्तमान एक हजार स्वारांनिशीं आपल्या पित्याच्या सैन्यास जाऊन मिळाला, आणि मोठा पराक्रम करून त्यानें त्याचें सर्व पारडें थोडक्याच वेळांत फिरविलें. ताराबाईनें तर त्या वेळीं अपूर्वच पराक्रम केला. प्रतिपक्षाचे कसलेले योद्धे तिच्या तरवारीच्या तडाख्यांनीं घोड्यांवरून खालीं येत होते व असे तीव्र तडाखे केवळ अबलेच्या कोमल हातानें आपल्या सदृढ शरीरावर पडत आहेत या गोष्टीवर त्यांचा विश्वास बसेना. तिच्या तलवारीनें जितके लोक स्वर्गलोकीं पाठविले त्यांच्यापेक्षां तिचे तेजःपुंज नेत्र आणि सौंदर्यविकसित मुखकमल यांच्याकडे पाहून कितीतरी शूर आश्चर्यानें जागच्याजागीं स्तब्ध होऊन राहिले.

या दिवसाची लढाई आटपल्यानंतर जी एक गोष्ट घडून आली तीवरून त्या वेळीं रजपूतलोक क्षात्रधर्म किती उत्तम रीतीनें पाळीत असत, तें दिसून येतें. लढाईनंतर पृथ्वीराज आपल्या चुलत्यास भेटावयास गेला. 'ही भेट ह्मणजे युद्धशास्त्राच्या इतिहासांत मोठी अजब गोष्ट होय!' असें जें ग्रंथकार टॉड ह्मणतो, तें सर्वथैव खरें आहे. सुराजमल्लास लढाईंत जबर जखमा झाल्या होत्या, व या जखमा त्याच्या पुतण्याच्या—पृथ्वीराजाच्याच तलवारीनें झाल्या होत्या. तथापि

रात्रीं जेव्हां पृथ्वीराज त्याला भेटण्यासाठीं त्याच्या तंबूत गेला, तेव्हां सुराजमल्लानें स्वतः उठून त्याचा मोठा आदरसत्कार केला. जणूं काय चुलत्यापुतण्यांच्या स्नेहांत बिघाड येण्यासारखें कांहींच झालें नव्हतें व पूर्वी देवळांत जी.त्यांची गांठ पडली होती त्या वेळेपासून तों या भेटीपर्यंत त्यांचा स्नेह कायमच राहिला होता !

पृथ्वीराजानें आपल्या चुलत्याला पाहतांच "कसें काय काकासाहेब, आपल्या जखमा बऱ्या आहेत ना?" म्हणून मोठ्या कळकळीनें प्रश्न केला.

"तुला पाहतांच झालल्या आनंदानेंच त्या बऱ्या झाल्या आहेत!" असा सुराजमल्लानें तसाच मनःपूर्वक आणि कळवळल्यानें जबाब दिला.

पृथ्वीराजास भूक लागली आहे असें समजतांच सुराजमल्लानें जेवण मागविलें आणि एकाच ताटांत त्या दोघांनीं भोजन केलें. काय एकमेकांचा एकमेकांवर भरंवसा हा ! भोजन झाल्यावर कोणतीहि शंका मनांत न आणतां सुराजमल्लानें दिलेला तांबूल पृथ्वीराजानें भक्षण केला. परत जातांना पृथ्वीराजानें म्हटलें " काकासाहेब, तुमच्याआमच्या लढाईचा निकाल उद्यां लावूं."

"बरें आहे बाळ. पण जरा लवकरच ये हो!"

असे चुलत्यापुतण्यांचे एकमेकांस निरोप झाले.

दुसऱ्या दिवसाचा संग्राम तर आदल्या दिवसापेक्षांहि फारच घनघोर झाला. ताराबाईनें याहि दिवशीं पूर्व दिवसाचा पराक्रम चांगलाच गाजविला. सुराजमल्लास लढाईंत पूर्ण अपयश येऊन थोडक्याशा लोकांनिशीं समरांगणांतून पळून जावें लागलें. तो जो तेथून निघाला तो कन्थलच्या रानांत जाऊन राहिला. तेथील रानटी रहिवासी लोकां-

वर आपला अंमल बसवून तेथेंच त्यानें एक लहानसें राज्य स्थापिलें व तें अद्यापिहि त्याच्या वंशजांकडे चालत आहे.

ही लढाई आटोपून सर्व स्थिरस्थावर झाल्यावर ताराबाई आणि पृथ्वीराज आपली रहावयाची जागा जें कमळपुर शहर तेथें जाऊन सुखानें कालक्षेप करूं लागलीं. परंतु येथेंहि फार काळपर्यंत तीं स्वस्थ पडून राहिलीं नाहींत. कोठें अन्याय आणि जुलूम झाला, कीं, त्यापासून लोकांचें रक्षण करण्यास त्यांनीं धाव घेतलीच. याप्रमाणें या उभयतांच्या शौर्याची कीर्ति चोहोंकडे पसरली. पुष्कळ तेजस्वी आणि शूर योद्धे त्यांच्या समागमांत राहूं लागले. केव्हांहि झालें तरी एक हजार वीरांची तैनात त्यांच्याबरोबर नेहमीं असे, आणि पृथ्वीराजाचें सैन्य ह्मणजे अनाथपीडितांस केवळ देवलोकींची मदत आहे, असें वाटे.

सिरोईच्या राजपुत्रास पृथ्वीराजाची एक बहीण दिलेली होती. या बहिणीकडून त्याला एके दिवशीं एक पत्र आलें. त्यांत आपला नवरा नाना तऱ्हांनीं आपला नाहक छळ करीत असल्याचें तिनें लिहून कसेंहि करून आपणास माहेरीं घेऊन जावें, अशी पुष्कळ काकुळतीस येऊन विनंति केली होती. हें पत्र पृथ्वीराजाच्या हातीं आलें तेव्हां त्यानें तें वाचून आपल्या पत्नीकडे दिलें व पुढें कसें करावें ह्मणून तिला विचारलें. “ चला, आपण तेथें जाऊं आणि त्या राजपुत्रास चांगली शिक्षा लावून आपल्या बहिणीस येथें घेऊन येऊं, ” असें तिनें सांगतांच पृथ्वीराजास मोठा आनंद झाला.

परंतु या कामीं पृथ्वीराजा कोणासच बरोबर नेईना. त्याच्या एकटें जाण्यानें दगा होईल असें ताराबाईच्या मनास वारंवार वाटे, व त्यामुळें तिला फार हुरहुर लागून राहिली. आपणास बरोबर नेण्याविषयीं आपल्या जिवलग पतीची तिनें परोपरीनें विनंति केली, परंतु आपल्या

अत्यंत निकटच्या नातलगाशीं संबंध असून गोष्ट घरगुती असल्यामुळें बरोबर दुसऱ्या कोणास घेणें योग्य नाहीं, असा त्यानें निश्चय केला. मध्यरात्रीच्या वेळीं पृथ्वीराज सिरोईस जाऊन पोहोंचला. राजवाड्याच्या भिंतीवरून चढून प्रभुराय—ह्मणजे त्याचा मेहुणा—ज्या महालांत निजला होता तेथें तो गेला आणि त्याला जागें करून त्यानें आपली कट्यार त्याच्या मानेवर ठेवली. प्रभुराय गयावया करून पृथ्वीराजाकडे जीव-दान मागूं लागला. त्याच्या बायकोसहि त्याची दया येऊन तिनें पदर पसरून भावाची करुणा भाकिली. 'आपल्या बायकोस शरण जाऊन पुनः कधींहि तिला वाईट रीतीनें वागविलें जाणार नाहीं अशाविषयीं तिची खात्री करावी, मग तुमचा जीव वांचवीन' असें प्रभुरायास पृथ्वीराजानें सांगितलें. प्रभुरायानें ही अट मान्य केली, आणि आपल्या वर्तनाविषयीं आपल्या बायकोची खातरजमा केली. पृथ्वीराजानेंहि नंतर आपली कट्यार जागच्याजागीं ठेवून प्रभुरायाचें सांत्वन केलें.

प्रभुराय जितका भ्याड होता, तितकाच तो खुनशी होता. पृथ्वीराज परत कमळपुरास जाऊं लागला तेव्हां त्यानें त्याच्याबरोबर गुप्त रीतीनें विष घालून तयार केलेली कांहीं मिठाई दिली. कमळपुराच्या नजीक आल्यावर पृथ्वीराजानें त्यांतून थोडीशी मिठाई खाल्ली. मिठाईंत असलेल्या विषाचा अंमल ताबडतोब झाल्यामुळें त्याला आपल्या वाड्यापर्यंत येववेना. मम्मा देवीच्या देवळांत येऊन तो पडला आणि त्यानें ताराबाईस निरोप पाठविला. त्या ठिकाणीं त्याला कायमचीच झोंप लागली! त्याचा शुद्ध आत्मा त्याच्या देहांतून निघून गेला आणि ताराबाईच्या सौभाग्यसूर्यास खग्रास व कायमचें ग्रहण लागलें.

ताराबाई तेथें येऊन पाहते तों कांहीं उरलें नव्हतें. आपल्या प्रिय पतीचें मृत शरीर मांडीवर घेऊन तिनें अतिशय दुःख केलें. प्रभुरायाविषयीं तिच्या मनांत तीव्र संताप बाणला; परंतु तिच्यावर पडलेल्या दुःखाच्या डोंगराखालीं हा संताप चुरडून गेला. आपला महा पराक्रमी पति अशा रीतीनें गतप्राण झालेला पाहून तिच्या अंगांतलें उग्र तेज सर्व मावळून गेलें. ती साध्वी शोकाकुल होऊन काळीज फुटेपर्यंत तिनें आक्रोश केला. पण आक्रोशानें काय होणार ! ! ! आपल्या प्रियपतीच्या प्रेमाची वारंवार आठवण काढण्यापलीकडे तिच्या तोंडांतून कांहींच निघालें नाहीं. पतीचें नामस्मरण करून तयार केलेल्या चितेवर जाऊन ती बसली आणि आपल्या प्रियकराचें शिरकमल अंकावर घेऊन त्याच्या देहाबरोबर तिनें आपला देह अग्नीस अर्पण केला !

शौर्य, सौंदर्य, पितृभक्ति, पतिप्रेम इत्यादि गुणांनीं सर्व भरतखंडास भूषण होऊन राहिलेली आणि राजस्थानांतील भाटांच्या कवितेस रसभरित करणारी जी वीरपत्नी ताराबाई तिचा अत्यंत शोकजनक निधनवृत्तांत लिहितांना दुःखित झालेली आमची लेखणी आतां आह्मी खालीं ठेवितों.

## शहाजादी आयेषा.

प्रख्यात मोगल बादशहा शहाजहान याचा दुसरा मुलगा जो सुलतान सुजा, त्याची आयेषा ही कन्या होय. त्या वेळीं लावण्य आणि सुस्वभाव यांनीं सुसंपन्न अशी बादशाही घराण्यांत आयेषेसारखी दुसरी मुलगी नव्हती. शहाजहानची कारकीर्द ह्मणजे मोगलाईचा अत्यंत भरभराटीचा काळ ह्मटला तरी चालेल. हिंदुस्तानच्या कलाकौशल्यास

शहाजहानाच्यापूर्वी किंवा त्याच्यानतर निदान—मुसलमानी रियासतींत तरी—या कारकीर्दीइतका अनुकूल काळ आला असल्याचें दिसून येत नाहीं. सर्व प्रकारच्या पूर्ण वैभवानें ज्यांत लक्ष्मी नांदत होती अशा दिल्लीच्या सार्वभौम बादशाही घराण्यांत लहानपणापासून आयेषा वाढली असल्यामुळें त्या वेळीं राजकन्येस मिळत असलेलें सर्व शिक्षण तिला उत्तम प्रकारचें मिळालेलें होतें. अप्रतिम सौंदर्य, सुस्वभाव, उत्तम गुण आणि सदैव आनंदी चित्तवृत्ति यांच्या योगानें खुद्द बादशहापासून तों कनिष्ठ प्रतीच्या नोकरलोकांपर्यंत सर्वांची ती आवडती झाली होती. राजवाड्यांत कोणताहि सण, समारंभ अथवा जत्रा असो, त्यांत आयेषा नसेल तर त्याला शोभाच येत नसे.

आयेषेला तारुण्यावस्था प्राप्त झाल्यावर तिच्या प्राप्तीसाठीं पुष्कळ तरुण नवाब आणि उमराव उत्सुक झाले; परंतु सर्व गुणांनीं तिला अनुरूप असा तरुण त्यांत एकच होता, आणि तो तिचा चुलतभाऊ ह्मणजे अवरंगजेबाचा मुलगा शहाजादा महमद हा होय. महमद रूपानें सुंदर, तसाच शहाणा होता. त्याच्यामध्यें दोषच ह्मटला तर तो असावा तितका नेटदार नव्हता. बाकी उमद्या स्वभावाचा आणि उदार अंतःकरणाचा असा त्याच्यासारखा दुसरा राजपुत्र एकाहि नव्हता. महमद आणि आयेषा यांच्या लग्नाचा वाङ्निश्चय जेव्हां मोठ्या थाटानें करण्यांत आला तेव्हां सर्व लोकांनां फार आनंद झाला. शहरांत मोठा उत्सव सुरू झाला. परंतु कोठेंहि झालें तरी शुद्ध प्रीतीच्या मार्गांत नाना प्रकारच्या अडचणी आणि संकटें हीं यावयाचींच. मग तीं महमद आणि आषेया यांनां तरी कशीं सुटणार! दुर्दैवानें या जोडप्याची अत्यंत निर्दयपणानें पाठ घेतली. परंतु अखेरपर्यंत जसजशीं संकटें येत गेलीं तसतसें या उभयतांचें प्रेमबंधन दृढच होत गेलें.

इसवी सन सोळाशें सत्तावन सालीं शहाजहान बादशहास पक्षघाताचा विकार झाला. हें या बादशहाच्या कारकीर्दीचें एकोणतिसावें वर्ष होतें. बादशहाच्या आजाराची प्रसिद्धि जिकडेतिकडे होतांच सर्वत्र मोठी गडबड सुरू झाली. शहाजहानानें आपल्या मुलांनां मोठमोठे अधिकार देऊन त्यांनां निरनिराळ्या प्रांतांवर सुभेदार नेमिलें होतें. बंगाल्यांत सुलतान सुजा याला सुभेदारी दिली होती त्याचप्रमाणें गुजरातेंत मुराद व दक्षिणेंत अवरंगजेब याला सुभेदार नेमलें होतें. बादशहाच्या आजाराची बातमी कळतांच गादीच्या प्राप्तीसाठीं हे तिघेहि मोठमोठीं सैन्यें घेऊन दिल्लीकडे येण्यास निघाले. सर्वांत वडील दारा याच्यावर बादशहाची पूर्ण मर्जी होती, व गादीचा खरा वारस तोच होता. तथापि बाकीच्यांनीं त्याला गादी पचूं न देण्याचा निश्चय करून लढाईची तयारी केली.

वृद्ध शहाजहानानें आपली प्रकृति आतां बरी आहे व तुह्मीं करीत आहां हा निवळ अविचार आहे, अशा मजकुराचीं पत्रें बंड करण्यास प्रवृत्त झालेल्या अशा आपल्या पुत्रांनां पाठविलीं; परंतु त्या पत्रांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं दारास सैन्य घेऊन आपल्या भावांशीं तोंड देण्यास बाहेर पडावें लागलें. लढाइ पुष्कळ वेळपर्यंत चालू राहिली, परंतु अखेरीस दारास अपयश आलें आणि त्यानें पळ काढला.

दारा पळून गेल्यानंतर औरंगजेबानें शहाजहानास कैद केलें आणि सर्व सत्ता आपल्या हातीं घेऊन आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. बापास कैद केल्यानंतर औरंगजेबानें आपला भाऊ जो मुराद त्याचा वध करविला आणि दारा पळून गेला होता त्याच्या पाठलागावर सैन्य पाठविलें. दारा हातीं सांपडतांच त्यालाहि त्यानें ठार मारविलें, याप्रमाणें

बापाच्या गादीचा मार्ग मोकळा करून सोळाशें अठ्ठावन या वर्षी दिल्लीच्या बादशाही तख्तावर तो आरूढ झाला.

भावाभावांतील हे कलह चालू असतां महमद आणि आयेषा या उभयतांची गांठ क्वचित्च पडली असेल. कलहाचा वर सांगितल्याप्रमाणें निकाल होऊन औरंगजेब बादशहा झाल्यावर आतां आपल्या विवाहाचा योग जमेल, अशी त्यांनां आशा वाटली; परंतु त्यांच्या दुर्दैवानें हा योग आणखी पुष्कळ दिवसपर्यंत घडून आला नाहीं.

आयेषेचा बाप सुलतान सुजा, ह्मणजे औरंगजेबाच्या तडाख्यांतून उरलेला असा त्याचा एकटाच भाऊ, याला झालेली व्यवस्था पसंत पडली नाहीं. सैन्य गोळा करून त्यानें औरंगजेबाशीं अलाहाबादेजवळ मोठी लढाई केली; परंतु तींत त्याला यश आलें नाहीं.

अलाहाबादेस पराभव पावल्यावर सुजा तेथून निसटून बंगाल्यांत गेला. तेथें गेल्यावर आपल्या सैन्याची पुनः जमवाजमव करण्यास त्यानें आरंभ केला. औरंगजेब दिल्लीस परत गेल्यावर तो आपल्या मुलांमाणसांवर सूड घेईल ह्मणून त्यांनां तेथून बंगालमध्यें आणवण्याची त्यानें प्रथम तजवीज केली. आयेषा हिला बंगालमध्यें जाण्याचा जेव्हां प्रसंग आला तेव्हां महमदाचा वियोग तिला अत्यंत दुःसह झाला. त्यांतहि आयेषेच्या प्राप्तीची सर्व आशा सोडून देण्याविषयीं औरंगजेबानें महमदास निक्षून सांगितल्याचें तिच्या कानीं आल्यामुळें तर तिच्या दुःखास सीमाच राहिली नाहीं. आपला जेथें जन्म झाला व ज्या ठिकाणीं आपले बालपणचे दिवस आनंदांत गेले, असा राजवाडा सोडून बंगाल्यांत कष्टदशेंत दिवस काढण्यास जातांना तिचा मुखचंद्रमा दुःखाच्या ढगांमुळें म्लान आणि निस्तेज दिसूं लागला.

सुलतान सुजा यानें मोंघीर येथें आपलें पहिलें ठाणें दिलें. त्या ठिकाणीं त्याच्या कुटुंबांतील माणसें त्याला जाऊन मिळालीं. पराभव पावून पळून आलेले शिपाई त्या ठिकाणीं जमा झाले. निरनिराळ्या ठिकाणांहून नवीन लोक आणून आपल्या सैन्याची भरती केल्यावर मोंघीर हेंच ठाणें त्यानें बळकट केलें, आणि शहरचे तट दुरुस्त करून चांगली दूरवर मोर्चेबंदी करविली.

इकडे बादशहाचें सैन्य स्वस्थ राहिलें नव्हतें. औरंगजेबानें आपला प्रख्यात सरदार मीरजुमला आणि शहाजादा महमद यांनां शत्रूच्या पाठलागावर पाठवून त्याला बंगाल्यांतून हुसकून लावण्यास आज्ञा केली होती. या मोहिमेवर जाण्याविषयीं महमदास जेव्हां हुकूम झाला, तेव्हां त्याला पराकाष्ठेचें वाईट वाटलें; परंतु त्यानें आपलें अंतःकरण दृढ करून पित्राज्ञेप्रमाणें कामगिरी बजावण्याचा निश्चय केला आणि सुलतान सुजाच्या पाठलागाचें काम नेटानें चालविलें. प्रेमबंधनाच्या समोर दुसरीं बंधनें दृढ ठेवण्याचा कितीहि निश्चय केला तरी तो कसा फुकट जातो, याचा अनुभव त्या बिचाऱ्याला यावयाचा होता!

मीरजुमला आणि शहाजादा महमद हे दोघे नानातऱ्हेच्या अडचणींनां आणि संकटांनां न जुमानतां मजल दर मजल करीत सैन्यानिशीं मोंघीर येथें दाखल झाले. किल्ल्यापासून थोड्याच मैलांच्या अंतरावर त्यांनीं तळ दिला होता. उभयतांच्या थोड्याबहुत चकामकी झाल्यावर आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून सुलतान सुजा यानें आपला तळ तेथून उठविला आणि तो राजमहाल येथें जाऊन राहिला. तेथेंहि त्याच्या पाठीवर बादशहाचें सैन्य आलेंच! सहा दिवस बादशाही सैन्याशीं मोठ्या हिंमतीनें टक्कर देऊन पुढें तग निघत नाहीं अशी खातरी झाल्यावर आपलीं मुलेंमाणसें नौकेंत बसवून

काळोखी रात्र आणि वादळ यांच्या आश्रयानें नदी उतरून सुजा तोंडा येथें गेला. तेथील तटबंदी आधींच बळकट होती, ती त्यानें आणखी जास्त मजबूत केली. त्यांतहि सुदैवानें ज्या दिवशीं तो तोंडा येथें जाऊन पोहोंचला त्याच दिवशीं पावसाळ्यास सुरुवात झाली. पावसाळ्याचा जोर पुष्कळ असल्यामुळें बादशाहीसैन्यास त्याच्या मागोमाग जातां येईना.

या पावसाळ्यामुळें सुलतान सुजा याला पुष्कळ सवड झाली. त्यानें नवीन सैन्य आणि दारूगोळा जमा करून आपली स्थिति चांगली सुधारली. त्यांतहि एक महत्वाची गोष्ट घडून आली, तिच्या योगानें तर त्याला विशेषच जोर आला. ती गोष्ट ह्मटली ह्मणजे शहाजादा महमद आपलें सैन्य सोडून सुजास मिळाला. हें वर्तन त्याच्या हातून कसें घडलें त्याची हकीगत अत्यंत हृदयद्रावक आहे.

बादशहाचें सैन्य सारखें पाठीमागें लागल्यामुळें सुलतान सुजा यास पळतांपळतां पुरे वाट झाली होती. शिकस्त करून पुढचें ठाणें धरून कमीकमी होत असलेल्या सैन्यास हुरूप आणून जरा कोठें थोडीशी स्थिरस्थावर होते न होते इतक्यांत पाठीशीं बादशहाचें सैन्य आलेंच ! पुनः लढाई, पुनः पराजय, आणि पुनः पळापळ, अशी अत्यंत अपमानकारक स्थिति त्या बिचाऱ्यास प्राप्त झाली होती. आपल्या शूर, उदार अंतःकरणी आणि अत्यंत उमद्या स्वभावाच्या पित्याची ही दुःस्थिति पाहून एकीकडे आयेषेचें हृदय नेहमीं शोकाकुल झालेलें असे. बरें दुसरीकडे पहावें, तर ज्याची रम्य मूर्ति आपल्या अंतःकरणांत सदैव वास करीत आहे, अशा आपल्या प्रियकर महमदाच्याच शौर्यानें आणि पराक्रमानें आपल्या बापाची ही दुर्दशा उडत आहे ! " हायरे दैवा ! अशी विचित्र स्थिति कशी आणलीस

असें ह्मणून आयेषा नित्य दुःखांत निमग्न असे. आपल्या परम पूज्य पित्यावर आलेल्या संकटानें तिळतिळ तुटणारें, परंतु त्याबरोबरच आपल्या प्रियकराच्या भेटीसाठीं अत्यंत आतुर झालेलें तिचें अंतःकरण त्यापडीला चैन ह्मणून पडूं देईना.

एके दिवशीं ती या असह्य दुःखाग्नींत होरपळत पडली असतां आपल्या हृदयस्थ रम्य मूर्तीकडे तिचें ध्यान लागलें. प्रेमाच्या भरांत तिला वस्तुस्थितीचें भान न राहून तिनें महमदास एक पत्र लिहिलें. त्या पत्रांत तिनें आपल्या कष्टदशेचें अत्यंत हृदयभेदक वर्णन करून महमदाच्या भेटीची अनिवार इच्छा व्यक्त केली होती. हें पत्र महमदाच्या हातीं येतांच त्याच्या चित्तवृत्तींत एकदम फरक पडला. बादशहानें सोंपवून दिलेल्या कामावर निघतांना त्याच्या मनाची चमत्कारिक स्थिति झाली होती खरी; परंतु पुत्रधर्मास आणि प्रजाधर्मास उचित असें जें आपलें कर्तव्य तेंच करावयाचें, असा निश्चय करून त्यानें तेथवर आपलें काम उत्तम प्रकारें बजावलें होतें; पण तें आयेषेचें पत्र पाहतांच तिच्याविषयींच्या त्याच्या शुद्ध प्रेमाला विलक्षण भरतें येऊन त्यांत इतर सर्व विचार पार बुडून गेले. महत्त्वाकांक्षा, पुत्रधर्म, प्रजाधर्म, राज्यप्राप्ति, बादशहाचा कडक स्वभाव, त्याचा रोष आणि पुढें आपणावर ओढवणारें संकट, यांपैकीं कोणतीहि गोष्ट त्याच्या मनांत राहिली नाहीं. सर्व जगच त्याला आयेषामय होऊन गेलें. आयेषेच्या प्राप्तीशिवाय दुसरें कशाचेंहि भान राहिलें नाहीं व आपल्या सर्व ऐहिक महत्त्वाकांक्षा तिच्या विषयींच्या प्रेमालाच त्यानें अर्पण केल्या. आपले कांहीं स्नेही आणि सैन्यांतले अमलदार यांनां जवळ बोलावून त्यांनां शत्रूस जाऊन मिळण्याचा आपला बेत त्यानें सांगितला व आपल्यामागून त्यांनींहि शत्रूच्या

गोटांत यावें अशी इच्छा प्रदर्शित केली. शहाजाद्याचें अशा प्रकारचें बोलणें ऐकून ती सर्व मंडळी आश्चर्यानें थक्क झाली. कांहीं वेळ कोणाच्याच तोंडून शब्द निघेना. शहाजाद्याच्या या अयोग्य वर्तनाचे परिणाम त्याला दाखवून या घातुक मार्गापासून परावृत्त करावें हें जें खऱ्या स्नेह्यांचें काम तें न करतां त्यांनीं "महाराज, आपणास जें वाटतें तें योग्यच असलें पाहिजे. आपण आज संध्याकाळीं शत्रूच्या गोटांत गेल्यास सकाळीं अर्धें सैन्य आपणांस येऊन मिळेल, यांत बिलकूल संशय नाहीं!" वगैरे गोडगोड शब्दांनीं त्याचें मन संतुष्ट केलें.

संध्याकाळच्या वेळीं नौकेंत बसून शहाजादा महमद तोंडा येथें निघून गेल्यानंतर या त्याच्या स्नेह्यांनीं सरदार मीर जुमला यास ताबडतोब डाक पाठविली, व झालेली हकीगत लिहून पुढें जें काय करणें असेल तें ताबडतोब करावें अशी विनंति केली. मीर जुमला यास ही विचित्र बातमी समजतांच शहाजाद्याच्या या अविचाराच्या वर्तनाबद्दल तो मोठ्या अचंब्यांत पडला. ताबडतोब तो छावणींत येऊन पोहोंचला, त्या वेळीं सर्वत्र घोटाळा उडून गेला आहे व सर्व सैन्य बंड करण्याच्या बेतांत आहे असें त्याच्या नजरेस आलें. लगेच हत्तीवर बसून प्रक्षुब्ध झालेल्या त्या सैन्यांत तो शिरला आणि "केवळ प्रेमानें अंध होऊन शहाजाद्याच्या हातून हें अविचाराचें कृत्य घडलें आहे. पुत्रधर्म आणि प्रजाधर्म हीं सर्व तो विसरला आहे. तुह्मी आपलें कर्तव्य विसरूं नये. बादशहाच्या कानीं ही गोष्ट गेल्यास सर्वांची कत्तल होईल." इत्यादि सामदामाच्या भाषणानें त्यानें बिथरलेल्या सैन्यास स्थिरस्थावर केलें.

इकडे हा प्रकार चालला असतां तोंडा येथें सुजाच्या छावणींत जिकडेतिकडे आनंदीआनंद होऊन गेला होता. शहाजादा महमद तेथें जाऊन पोहोंचला तेव्हां आयेषा हिला अपरंपार आनंद झाला. आभारयुक्त अंतःकरणानें तिनें त्याचें स्वागत केलें. सुलतान सुजा यासहि महमदाला पाहून अंतःकरणापासून आनंद झाला. इकडे राजवाड्यांतील स्त्रियांनीं मोठ्या त्वरेनें लग्नाची तयारी चालविली. सर्व शहरभर मेजवान्यांचा थाट उडून आनंदाचा गजर सुरू झाला. भविष्यत्काळच्या क्षितिजावर संकटाच्या ढगांची पूर्वच्छाया जरी दिसत होती, तरी प्रस्तुतच्या आनंदावर तिचा मुळींच परिणाम झाला नव्हता. मोठ्या थाटानें आयेषा आणि महमद यांच्या विवाहाचा सोहळा होऊन तीं उभयतां परस्परांविषयींच्या प्रेमसागरांत पूर्णपणें निमग्न झालीं. सर्व दुनिया त्यांनां प्रेममय अशी भासत असल्यामुळें औरंगजेब बादशहासारख्याच्या क्रोधाच्या भीतीस त्यांच्या अंतःकरणांत कोठेंच जागा मिळेना. सर्व प्रकारच्या ऐहिक निराशा, भीति, संकटें यांच्यावर प्रीतीनें ज्यांत जय मिळविला आहे असें हें इतिहासांत आणखी एक उदाहरण होय ! परंतु हाय हाय ! हा आनंदाचा काळ लवकरच संपला. बादशहाचें सैन्य शहराच्या नजीक ठेपल्याची बातमी येऊन पोहोचली. शहरच्या लोकांस या लग्नसोहळ्यांत जो सुखाचा काळ लाभला तो केवळ स्वप्नवत् झाला, आणि त्यांच्या कष्टदशेच्या दिवसांस आरंभ झाला.

सुलतान सुजा आणि शहाजदा महमद या दोघांनीं शहरच्या तटाबाहेर येऊन बादशहाच्या सैन्याशीं युद्ध केलें; परंतु त्यांत त्यांनां पराजय येऊन सैन्याची पुष्कळ कत्तल उडाली. पुढें तोंडा शहर टिकाव धरून राहण्याइतकें मजबूत नाहीं असें पाहून रात्रीच्या वेळीं आपला

खजिना आणि कबिले यांसह नौकेंत बसून त्वरेनें ते डाका येथें निघून गेले.

आपला मुलगा महमद शत्रूस जाऊन मिळाला आणि त्याचा आयेषेशीं विवाह झाला, ही हकीगत जेव्हां औरंगजेबास समजली तेव्हां त्याला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटून अनिवार क्रोध आला. बंगालचें राजनिष्ठ सैन्य महमदास जाऊन मिळेल व तसें झाल्यास नंतर आपली गादी टिकेल कीं नाहीं याविषयींहि त्याला भीति वाटूं लागली. तत्काळ जितकें सैन्य जमूं शकलें तितकें जमवून बंगाल्यांत जाऊन बंदोबस्त करण्याच्या उद्देशानें बादशहा स्वतः दिल्लीहून निघाला. कांहीं मजला चालून आल्यावर आपल्या सैन्याचा जय झाल्याची व सुजा आणि महमद तोंडा येथून पळून गेल्याची सुवार्ता त्याला समजली. या बातमीनें बादशहाचें मन जरासें स्वस्थ होऊन तो दिल्लीस परत गेला. तथापि जोंपर्यंत सुलतान सुजा याच्याबरोबर शहाजादा महमद आहे तोंपर्यंत पुनः एकवार गादीविषयीं तंटा करण्याइतकें सामर्थ्य आपल्या भावाला प्राप्त होण्याचा संभव असल्यामुळें बादशहास चैन ह्मणून पडेना. त्यामुळें या दोघां चुलत्यापुतण्यांत बेबनाव पडावा ह्मणून औरंगजेबानें एक खाशी युक्ति शोधून काढली.

शहाजाद्या महमदास आपल्या बापाचें सैन्य सोडून जाण्यास आयेषेचें पत्र कारण झालें होतें. त्याचप्रमाणें सुलतान सुजा आणि महमद या दोघांचा स्नेह नाहींसा होऊन त्यांची ताटातूट होण्यासहि तसेंच एक पत्र कारण झालें. सुलतान सुजा याचा स्वभाव उमदा परंतु अत्यंत संशयी होता. ही गोष्ट धूर्त औरंगजेबानें लक्ष्यांत आणून मोठ्या शिताफीनें डाव टाकला. बादशहानें महमदास एक पत्र लिहिलें व त्यांत सुलतान सुजा यास गुप्त रीतीनें ठार मारण्याचा महमदाचा बेत

असल्याचें ध्वनित केलें. तें पत्र एका खास जासुदाकडे देऊन तें अचुक सुलतान सुजा याच्या हेरांच्या हातांत पडावें, असा त्यानें कावा रचिला. त्या पत्रांत खालीं लिहिल्याप्रमाणें मजकूर होता.:—

"आमचा प्रिय शहाजादा महमद यांस,

तुमचें सौख्य आणि सुरक्षितपणा यासंबंधाचे विचार आमच्या अंत:करणांत सदैव जागृत असतात हें आह्मीं तुह्मांला लिहिलें पाहिजे असें नाहीं. सुलतान सुजा याच्याबरोबर चाललेल्या युद्धांत तुमच्या शौर्याची आवश्यकता वाटल्यावरून प्रस्तुतच्या मोहिमेवर तुह्मांला जेव्हां रवाना केलें तेव्हां आमच्या मनास किती दु:ख झालें तें तुह्मीं जाणतच आहां. आमचे परमप्रिय पुत्र आणि गादीचे वारस जे तुह्मी, ते एका महिन्याच्या आंत शत्रूचा पराजय कराल, आणि त्याला कैद करून आमच्यासमोर घेऊन याल अशी आह्माला मोठी आशा होती. अशा तऱ्हेनें पूर्ण विजय मिळवून तुह्मी परत आलां असतां तर आमची सर्व चिंता आणि भीति दूर झाली असती; परंतु आज सात महिने होऊन गेले, तरी औरंगजेबाच्या इच्छा जागच्याजागींच राहिल्या आहेत ! आपलें कर्तव्य करणें एकीकडे टाकून तुह्मीं आमचा विश्वासघात केला आणि आपल्या शुभ्र कीर्तीस डाग लावून घेतला. केवळ एका तरुण स्त्रीच्या स्मितोल्हासित मुखाकडे पाहून तुह्मांला पुत्रधर्माचा विसर पडला, एका तरुणीच्या सौंदर्याला भुलून तुह्मी आपल्या अब्रूस आंचवलां ! अरेरे ! मोगलांच्या साम्राज्यसिंहासनावर आरूढ होऊन राज्य करण्यासाठीं ज्याचा जन्म झाला त्यानें गुलामासारखें शत्रूच्या घरीं पडून राहावें ना ! परंतु शहाजाद्यास आपल्या अविचारी वर्तनाचा आतां पश्चात्ताप झाला आहे, असें आह्मांला दिसून येतें. आपल्या मनाचा शुद्धपणा ईश्वरसाक्षीनें त्यानें कबूल केल्यावरून आह्मी त्याच्या

गैरवर्तनाकडे आतां लक्ष्य देत नाहीं. आह्मीं त्याचे सर्व अपराध माफ केले आहेत आणि पूर्ववत् आमचें अंतःकरण आमच्या प्रिय पुत्राकडे ओढ घेत आहे. परंतु त्यानें जें काम करण्याचें कबूल केलें आहे तें त्याच्या हातून झाल्यावरच आमच्या कृपाप्रसादाची प्राप्ति त्याला पुनः होणार आहे. ''

कपटी औरंगजेबानें कावा रचल्याप्रमाणें पत्र नेणाऱ्या खास जासुदाकडून हें पत्र सुलतान सुजा याच्या हेरांच्या हातीं सांपडलें व तें त्यांनीं आपल्या यजमानाजवळ नेऊन दिलें. त्यांतील संशयजनक मजकूर वाचून औरंगजेबास वाटला होता तसाच सुजाच्या मनावर परिणाम घडला. त्याला महमदाच्या प्रामाणिकपणाविषयीं जबर संशय आला. महमदानें आपल्याकडून हवें तें केलें व नाना तऱ्हांनीं सुजास समजावून सांगण्याचा प्रयत्न केला, परंतु व्यर्थ. त्याच्या मनानें एकदा जें घेतलें तें कायम. खरोखर पाहिलें असतां सुलतान सुजाची महमदावर पुष्कळ प्रीति होती. महमदाच्या काल्पनिक विश्वासघातानें त्याला जितकें वाईट वाटलें, त्याच्यापेक्षां आपला त्याच्यासंबंधानें जो समज झाला होता तो चुकला ह्मणून त्याला जास्त वाईट वाटलें !

आपली प्रियपत्नी आयेषा हिच्याकडूनहि महमदानें आपल्या सासऱ्याचा गैरसमज दूर करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पतीच्या प्रामाणिकपणाविषयीं आयेषेच्या मनांत कधीं तिळभरहि संशय आला नव्हता. औरंगजेबाच्या कपटाचा तिला तत्काळ उमज पडला. तिनेंहि आपल्या बापाचा गैरसमज नाहींसा करण्याविषयीं पुष्कळ खटपट केली, परंतु सुलतान सुजा नेहमींनेहमीं आयेषेला तें पत्र दाखवी आणि त्यांत लिहिलें आहे तें खरें असल्याविषयीं सांगे. काय करणार बिचारी !

अखेरीस त्या पत्रानें आपला दुष्ट कार्यभाग केलाच ! सुलतान सुजानें सतत तीन दिवस मनाच्या अत्यंत उद्विग्नावस्थेंत काढले. चवथ्या दिवशीं त्यानें मुद्दाम दरबार भरवून आपल्या जांवयास—महमदास—बोलावणें पाठविलें. शहाजादा महमद दरबारांत दाखल झाल्यावर सुजा दुःखित वाणीनें त्याला ह्मणाला "एकीकडे प्रीति आणि एकीकडे संशय, याप्रमाणें माझ्या मनाची आज सारखी तीन दिवस ओढाताण चालली आहे. अखेरीस संशयवृत्तिच प्रबल झालेली दिसते. मक्का येथील पवित्र मशिदींत जाऊन जरी आपल्या निरपराधीपणा-विषयीं तूं शपथ घेतलीस, तरी आतां माझा तुझ्याशीं पूर्ववत् स्नेह राहणें शक्य नाहीं. स्नेहबंध तुटला, ममता लयास गेली. याउपर माझें मन तुझ्याविषयीं शुद्ध रहाणें केवळ अशक्य आहे. यासाठीं आतां क्षणाचाहि विलंब न करतां तूं आतांचे आत्तां येथून जावेंस हें बरें. तूं गेल्यास उभयतांसहि चांगलें. आपली पत्नी आयेषा हिलाहि तूं बरोबर घेऊन जा. आपल्या योग्यतेस अनुरूप असें सर्व जवाहीर तिनें घेऊन जावें. सुजाचा जामदारखाना तुह्मां दोघांना उघडा आहे. लागेल तें घ्या आणि या क्षणीं येथून चालतीं व्हा. आपल्या मुलाच्या हातून घोर कृत्य घडण्यापूर्वी जर मीं त्याला परत पाठविलें, तर औरंगजेब माझे आभार मानील."

सुलतान सुजा यानें क्रोधाच्या आवेशानें केलेलें हें भाषण ऐकून महमदास पराकाष्ठेचें वाईट वाटलें व त्याची पूर्ण निराशा झाली. सुलतानानें आपणाशीं जें अत्यंत कटु असें भाषण केलें,त्यांत त्याच्या-कडून अन्याय झाला असें त्याला वाटलें. त्यांतल्यात्यांत त्याच्या मनाचा थोरपणा पाहून त्याला समाधानहि वाटलें; परंतु पुढें काय करावें हा अत्यंत दुःखदायक प्रश्न त्याच्यापुढें उभा राहिला. औरंगजेबाचा

कडकपणा महमदाला पुरा माहीत होता. कोणत्याहि माणसांवर दोन वेळ विश्वास ठेवणें त्याच्याकडून कधींहि होणार नाहीं, मग तो स्वतःचा मुलगा असो किंवा दुसरा कोणी असो. बंडासारखा अपराध, मग तो प्रत्यक्ष मुलाच्या हातून झाला असला तरी बादशहाच्या दृष्टीनें कधींहि क्षम्य होणार नाहीं. सुजाकडे रहावें, तर नेहमीं त्याचा संशय आणि दुःख यांत दिवस काढावे लागणार. बरें, परत औरंगजेबाकडे जावें, तर कमींत कमी शिक्षा ह्मटली ह्मणजे कैदखाना आपल्यापुढें दरवाजा उघडून तयार असणार !

ती रात्र त्या नवराबायकोस अत्यंत कष्टाची गेली. या अफाट जगांत आपण एकटीं, कोणी स्नेही नाहीं अथवा प्रीतीचें माणूस आपणास अनुकूल नाहीं. सर्व दुनिया फिरलेली. परंतु त्या दोघांचा परमेश्वरावर दृढ विश्वास असल्यामुळें त्यांनीं त्याच्यावरच सर्वस्वीं भार टाकला. दुसरे दिवशीं सकाळीं डाका शहरचा आणि आपल्या ममतेंतील माणसांचा निरोप घेण्याची त्यांनीं तयारी केली. शहर सोडतांना त्यांनां पराकाष्ठेचें दुःख झालें. बराच वेळ त्यांच्या डोळ्यांचें पाणी खळेना. आयेषेच्या आईनें अत्यंत प्रेमानें आपल्या मुलीस आशीर्वाद दिला आणि सुलतान सुजा यानेंहि त्यांनां बहुमोल रत्नें, जवाहीर आणि पुष्कळ पैसा देऊन त्यांची रवानगी केली. याप्रमाणें लग्न होऊन थोडे दिवस गेले न गेले तोंच आपल्या सर्व मायेममतेच्या माणसांचें वियोगदुःख त्यांनां अनुभवावें लागलें व त्यांच्या नशिबीं पुनः बादशहाच्या छावणींत जाऊन स्वाधीन होण्याचें आलें.

ज्या सैन्यावर थोड्याच दिवसांपूर्वी आपण हुकूम बजावीत होतों व ज्या सरदाराबरोबर बरोबरीच्या नात्यानें वागून बादशहाची कामगिरी करीत होतों, त्याच सैन्यासमीप कैद्यासारखें येतांना मह-

मदास पुष्कळच खेद झाला व दुर्दैवाची कुठार त्याच्या हृदयावरच पडल्यासारखी त्याला वाटली. थोड्या महिन्यांपूर्वी आपल्या हातून जें कृत्य घडलें त्याबद्दल त्याचें मन बहुतेक पस्तावल्यासारखें झालें; परंतु आपल्या बाजूस असलेल्या सुंदर, शूर, शांत, आणि सर्व संकटांत आपल्यावर जिचें अढळ प्रेम आणि निःसीम भक्ति आहे अशा आपल्या प्रियपत्नीकडे पाहून त्याला हिंमत आली. आयेषेसारख्या अद्वितीय स्त्रीरत्नाचा आपणास लाभ झाला ह्मणून परमेश्वराचे त्यानें आभार मानले, आणि बाजूस चालत असलेल्या मेण्याचा दरवाजा सरकावून "काहीं हरकत नाहीं! जें होईल तें होवो! आपण एकत्र आहों तोंपर्यंत आपल्या सुखांत कांहींच कमी नाहीं!" असें तो हळूच तिला ह्मणाला.

बादशाही सैन्यापासून थोड्या अंतरावर येऊन पोहोंचल्यावर आपण आल्याचें वर्तमान त्यानें वजीर मीर जुमला यास कळविलें. मीर जुमला यास ही बातमी पोहोंचतांच त्यानें घाईनें येऊन शहाजाद्याच्या मानमरातबाप्रमाणें त्याचें आगतस्वागत केलें. लगेच कांहीं स्वारांनीं नागव्या तरवारीनिशीं महमद आणि आयेषा यांच्या सभोंवार गराडा घातला व बादशहाचा हुकूम येईपर्यंत त्यांना एका तंबूंत कैदेंत ठेवलें. पुढें बादशहाच्या हुकुमावरून त्यांना ताबडतोब दिल्लीस पाठविलें. तेथें नेल्यावर औरंगजेबानें केलेली सर्व निर्भर्त्सना त्यांनीं निमूटपणें ऐकून घेतली. पुढें ग्वाल्हेरच्या भयाण किल्ल्यांत त्यांना नेऊन ठेविलें. तेथें तीं उभयतां मरेपर्यंत कैदखान्याच्या दुःसह यातना भोगीत होतीं.

दुसरी जी हकीगत अलीकडे बाहेर आली आहे तीवरून ग्वाल्हेर येथें त्यांचा शेवट झाला नाहीं, असें दिसून येतें. इसवी सन १६७२ या वर्षीं बादशहाचें मन त्यांच्याविषयीं द्रवलें व त्यांना तेथून

काढून त्यानें शिवनगर येथें नेऊन ठेविलें. त्या ठिकाणीं त्यांनां खासगी खर्चासाठीं बादशहाच्या हुकुमावरून दरमहा एक हजारांचा तनखा मिळत असे. पुढें तीन वर्षांनीं बादशहानें महमदास वीस हजार सैन्याची सरदारी देऊन एक लाख रुपयांची नेमणूक केली. १६७८त शहाजादा महमद मृत्यु पावला. दिल्लीजवळच प्रख्यात साधु कुतुब आदिन याच्या कबरेशेजारीं त्याची कबर आहे.

शहाजादी आयेषा केव्हां व कोणत्या स्थितींत मरण पावली, तें बरोबर समजत नाहीं. जी कांहीं माहिती उपलब्ध आहे, तीवरून आपल्या प्रियपतीवर आलेल्या संकटाच्या दिवसांत तिनें मोठ्या धैर्यानें वागून तशाहि स्थितींत त्याचें समाधान केलें व पुढें त्याला वैभवाचे दिवस आलेले पाहाण्यासहि ती जीवंत होती.

आयेषेसारख्या सात्त्विक आणि थोर अंतःकरणाच्या स्त्रिया कोण-त्याहि काळीं दुनयेंत थोड्याच असावयाच्या. हिंदुस्तानच्या इतिहा-सांत आयेषेचें नांव अजरामर राहून तिचें चरित्र बोधप्रद व तिच्या उदाहरणाचा परिणाम सदैव सद्गुणांच्या वृद्धीस अत्यंत अनुकूल असाच होईल.

## जोधपूरची राणी.

जोधपुरची रांणी, ह्मणजे राजा यशवंतसिंग याची पत्नी, ही रजपुतां-मध्यें अत्यंत शूर आणि अभिमानी असें जें मेवाडचें घराणें, त्या घराण्यांत जन्मली. अलौकिक सौन्दर्याविषयीं हिची ख्याति होतीच. त्यांतहि धाडस आणि स्वभावाचा करारीपणा या गुणांविषयीं त्या वेळीं भरतखंडांत हिच्याइतकी दुसरी स्त्री प्रसिद्धीस आलेली नव्हती.

अगदीं लहाणपणींच हिचा विवाह जोधपूरचा प्रख्यात राणा यशवंतसिंग याच्याशीं झाला होता. लग्न होऊन ज्या घराण्यांत ही गेली, त्या घराण्याच्या परिस्थितींत हिच्या अंगचा धाडशी स्वभाव प्रसिद्धीस येण्यास पुष्कळच संधि मिळाली. राजा यशवंतसिंग अगोदरच निधड्या छातीचा रजपूत वीर होता; आणि त्यानें जे पराक्रम गाजविले त्यांत त्याला त्याच्या शूर पत्नीचें उत्तेजन पुष्कळच साह्यभूत झालें.

त्या वेळच्या इतिहासांत राजा यशवंतसिंग याच्यासारखे प्रसिद्ध पुरुष थोडेच होऊन गेले. तो काळ म्हटला म्हणजे बादशहा शहाजहान आजारी पडल्यामुळें त्याच्या मुलांत गादीसाठीं जे तंटे सुरू झाले त्या तंट्यांच्या भयंकर बंडाळीचा काळ होय. या वेळीं जे निरनिराळे तट पडले होते त्यांपैकीं प्रत्येक तटांतील प्रमुखाचें लक्ष्य राजा यशवंतसिंगाकडे होतें. यशवंतसिंगाची मदत आपल्या तटास व्हावी, अशी आशा प्रत्येकास होती.

जोधपूरची राणी मोठी राजकारणी बायको होती. शहाजहान आणि दारा यांच्या पक्षाकडे तिची सहानुभूति असल्यामुळें राजा यशवंतसिंग याचाहि कल त्याच पक्षाकडे होऊन तो आपलें सैन्य घेऊन बादशहाच्या मदतीस निघाला. यशवंतसिंगाच्या गैरहजेरींत जोधपूरच्या राज्याची सर्व जबाबदारी राणीनें खुद्द आपल्या अंगावर घेतली. आपले बरेचसे रजपूत लोक आणि कांहीं बादशाही सैन्य बरोबर घेऊन राजा यशवंतसिंग औरंगजेब आणि मुराद यांस अडवून धरण्यासाठीं निघाला. उज्जनीच्या दक्षिणेस पंधरा मैलांवर नर्मदेजवळ शत्रूंची गांठ पडून निकराची लढाई झाली; परंतु बादशाही सैन्याच्या फितुरीमुळें रजपूत लोकांना केलेली कमालीची शिकस्त व्यर्थ होऊन यशवंतसिंगाचा पराजय झाला. सूर्यास्त होईपर्यंत दहा

हजार रजपूत रणांत मरून पडले! पुढें शिल्लक राहिलेलें सैन्य बरोबर घेऊन यशवंतसिंग माघारा फिरला.

जसजसें जोधपूर जवळ येऊं लागलें तसतसें राण्याचें मन अधिकाधिक अस्वस्थ होऊं लागलें. आपला पराजय झाला आणि आपणास पळून यावें लागलें, या गोष्टीचें आपल्या आवडत्या राणीस पुष्कळच दुःख होईल. आपली अब्रू गेली, फजिती झाली आणि त्यांतहि बादशहाची आपल्यासंबंधानें पूर्ण निराशा झाली, हे विचार मनांत येऊन त्याला चैन पडेना; आणि त्याला वाटलें तें बरोबरच होतें. कारण, त्या शूर राणीस या गोष्टीनें पुष्कळच खेद वाटला, व हिंदुस्त्रियांची पतीशीं जी नेहमींची वर्तणूक असते तीवरून पाहिलें असतां तिनें राण्यास आपल्या मनाची स्थिति ज्या प्रकारानें प्रदर्शित केली तो प्रकार अत्यंत अपूर्व होता, यांत संशय नाहीं.

या प्रकाराची बर्नियर यानें पुढीलप्रमाणें हकीगत दिली आहे:—

आपल्या पतीनें फार निकरानें लढाई केली. त्याच्यासारख्या वीरास साजे इतक्या धैर्यानें आणि शौर्यानें तो लढला असतांहि त्याला जयाची प्राप्ति झाली नाहीं. जवळ अवघे चारपांचशें लोक शिल्लक राहीपर्यंत त्यानें शिकस्त केली, परंतु कांहीं इलाज चालेना ह्मणून माघार खाऊन तो आला आहे, इत्यादि खरी हकीगत जरी तिला माहीत होती, तरी राण्याच्या मनास झालेला खेद कमी करण्यास कोणासहि न पाठवितां राणीनें किल्ल्याचे दरवाजे साफ बंद करण्याचा आणि अपयशानें मलिन झालेलीं तोंडें घेऊन आलेल्या सर्वांस नगराबाहेरच ठेवण्याचा कठोरपणाचा हुकूम फर्माविला.

क्रोधाच्या आवेशांत ती ह्मणाली "राजा यशवंतसिंग माझा पतिच नव्हे! मेवाडच्या राण्याचा जांवई, आणि तो इतक्या कमकुवत अंतः-

करणाचा असेल ? छे, ही गोष्ट मुळींच खरी नव्हे ! एवढ्या शूर व कर्तृत्वशील घराण्याशीं ज्याचा संबंध झाला त्यानें त्या घराण्याच्या इभ्रतीसारखेंच आचरण केलें पाहिजे, हें राजेसाहेब कसें विसरले ? अर्थात्, जय नाहीं तर मरण ह्या दोहोंशिवाय तिसरी स्थिति त्यांनीं पतकरावयाचीच नाहीं !''

कांहीं वेळ गेल्यानंतर तिची वृत्ति पालटली. सती जाण्याचा निश्चय करून चिता रचण्याचा तिनें हुकूम केला. ती ह्मणाली "मला तुह्मी सर्व फसवीत आहां. माझ्या पतीस वीरास योग्य अशीच गति मिळाली आहे. रणांतून अपयश घेऊन जीवंत परत येणें राजेसाहेबांकडून कालत्रयीं होणार नाहीं !'' असें ह्मणून ती बेशुद्ध झाली.

पुन: कांहीं वेळानें सावध झाल्यावर तिची मुद्रा पालटली. तिला अतिशय राग आला आणि आपल्या नवऱ्यावर तिनें एकसारखा कटु शब्दांचा भडिमार चालविला. आठनऊ दिवस ती या स्थितींत होती. पतीचें मुखावलोकनहि करण्यास ती कबूल होईना. अखेरीस 'होतां होईल तों लौकर नवीन सैन्य गोळा करून राणा औरंगजेबाशीं पुन: लढाई करील आणि आपलें गेलेलें यश फिरून मिळवून तुझा संतोष करील' असें तिच्या आईनें तिला परोपरीनें सांगून तिचें समाधान केलें.

आठदहा दिवसांनंतर राणीचा राग शांत झाल्यावर शहरचे दरवाजे उघडले आणि यशवंतसिंगानें आंत प्रवेश केला. त्या उमद्या अंत:करणाच्या शूर पुरुषास आपल्या वीरपत्नीच्या वर्तनाबद्दल यत्किंचित्हि विषाद वाटला नाहीं ! उलट, तिचें धाडस आणि तेजस्वीपणा पाहून त्याला मोठा आनंद झाला व तिच्याविषयीं मोठा अभिमान वाटला. नवऱ्याकडून चूक झाली तरी त्या चुकीबद्दल त्याचा धि:क्कार करण्याइतकें धैर्य आपल्या स्त्रीच्या अंगीं आहे असें पाहून राण्याला पुष्कळच समाधान वाटलें.

राणीचें मन जितकें तेजस्वी तितकेंच पतीविषयीं प्रेमपूर्ण असल्यामुळें तिनें त्याच्या, तशाच त्याच्याबरोबरच्या लोकांच्या जखमा बऱ्या करण्यासाठीं अत्यंत काळजीपूर्वक खटपट केली. पुढें औरंगजेब गादीवर बसला. यशवंतसिंगाच्या पूर्व वर्तनाविषयीं आपल्या मनांत मुळींसुद्धां वैषम्य नाहीं अशी औरंगजेबानें त्याची खातरजमा करून, त्याला विश्वास वाटावा ह्मणून आपला बंधु सुलतान सुजा याच्याबरोबर चाललेल्या लढाईंत मातबर फौजेनिशीं राण्यानें आपल्या मदतीसाठीं आपणास येऊन मिळावें ह्मणून हुकूम पाठविला. आपला मागचा सूड उगवून घेण्यास ही संधि चांगली आहे असें पाहून राजा यशवंतसिंगानेंहि ही विनंति मान्य केली व अलाहाबादेच्या उत्तरेस खुजवा येथें तो बादशहाच्या सैन्यास जाऊन मिळाला. या मोहिमेवर निघतांना राणीनें त्याला मोठ्या आनंदानें निरोप दिला व अगणित लूट घेऊन विजयोत्साहानें आपण परत याल असें सुचिन्ह आपण स्वप्नांत पाहिल्याचें सांगून त्याला उत्तेजन दिलें.

लढाईच्या दिवशीं राजा यशवंतसिंग आपल्या सैन्यानिशीं औरंगजेबाच्या बाजूस उभा राहिला. परंतु लढाईचें तोंड लागतांच उलट खाऊन त्यानें औरंगजेबाच्या पिछाडीवर मोठ्या त्वेषानें हल्ला केला. त्यानें औरंगजेबाच्या पिछाडीची साफ कत्तल उडवून बादशाही छावणी लुटून फस्त केली. इतकेंच नव्हे, तर खुद्द औरंगजेबाच्या तंबूंत शिरून तो लुटला व तो तंबूहि बरोबर घेऊन त्यानें आपल्या शहरचा मार्ग धरला. जातांना, हे दोघे भाऊ आपसांत लढून एकमेकांचा पुरा नाश करून घेतील, असें त्याला वाटलें ह्मणून तो पुनः त्या लढाईंत पडला नाहीं. यशवंतसिंग परत जोधपुरास जाऊन पोंचला तेव्हां शहरांत जिकडेतिकडे आनंदीआनंद होऊन सर्वास आतां शहाजहानाची गादी कायम

राहिली असें वाटलें. राजा यशवंतसिंगाचें हें वर्तन जरी अत्यंत नीचपणाचें होतें, तरी औरंगजेबाचा मोड होऊन आपल्या राजकारणास बळकटी आली आणि ज्या फितुरीनें औरंगजेबानें आपल्या नवऱ्यास रणांतून पळण्यास भाग पाडलें त्या फितुरीचा योग्य मोबदला यशवंतसिंगाच्या हातून त्याला मिळाला, या गोष्टीनें राणीला फार आनंद झाला. अर्थात्, मागील अपयश सर्व धुवून गेलें असें मानून तिनें आपल्या पतीचा गौरव केला.

खुज्वाची लढाई झाल्यानंतर कांहीं दिवस राजा यशवंतसिंग आपलें मजबूत ठाणें धरून स्वस्थ राहिला होता; परंतु पुढें थोडक्याच दिवसांनीं औरंगजेबाकडून त्याला आणखी एक पत्र आलें. त्यांत त्यानें 'आपण पुनःहि एकवार तुह्मांला क्षमा केली आहे' असें लिहून गुजरातची सुभेदारी पतकरण्यास सांगितलें. दिल्लीच्या बादशाही गादीबद्दल प्रस्तुत जो तंटा माजला आहे त्यांत मात्र इतःपर तुह्मीं पडूं नये' असें त्याला कळविलें होतें. या मोठ्या कामगिरीच्या आमिषास भुलून यशवंतसिंगानें ती गोष्ट मान्य केली.

राजा यशवंतसिंगाचा वडील मुलगा या वेळीं बराच मोठा झाला होता. त्याला बरोबर घेऊन तो गुजरातेंत गेला. त्या वेळीं मराठ्यांबरोबर मोगलांच्या ज्या लढाया झाल्या त्यांत मोगलांच्या बाजूनें लढून या बापलेकांनीं पुष्कळ कीर्ति संपादन केली. परंतु यशवंतसिंगाचे सर्व पराक्रम येथें सांगत न बसतां त्याच्या चरित्राच्या ज्या भागांत राणीचें अंग विशेष दिसून येतें त्याच भागाचें कथन करणें प्रस्तुत चरित्रांत आवश्यक असल्यामुळें, औरंगजेबाच्या पक्षाची पूर्णपणें बळकटी होऊन त्याची गादी बिनघोर होईपर्यंतची हकीगत आह्मांला सोडून देणें भाग आहे.

राजा यशवंतसिंग याचीं मागील कृत्यें औरंगजेब बादशहा विसरला होता, असें मुळींच नाहीं. त्याच्या कृत्यांचा पुरा सूड घेऊन जोधपूरच्या घराण्याचीं पाळेंमुळें खणून काढण्याची योग्य संधिच तो पहात होता. इसवी सन सोळाशें सत्तर सालीं अफगाणिस्तानांत बंड झालें. ही उत्तम संधि आहे असें बादशहास वाटून तें बंड मोडण्यासाठीं जें बादशाही सैन्य पाठविण्याची तजवीज होत होती त्या सैन्याचें आधिपत्य त्यानें राजा यशवंतसिंगास दिलें. तेथील रानटी आणि क्रूर लोक राजा यशवंतसिंगास आणि त्याच्या बरोबरच्या रजपुतांस परभारें ठार करून टाकतील, अशा आशेनेंच हें बिकट काम बादशहानें त्याला सांगितलें होतें.

ही कामगिरी मोठ्या मानाची आणि अत्यंत धाडसाची असल्यामुळेंच राजा यशवंतसिंगानें ती पत्करली. पराक्रम गाजविण्याची ही एक उत्तम अशी वेळ आहे, असें जाणून राणीहि आपल्या पतीबरोबर निघाली. आपल्या पतीचें यश आणि त्याच्यावर येतील तीं संकटें या दोहोंत भागीदार व्हावें या हेतूनें त्याच्याबरोबर निघतांना तिला अलोट आनंद झाला, हें सांगावयास नकोच.

या कामगिरीवर जातांना आपला वयांत आलेला वडील मुलगा वडिलार्जित राज्याच्या रक्षणासाठीं ठेवून धाकट्या दोन मुलांस बरोबर घेऊन जाण्याचा त्यांनीं बेत केला. जिकडेतिकडे सर्व व्यवस्था लागली अशी खातरी झाल्यावर प्रसंगीं आणीबाणीच्या वेळीं आपल्या उपयोगीं पडण्यासारखें निवडक सैन्य त्यांनीं बरोबर घेतलें, आणि अफगाण लोकांच्या बंदोबस्तास तीं दोघेंहि निघालीं.

राजा यशवंतसिंग अफगाणिस्तानांत जाऊन थोडे दिवस होतात न होतात तोंच जोधपुर येथें असलेला त्याचा वडील मुलगा पृथ्वी-

सिंग याला घातकी औरंगजेबानें आपल्या दरबारीं बोलावणें पाठविलें. कुमार पृथ्वीसिंग दरबारांत हजर होतांच त्या मानभावी बादशहानें त्याचा अत्यंत प्रेमपूर्वक आदरसत्कार करून आणि राण्याचें व राणीचें कुशल चिंतून त्यांच्यावर सोंपविलेली कामगिरी फत्ते करून राणा लौकरच परत यईल, अशी आशा प्रकट केली.

जरी यशवंतसिंगाच्या मुलाचा बादशहानें बाहेरून इतका आदर-सत्कार केला, तरी त्याला ठार करण्याचा त्यानें मनांत बेत केला होता. एके दिवशीं तो तरुण रजपूत सरदार बादशहाच्या भटीस गेला असतां बादशहानें त्याच्याशीं विशेष सलगी दाखवून त्याचे होन्ही हात घट्ट धरून " काय, रहाटो , तुझ्या बापाच्या बाहूंत जितकी शक्ति आहे तितकी तुझ्या बाहूंत आहे आणि तुझा स्वभावहि तुझ्या आईच्या स्वभावासारखा तेजस्वी आहे, असें मीं ऐकलें आहे. बोल, आतां तूं काय करशील ? " असें त्याला विचारलें.

" देवानें शहानशहास सुरक्षित राखावें. सरकारांनीं आपला संरक्षण करणारा हात एखाद्या क्षुल्लक प्रजाजनावर ठेवला तर त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतात. आपणतर माझे दोनहि हात कृपाळू होऊन धरले आहेत, तेव्हां मला तर असें वाटतें, कीं, मी सारें जग जिंकूं शकेन !" असें पृथ्वीसिंगानें ताबडतोब उत्तर दिलें.

कुमारानें हे आवेशानें उच्चारलेले बाणेदार शब्द ऐकून " ओहो ! हा तर दुसरा यशवंतसिंग आहे !" असें ह्मणून बादशहानें वरकांतीं फार खुष झाल्यासारखें दाखविलें. तत्काळ एक बहुमोल पोषाख आणवून तो पृथ्वीसिंगास बक्षिस दिला. पृथ्वीसिंगानें शिरस्त्याप्रमाणें तो तेथच्या तेथें अंगावर चढविला आणि आपणास लौकरच चांगली

बढती मिळेल अशी खातरी वाटून मोठ्या आनंदानें तो आपल्या छावणींत परत गेला.

हाय हाय! त्याच दिवशीं त्याची अखेर झाली! आपल्या छावणींत तो जातो न जातो इतक्यांत त्याच्या अंगाचा दाह होऊं लागला आणि हालहाल होऊन तडफडून त्यानें प्राण सोडला. बादशहानें दिलेल्या पोषाखास विष फांसलें असल्यामुळें त्याचा असा शेवट झाला, हाच समज लोकांचा अद्यापपर्यंत आहे.

औरंगजेबानें आपल्या क्रूरपणाची आणखीहि कमाल केली. पृथ्वीसिंग मृत्यु पावतांच तें वर्तमान राजा यशवंतसिंगास मुद्दाम जासूद पाठवून कळविलें व या शोचनीय गोष्टीनें आपणास अत्यंत दुःख झालें आहे असा राजा व राणी यांस निरोप पाठविला. आपल्या आवडत्या तरुण आणि शूर पुत्राचा असा अकालीं शेवट झालेला ऐकून त्या .माता-पितरांस पराकाष्ठेचा शोक झाला. त्या बिचाऱ्यांचें दुर्दैव येथेंहि थांबलें नाहीं. अफगाणिस्तानच्या हवेमुळें आजार होऊन बरोबर असलेले त्यांचे दोघेहि पुत्र मृत्यु पावले!

मुलगे मृत्युमुखीं पडल्यावर राजा यशवंतसिंगाचे फार दिवस गेले नाहींत. कोणी ह्मणत, कीं, पुत्रशोकानें काळीज फुटून तो मरण पावला. पण औरंगजेबाच्या हुकुमानें त्याला विषप्रयोग करण्यांत आला, असाच बऱ्याच लोकांचा समज आहे. त्यानें काबूलाहून जीवंत परत येऊं नये असा औरंगजेबानें पणच केला होता.

बादशहाचा खुनशी स्वभाव आणि राजा यशवंतसिंगाशीं असलेलें त्याचें हाडवैर हीं मनांत आणलीं, तर हा समज खरा ठरतो. जोंपर्यंत यशवंतसिंग जीवंत होता तोंपर्यंत औरंगजेबाच्या मनास स्वस्थपणा

ह्मणून मुळींच नव्हता, असें लोकमत असल्याचें जें एक तत्कालीन इतिहासकारानें लिहिलें आहे, त्यांत पुष्कळ तथ्यांश आहे.

राणीच्या दुःखास तर आतां पारावार नाहींसा झाला. ती अफगाणिस्तानच्या जंगलांत एकटी पडलेली. जवळ नवरा नाहीं, मुलगे नाहींत, अशा अडचणीच्या स्थितींत त्या शोकाकुल पतिव्रतेस जीवित दुःसह होऊन तिनें पतीच्या प्रेताबरोबर सती जाण्याचा निश्चय केला. परंतु थोड्याच दिवसांनीं ती प्रसूत व्हावयाची असल्यामुळें तिच्या विश्वासू नोकरांनीं तिला तसें करूं दिलें नाहीं.

आपल्या शूर राजाच्या मृत्यूची दुर्वार्ता जोधपूरच्या राजनिष्ठ प्रजेस समजतांच आपला धर्मसंरक्षक गेला ह्मणून सर्वांनीं अत्यंत शोक केला, व आतां आपणास कोणी तारणारा राहिला नाहीं या विचारामुळें त्यांची पूर्ण निराशा झाली. थोडे दिवस गेल्यावर काबूल येथें राणी सुरक्षितपणें प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्या मुलाचें नांव अजितसिंग असें ठेविलें. प्रवास करण्याइतकें सामर्थ्य अंगीं आल्यानंतर ती तेथून आपल्याबरोबरचे लोक घेऊन निघाली. राणी, तिच्या मुली, लहान अजितसिंग आणि राजा यशवंतसिंगाबरोबरचें सैन्य इतकी सर्व मंडळी दिल्लीस येऊन दाखल झाली. आपल्यावर आलेल्या दुःखकारक प्रसंगांची हकीगत बादशहास कळवून पुढें जोधपुर येथें जाण्याची त्यांनीं तयारी केली. परंतु येथेंहि बिचाऱ्या राणीचें दैव आडवें आलें. यशवंतसिंगाचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा बादशहाचा निश्चय असल्यामुळें त्यानें अजितसिंगास आपल्या स्वाधीन करावें असा राणीस आग्रह केला. तथापि राणीनें ती गोष्ट मान्य केली नाहीं. तिच्या शूर रजपूत शिपायांनींहि राणीचीच बाजू धरली.

बादशहानें तिच्याबरोबरच्या लोकांचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. राजपुत्रास आमच्या स्वाधीन करा ह्मणजे जोधपूरच्या सर्व जमिनी तुह्मांला वांटून देऊं, ह्मणून बादशहानें त्यांनां आशा दाखविली, व दुसरेहि बरेच प्रकार केले, परंतु त्यांनीं आपला रजपूतबाणा न सोडतां "आमचा मुलूख आह्मीं आमच्या मणगटाच्या जोरावर राखलेला आहे, त्याच जोरावर तो मुलूख आणि आमचा राजपुत्र यांचें आह्मी संरक्षण करूं!" असा रोकडा जबाब दिला.

दिल्लीहून जोधपुर येथें जाण्यास निघतांना त्यांनीं लढाईचीच तयारी केली. राणी आणि आपला छोटा राजपुत्र यांच्या संरक्षणाची तजवीज काय करावी, हा त्यांनां पहिला विचार पडला. या अडचणींत रजपूतलोक पडले असतां राणीनेंच तोड काढली. ती ह्मणाली "काय होईल तें होवो, येथून सर्वांची सुटका व्हावी ह्मणून आतां जी आपणास निकराची लढाई करावी लागणार तींत सवाबरोबर येईल तो प्रसंग सोसण्यास मी सिद्ध आहें."

राणी एवढेंच सांगून स्वस्थ राहिली नाहीं, तर राजपुत्राविषयीं जी तजवीज करावयाची तिचीहि सर्व जबाबदारी आपणावरच सोंपवावी, असें तिनें निक्षून सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं राजपुत्रास तिनें एका मिठाईच्या करंड्यांत निजविलें व तो करंडा एका मुसलमानाच्या हवालीं केला. या प्रसंगात राजघराण्यावर आलेला दुर्धर प्रसंग पाहून त्या मुसलमानासहि दया आली. त्यानें "राजपुत्रास बाहेर नेऊन त्याला तुमच्यापैकीं कोणी ठरलेल्या जागीं येईल तेव्हां त्याच्या हवालीं करीन. तेथपर्यंत त्याच्या केंसालाहि धक्का लागूं देणार नाहीं" अशी कुराणावर हात ठेवून शपथ घेतली.

सदर्हु मुसलमान तो करंडा घेऊन शहराच्या बाहेर पडल्यावर पुढें विचार काय ठरवावा, या प्रश्नाचा खल करण्यास मंडळी जमली. त्यांच्याबरोबर असलेल्या बायकांची आणि मुलांची धडगत मुळींच दिसेना. त्यांनां तेथेंच ठेवावीं, तर तीं शत्रूच्या हातीं पडून त्यांची हालअपेष्टा होण्यास चुकणार नाहीं. ह्मणून अखेरीस निर्वाणीचाच उपाय करण्याचा बेत ठरला. बंदुकीच्या दारूचीं कैक पोतीं एका खोलींत रचून, राणीशिवाय त्यांच्याबरोबर जितक्या बायका होत्या तितक्या सर्वांनां त्या खोलींत घालून खोलीला बत्ती दिली ! याप्रमाणें त्या शूर रजपुतांनीं आपल्या बायकांच्या अब्रूचा बचाव केल्यानंतर प्रत्येकानें ढालतरवार सज्ज करून रोजच्यापेक्षां दुप्पट अफू चढविली. याप्रमाणें हातावर शीर घेऊन लढाईस तयार झालेल्या लोकांनिशीं वाड्याचा बाहेरचा दरवाजा उघडून राणी एकदम बाहेर पडली. त्या वाड्यास बादशाही फौजेचा आधींच गराडा पडलेला होता, तेव्हां तत्काळ लढाईस सुरवात झाली. या वेळीं निराशेचें उत्कट धैर्य प्रत्येकाच्या अंगीं बाणलें असल्यामुळें एकेक रजपूत शिपाई भयंकर योद्धा बनला होता. दुष्ट शत्रूचे जितके लोक बरोबर नेतां येतील तितके नेऊन स्वर्गाचा मार्ग धरण्याचा प्रत्येकाचा निश्चयच झालेला, मग काय विचारावें ! रजपुतांनीं लढाईची शिकस्त केली. समरभूमीवर पुष्कळ पडले, परंतु शत्रूचे लोक त्यांनीं कितीतरी पाडले. शेवटीं भयंकर कापाकापी करीत दिल्लीशहरच्या रस्त्यांतून शहराबाहेर जेव्हां राणी पोहोंचली तेव्हां तिच्याबरोबर फारच थोडे लोक शिल्लक राहिले होते. ही लढाई केवळ हिंदुस्तानच्याच नव्हे, तर साऱ्या जगाच्या इतिहासांत ज्या आश्चर्यकारक गोष्टी घडून आल्या आहेत त्यांतील एक होय.

इतकी स्वामिभक्ति, इतकें शौर्य आणि इतका निश्चय अन्य ठिकाणीं क्वचित्च दिसून येईल !

शिल्लक राहिलेल्या आपल्या थोड्याशा शूर योद्ध्यांनिशीं राणी जेव्हां शहराबाहेर पडली, तेव्हां वर सांगितलेल्या त्या मुसलमानाचा तिनें प्रथम शोध केला. त्या मुसलमानानेंहि कबूल केल्याप्रमाणें आपलें काम नेकीनें बजाविलें होतें. अजितसिंगास यत्किंचित्हि इजा न होतां तो अगदीं सुखरूप होता. अत्यंत आनंदानें राणीनें त्याला उचलून घेतलें व लगेच तिनें मोठ्या त्वरेनें प्रयाण केलें. आपला नातेवाईक जो मेवाडचा राणा त्याच्या मुलुखांत जाऊन पोहोंचेपर्यंत ती वाटेंत मुळींच थांबली नाहीं. तेथें जाऊन पोहोंचल्यावर अजितसिंगास तिनें राण्याच्या पदरांत टाकलें व तो मोठा होईपर्यंत त्याचें संरक्षण करण्याची त्याला विनंति केली.

जोधपूरच्या राणीच्या या प्रार्थनेस योग्य मान मिळून मेवाडच्या राण्यानें अजितसिंगास सुरक्षित स्थळीं ठेवण्याची तजवीज केली. छोट्या राजपुत्राच्या संरक्षणार्थ चांगल्या विश्वासू माणसांची योजना करून राण्यानें त्याला अबूच्या पहाडावर ताबडतोब रवाना केलें व तेथें असलेल्या मठांत एका साधूच्या मार्फत त्याच्या संगोपनाची उत्तम प्रकारें व्यवस्था लावण्यांत आली.

राजपुत्र अजितसिंग याची अशा प्रकारें व्यवस्था लागल्यावर जोधपूरची राणी मेवाड येथून निघाली आणि आपल्या राजधानीच्या शहरीं येऊन राहिली. त्या ठिकाणीं त्या वीरस्त्रीनें आपला लहान अजित वयांत येईपर्यंत बरींच वर्षें औरंगजेबाच्या सर्व कारस्थानांपासून, त्याचप्रमाणें आपल्या घराण्याच्या दुसऱ्याहि शत्रूंपासून मोठ्या शिताफीनें आपल्या राज्याचें संरक्षण करून प्रजेचें उत्तम प्रकारें परिपालन

केलें. पुढें अजितसिंग मोठा झाल्यावर त्याचे पराक्रम आपल्या डोळ्यांनीं पाहण्यास जरी ती जीवंत राहिली नाहीं, तरी जोधपुर शहर आणि जोधपूरचें राज्य यांची एक वेळ नष्ट झालेली भरभराट त्यांनां फिरून प्राप्त झालेली तिनें पाहिली.

या प्रकारें आपलें ऐहिक कर्तव्य उत्तम रीतीनें बजावून व मोठमोठ्या राजकार्यधुरंधर आणि समरधीर अशा नरश्रेष्ठांसहि कष्टसाध्य अशी कीर्ति मार्गे ठेवून या बाणेदार आणि कर्तव्यतत्पर वीरस्त्रीनें बराच वृद्धापकाळ झाल्यावर इहलोकाचा त्याग करून आपला शूर पति जो राजा यशवंतसिंग त्याच्याबरोबर शाश्वत सुखाचा अनुभव घेण्यासाठीं मोठ्या आनंदानें स्वर्गलोकीं प्रयाण केलें.

## सुलताना रझिया.

रझिया बेगम ही दिल्लीश्वर अल्तमश याची मुलगी होय. तातरींतील एका बड्या सरदाराचा अल्तमश हा अत्यंत आवडता मुलगा होता. इतर भावांनां याच्याविषयीं मत्सर उत्पन्न होऊन त्यांनीं एकदां शिकार करीत असतां याच्या अंगावरील सर्व वस्त्रें आणि अलंकार काढून घेतले व त्याला एका व्यापाऱ्याला गुलाम ह्मणून विकून टाकिलें. या व्यापाऱ्यानें पुढें अल्तमशला बुखाऱ्याच्या राजास विकलें. बुखाऱ्याच्या राजघराण्यांत अल्तमशला चांगलें शिक्षण मिळालें होतें. पुढें राजा मरण पावल्यावर अल्तमशची कर्मदशा पुनः ओढवून त्याला पुनः विक्रावयास बाहेर काढलें व तो बुखारा येथील एका व्यापाऱ्याच्या पदरीं पडला. त्या व्यापाऱ्यानें त्याला गिझनी येथें नेलें.

या वेळीं गिझनीच्या तक्तावर महंमद घोरी हा होता. अल्तमशचें सौन्दर्य आणि बुद्धिमत्ता हीं बादशहाच्या कानीं जातांच त्याला विकत घेऊन आपल्या पदरीं ठेवावें अशी घोरीस इच्छा झाली. परंतु ज्या व्यापाऱ्यानें त्याला विकावयासाठीं आणिला होता तो त्याची फाजील किंमत मागूं लागल्यामुळें बादशहानें त्याला विकत घेण्याचें नाकारलें. बादशहानें नाकारल्यामुळें दुसराहि कोणी त्याची जास्त किंमत देण्यास तयार होत नाहीं असें पाहून तो व्यापारी अल्तमशला पुनः बुखारा येथें घेऊन गेला.

कांहीं दिवस लोटल्यावर महंमद घोरीचा सरदार कुतुबुद्दिन यानें बादशहाच्या परवानगीनें अल्तमशला विकत घेतलें. सरदार कुतुबुद्दिन याच्या कुटुंबांतील सर्व माणसांनां अल्तमश फार आवडूं लागला. हळुहळू कुतुबुद्दिनाची त्याच्यावर अत्यंत मर्जी बसून तो दास्यत्वांतून मुक्त झाला. स्वतंत्र झाल्यावर अल्तमशला मोठा रोजगार मिळाला; इतकेंच नव्हे, तर कुतुबुद्दिन यानें त्याला आपली मुलगीहि दिली. महंमद घोरी मेल्यावर दिल्लीचें सिंहासन कुतुबुद्दिन यास प्राप्त झालें. पुढें कुतुबुद्दिनाच्या मृत्यूनंतर सर्व सरदारांच्या अनुमतानें अल्तमश यालाच दिल्लीची गादी मिळाली. बादशहाला मुलगा होता, परंतु त्याला लोक अनुकूल नसल्यामुळें त्याचा हक्क बाजूस राहिला.

अल्तमश याला बरींच मुलें झालीं. त्या सर्वांत अत्यंत प्रसिद्धीस आलेली ह्मटली ह्मणजे ही रझिया बेगम होय. अल्तमश हा अत्यंत देखणा पुरुष असल्यामुळें त्याचीं मुलेंहि त्याच्यासारखींच देखणीं होतीं; तथापि त्या सर्वांत रझियेचें सौंदर्य विशेष होतें. या सौंदर्याशिवाय, तरुण मुलींत तर राहोच, पण मुलांतदेखील जें चातुर्य आणि शहाणपण सांपडावयाचें नाहीं तें रझियेच्या ठायीं भरपूर होतें.

बापाची तिच्यावर अत्यंत ममता असे. त्यानें तिला उत्तम शिक्षण दिलें होतें. त्यानें स्त्रीजातीच्या कर्तव्यांत तिला तरबेज केलेंच होतें, पण राजनीतिशास्त्र आणि राज्यकारभारासंबंधीं सर्व विषयहि तिला काळजीपूर्वक पढविले होते. दुर्दैवेंकरून तिच्या आईचा स्वभाव फार कडक व अविचारी असा होता. अंतःपुरांतील उष्ण वातावरणांत बापाकडून मिळालेल्या शिक्षणाचा परिणाम जरी थोडाबहुत कमी होत असे, तरी रझिया जसजशी वाढूं लागली तसतशी ती जास्त विचारी, विद्याव्यसनी, ममताळू आणि शुद्ध अंतःकरणाची अशीच बनत चालली.

रझिया वयांत आली तेव्हां तिच्या बापानें, कुतुबुद्दिन बादशहानें ज्या कामाची सुरुवात केली होती तो 'कुतुब मिनार' नांवाचा आश्चर्यजनक आणि अत्यंत सुंदर बुरूज पुरा करण्याचें काम आरंभिलें. काम पुरें झाल्यावर तत्संबंधानें झालेल्या टोलेजंग समारंभाच्या वेळीं ही विद्याचारसंपन्न राजकन्या हजर होती. त्या प्रसिद्ध स्तंभावर खोद-लेल्या वाक्याची रचना खुद्द रझियेनेंच केली होती, असें ह्मणतात. कुतुबुद्दिन बादशहाच्या वेळीं पहिला मजला तयार झालेला होता. अल्तमश यानें त्याच्यावर आणखी पांच मजले चढविले. या स्तंभाची उंची दोनशें चौतीस फूट असून त्याच्या पायाचा व्यास सत्तेचाळीस फूट आहे. अर्थात् हा वर निमूळता होत गेलेला आहे व अगदीं खालच्या मजल्यापासून वरपर्यंत सभोंवार पायऱ्यांचा जिना असून तो चढतांना मुळींच अडचण पडत नाहीं. अगदीं वरच्या मजल्याचा व्यास नऊ फूट आहे. त्याच्या शिखरावर आरूढ झालें असतां राज-धानीच्या आसपास कैक मैलपर्यंत सर्व प्रदेशाचा अत्यंत मनोरम असा देखावा दृष्टीस पडतो.

रझिया हिला समजूं लागल्यावर या आश्चर्यभूत स्तंभाचें चालत असलेलें काम ती फार उत्सुकतेनें पाहत असे. जसजसें हें काम पूर्णत्वास येऊं लागलें तसतसा तिला जो आनंद होत असे, तो केवळ अपूर्व होता. काम पुरें झालें, तेव्हां बादशहाबरोबर अगदीं वरच्या शिखरापर्यंत चढून सभोंवारच्या अतिशय रमणीय देखाव्याच्या अपूर्व दर्शनसुखाचा आस्वाद घेतांना तिला जो हर्ष झाला, त्याचें वर्णन करतां येत नाहीं.

इसवी सन १२२६ सालीं दक्षिणेंतील स्वतंत्र राज्यें काबीज करण्याच्या उद्देशानें अल्तमश बादशहा दिल्लीहून सैन्यानिशीं निघाला. या स्वारींत त्याचा पूर्ण जय झाला; परंतु या कामांत त्याचीं सहा वर्षे गेलीं. बादशहाच्या गैरहजिरींत राज्यकारभार कोणाकडे सोंपवावा, हा महत्त्वाचा प्रश्न उभा राहिला, तेव्हां बादशहाचे वयांत आलेले वीस मुलगे जरी हयात होते तरी सर्वानुमतें या कामीं रझिया हिचीच योजना करण्यांत आली. बादशहानें जातांना आपल्या गादीवर रझियाची स्थापना केली व "जरी माझे वीस मुलगे आज हयात आहेत तरी राज्यसत्तेचें ओझें त्या सर्वांस जड जाईल; परंतु या माझ्या कोमल रझियेला तें ओझें मुळींच वाटावयाचें नाहीं. या विसांच्या अंगांत जितकें पाणी आहे त्यापेक्षां तें माझ्या या मुलीच्या अंगीं जास्त आहे !" असे अभिमानानें उद्गार काढले; आणि बादशहाच्या गैरहजिरींत तिनें अशा उत्तम रीतीनें राज्यकारभार हांकला, कीं, तिच्याविषयीं लोकांस आरंभीं जें वाटलें होतें तें खरें झालें.

रझिया ही तरुण होती, तथापि आपली जबाबदारी पूर्णपणें ओळखून तिनें कारभारास सुरुवात केली. आपला निश्चय कायम रहावा, न्यायाचा आणि शहाणपणाचा मार्ग कधीं सुटूं नये म्हणून

तिनें परमेश्वराची प्रार्थना केली, आणि राज्याच्या बंदोबस्ताचें काम इतक्या चोख न्यायानें व नेटानें चालविलें, कीं, तिच्या भावांस बादशहानें केलेली योजनाच योग्य होती असें कबूल करणें भाग पडलें. पुढें सहा वर्षांनीं ह्मणजे १२३२ सालीं बादशहा स्वारीवरून दिल्लीस परत आला तेव्हां राज्यकारभाराचीं सूत्रें तिनें त्याच्या हातीं दिलीं आणि पूर्वीप्रमाणें एखाद्या ममताळू आणि आज्ञाधारक मुलीप्रमाणें ती वागूं लागली.

दक्षिणेंतून परत आल्यावर चारच वर्षें राज्यकारभार चालवून अल्तमश मरण पावला. प्रिय पित्याच्या मृत्यूमुळें रझिया हिला अतोनात दुःख झालें. बादशहाच्या पश्चात् त्याचा मुलगा फिरोज हा गादीवर बसला. हा कमकुवत बुद्धीचा आणि दुष्ट अंतःकरणाचा असल्यामुळें सर्वस्वी आपल्या आईच्याच तंत्रानें वागत असे. सर्व राज्यकारभार आईकडे सोंपवून आपण नाचतमाशांत दंग असे. फिरोज बादशहानें ख्यालीखुशालींत पुष्कळच पैसा उडविला होता. इकडे त्याच्या आईनें जुलमी राज्यपद्धति चालू केल्यामुळें जिकडेतिकडे बंडें उद्भवलीं. अखेरीस सात महिनेपर्यंत अशा रीतीनें राज्य केल्यानंतर त्रासून गेलेल्या प्रजेनें त्याला पदच्युत केलें.

फिरोज बादशहा पदच्युत झाल्यानंतर गादीवर कोणाची स्थापना करावी, हा प्रश्न उत्पन्न झाला. बहुतेक लोकांच्या मनांत रझिया हिलाच गादी द्यावी असें आलें. आपल्या अमीरउमरावांच्या आग्रहापुढें नाइलाज होऊन तिनें गादी चालविण्याचें कबूल केलें आणि 'सुलताना रझिया' अथवा 'चक्रवर्तिनी रझिया' असें नांव धारण करून ती सिंहासनावर आरूढ झाली. जिकडेतिकडे अंदाधुंदी माजली असतांना सर्व लोकांच्या अनुमतानें आणि उघडपणें राज्यकारभाराचीं

सर्व सूत्रें मुकत्यारीनें हातांत वागवणारी स्त्री, ह्मणजे त्या वेळीं आमच्या देशांत ही एक अपूर्वच गोष्ट घडून आली, असें ह्मटलें पाहिजे.

सुलताना रझिया हिची जरी वरकांती सर्वानुमतें बादशाही सिंहासनावर स्थापना झाली होती, तरी सर्वच उमराव तिला अनुकूल नव्हते. ज्या दोन तटांतील सरदारांनीं एक होऊन फिरोज याला गादीवरून काढून टाकिलें होतें, त्यांतील एका तटांतील सरदारांस या गोष्टीविषयीं बरें वाटलें नाहीं. सुलताना रझिया हिच्या अंगीं राज्यकारभारास अवश्य असे गुण नव्हते ह्मणून ही मंडळी नाखुष होती, अशी गोष्ट नाहीं. तर रझिया ही स्त्री असून तिचें साम्राज्य आपण कबूल केलें, याविषयींच त्यांच्या मनांत खंति वाटत असे. हळुहळू या नाखुषीचें उग्र स्वरूप दिसूं लागलें. या उमरावांनीं सैन्य गोळा करून पदच्युत झालेल्या बादशहाच्या वजिरास मुख्य केलें आणि दिल्लीवर स्वारी केली. रझियाच्या सैन्याचा या सैन्यापुढें टिकाव लागला नाहीं. परंतु जी गोष्ट आपल्या सैन्याकडून झाली नाहीं ती तिनें आपल्या शहाणपणानें घडवून आणिली. आपल्या शत्रूंपैकीं कांहींजणांवर आपली मर्जी आहे असें भासवून त्यांच्यांत आणि इतर उमरावांत तिनें चुरस उत्पन्न केली. अर्थात्, त्यांची आपापसांत फाटाफूट होऊन सर्वच तिचे ताबेदार झाले. या लोकांपैकीं ज्यांच्याकडून आपणास विशेष उपद्रव होईल असें तिला वाटलें त्यांनां तिनें देहांत शिक्षा दिली व इतरांस आपल्या स्वाभाविक औदार्याच्या वागणुकीनें आपलेसे करून घेतलें. याप्रमाणें तिनें सर्व गडबडी मोडून जिकडेतिकडे शांतता केली.

यापुढें दोन वर्षें तिचा राज्यकारभार फारच उत्तम रीतीनें चालला. रझिया हिचें राजनीतिचातुर्य जसें श्रेष्ठ प्रतीचें होतें, तशीच अंतस्थ

कारभारांतहि तिची दक्षता वाखाणण्यासारखी होती. ती नित्य सुल-तानी पेहराव करून दरबारांत बसत असे. स्त्रीजातीचा पोषाख व पडदा तिनें टाकून दिला होता. पुरुषाप्रमाणें डोकीस ती टोपी घाली. अर्जदारांचे अर्ज ती स्वतः ऐके, आणि कोणताहि आडपडदा न ठेवतां अगदीं उघडपणें हत्तीवर बसत असे. आपलीं राज्यव्यवस्थेचीं कामें ती अगदीं मनापासून व सदसद्विवेकबुद्धिपूर्वक करीत असे.

माजी कारकीर्दींत जी अंधाधुंदी झालेली होती ती सर्व मोडून तिनें व्यवस्था केली आणि चांगल्या सुधारणा अमलांत आणिल्या. जुने कायदे दुरुस्त केले, महत्त्वाच्या वादांचा निकाल लाविला आणि एकंदर राज्यव्यवस्थेचें काम इतक्या चतुराईनें हांकिलें, कीं, ही स्त्री नसून कोणी एखादा न्यायी आणि कर्तृत्वकुशल बादशहाच आहे, असें परक्यांस वाटलें.

हा वेळपर्यंत विवाह अगर तत्संबंधींचे विचार तिच्या मनात आल्याचें कांहींच दिसून आलें नाहीं. निदान इतिहासांत तरी तशा प्रकारची हकीगत निश्चयात्मक अशी आढळून येत नाहीं. ती लहान असतांना तिचें सौंदर्य पाहून पुष्कळांचें मन तिच्याकडे आकर्षित झालें होतें. परंतु आजपर्यंत तिनें कोणासच उत्तेजन दिलें नव्हतें. बादशाही सिंहासनावर आरूढ होईपर्यंत तिच्या मनाचा या बाबतींत स्पष्ट असा कल दिसल्याचें कोठेंच वाचण्यांत आलेलें नाहीं. नंतर मात्र, तिच्या मनाची ही स्थिति फार वेळ राहिली नाहीं. रझिया हिच्या पदरीं एक हबशी सरदार घोडेस्वारांवर मुख्य होता. ह्या सरदाराचे आरंभींचे दिवस गुलामगिरींत गेले होते हा रूपानें सुंदर, चतुर आणि रझिया-सारख्या स्त्रीचें मन बसण्याइतक्या योग्यतेचा होता. परंतु या हलक्या दर्जाच्या माणसावर सुलतानेचें मन बसलेलें पाहून तिच्या सरदारांस

वाईट वाटलें, घोड्यावर बसावयाचें असेल तेव्हां हा हबशी सरदार सुलतानेला वर उचलून ठेवीत असे. ह्यापलीकडे तिनें त्याच्याशीं कोणत्याहि प्रकारची सलगी ठेविली नव्हती. तिच्या शुद्ध कीर्तीस डाग लागण्यासारखें तिच्याकडून वर्तन मुळींच झालें नव्हतें. सुलताना रझिया हिच्या अंगीं सर्व सद्गुण वास करीत होते, आणि तिचें वर्तन बारीक दृष्टीनें पाहणारास तिच्या स्त्रीत्वापलीकडे कोणताहि दोष दिसून येण्यासारखा नव्हता, असें फेरिस्ता म्हणतो.

सुलतानेचें मन ह्या हबशी सरदारावर बसलें होतें, ही गोष्ट मात्र खरी. संधि पाहून त्याला योग्यतेस चढवावें आणि त्याला आपला पति करून उभयतांनीं राज्यसुख अनुभवावें, हा तिच्या मनांतील बेत बऱ्याच लोकांनां कळून चुकला होता. परंतु ह्या प्रीतीचा शेवट चांगला झाला नाहीं. आपल्या प्रियकरास योग्यतेस चढवितेवेळीं सुलतानेलाच अपाय झाला. ह्या सरदारास मुख्य सेनापतीची म्हणजे अमीर-अल-उमराची पदवी सुलतानेनें दिलेली पाहतांच सर्व सरदारांचा क्रोध अनावर झाला आणि त्यांनीं उघड रीतीनें बंड केलें.

अल्टुनिया नांवाचा तुर्की सरदार बंड करण्यास प्रथम प्रवृत्त होऊन त्यानें सैन्याची जमवाजमव केली. ही गोष्ट सुलताना रझिया हिला समजतांच ती आपल्या प्रचंड सैन्यानिशीं त्याच्या ठाण्यावर एकदम हल्ला करण्यास निघाली. परंतु वाटेंत तिच्याच सैन्यानें बंड करून तिचा आवडता जो हबशी सरदार त्याला तिच्या समक्ष ठार केलें. ह्या कृत्यानें सुलताना रझिया हिला इतका अनावर क्रोध आला, कीं, तिच्या सरदारांस आपल्या बचावासाठीं तिला अटकेंत ठेवणें भाग पडलें. त्यांनीं तिला कैद तर केलेंच. इतकेंच नव्हे तर तिच्या विनवणीकडे लक्ष्य न देतां तिला शत्रूच्या स्वाधीन केलें. लगेच त्या

सरदारांनीं दिल्लीकडे माघार खाऊन रझियाचा भाऊ बेहराम याला सिंहासनावर बसविलें. हा बेहराम अत्यंत नीच आणि बदफैली माणूस होता.

बेगमेस शत्रूच्या स्वाधीन करतांना तिच्या सरदारांस आपण काय करीत आहों ह्या गोष्टीचें भान मुळींच राहिलें नव्हतें. तिचा शत्रु जो तुर्की सरदार, त्याला तिची शोचनीय स्थिति पाहून दया आली आणि तिच्या स्वातंत्र्यास त्यानें बिलकुल धक्का लाविला नाहीं. इतकेंच नव्हे, तर सुलताना रझिया हिचें सौंदर्य आणि वर्तन पाहून त्याला फार आनंद झाला आणि त्यानें आपलें अंतःकरण तिला अर्पण केलें. त्या तुर्की सरदाराचें शौर्य आणि अनुपम औदार्य ह्यांचा रझियेच्या मनावर इतका परिणाम झाला, कीं, ती त्याला वरण्यास कबूल झाली. मोठ्या थाटानें बतिन्दा येथें त्या उभयतांचा लग्नसमारंभ झाला.

बतिन्दा येथील किल्ल्यांत तीं उभयतां कांहीं दिवस राहिलीं. नंतर आपल्या महत्त्वाच्या कामाकडे त्यांचें लक्ष्य लागून त्यांनीं मोठें सैन्य जमा केलें व राज्य परत मिळविण्यासाठीं तीं दिल्लीकडे निघालीं. बिचाऱ्या रझियेचें दैव फिरलें तें फिरलेंच! तिच्याबरोबरच्या सैन्यानें आपली पराकाष्ठा केली, परंतु शत्रूचा जोर विशेष होऊन तिला माघार घ्यावी लागली. पुढेहि आणखी दोन लढाया झाल्या व उभय पक्षांचा पुष्कळ नाश होऊन रझिया आपल्या पतिसहवर्तमान शत्रूच्या हातीं सांपडली. त्या दुष्टांनीं तिला व तिच्या पतीला ठार मारलें.

अखेरपर्यंत रझियेनें आपला बाणा सोडला नाहीं. चार वर्षें उत्तम रीतीनें बादशाही अधिकार चालविल्यावर तिचा भाग्यसूर्य अस्तंगत झाला. ती मरण पावल्यावर तिचें शहाणपण, कार्यकौशल्य आणि सौंदर्य इत्यादि गुण आठवून तिच्यासाठीं पुष्कळ लोक हळहळले.

# रूपनगरची राजकन्या.

रूपनगरच्या राजकन्येची बाळपणची हकीगत फारशी उपलब्ध नाहीं. हिचा जन्म एका प्रख्यात रजपूत घराण्यांत झाला होता. तरी ही तारुण्यावस्थेंत असतांना जी एक विशेष गोष्ट घडून आली ती घडली नसती, तर ही ज्या घराण्यांत जन्मली त्या घराण्याच्या मुलखापलीकडे हिचें नांव फारसें कोणासहि माहित झालें नसतें. रूपनगरच्या राजकन्येचा देशाभिमान, हिची धर्मश्रद्धा, हिचें शौर्य आणि हिचा रजपूत बाणा वगैरे गुणांनीं त्या गोष्टीला ऐतिहासिक महत्व प्राप्त झालें आणि त्या वेळेपासून आजपर्यंत भरतखंडांत तिची ख्याति एकसारखी गाजत आहे. धर्म हा आमच्या राष्ट्राचा जीव होय; आणि ह्या धर्मरूपी राष्ट्रीय जीवितावर जेव्हांजेव्हां प्रसंग आले, तेव्हांतेव्हां ज्या ज्या राष्ट्रीय स्त्रीपुरुषांनीं आपल्या अलौकिक गुणांनीं त्याचें संरक्षण करून इतिहासाची दिशा बदलली, त्यांत या रूपनगरच्या राजकन्येचें नांव प्रमुखत्वानें गणण्यासारखें आहे.

शहाजहान बादशहाची आई मेवाडच्या रजपूत घराण्यांत जन्मली होती. त्याप्रमाणें त्याचा बाप जो जहांगीर, त्याची आईहि रजपूत कुळांतलीच होती. परंतु औरंगजेबाची आई, ही प्रख्यात नूरजहानची पुतणी ( तिच्या भावाची मुलगी ) असल्यामुळें अर्थात्‌च आईकडून त्याचा कोणत्याहि रजपूत घराण्याशीं संबंध नव्हता. आणि ही आपल्यामध्यें मोठीच उणीव आहे असें औरंगजेबास वाटत असे. कोणत्याहि रजपूत घराण्याशीं साक्षात् रक्तसंबंध नसल्यामुळें त्याच्या कारकिर्दीच्या आरंभीं व पुढेंहि अखेरपर्यंत रजपूतलोकांची सहानुभूति त्याला मिळाली नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट त्यांच्यापासून त्याला

पुष्कळच त्रास भोगावा लागला. राजकर्त्यांनीं प्रजाजनांतील प्रमुख जातीशीं शरीरसंबंध ठेविल्यास त्यांच्या राज्यास विशेष बळकटी येत असते. जहांगीर आणि शहाजहान यांच्या कारकीर्दींत मोंगलांचें राज्य जसें सुरक्षित होतें तसें पूर्वी कधींहि नव्हतें व या कारकीर्दींत हिंदु लोकांस जसें स्नेहानें आणि सलोख्यानें वागविलें जात असे तशा प्रकारची वागणूक त्यांनां कधींहि मिळाली नव्हती.

आपल्यामधील ही उणीव निदान पुढें आपल्या वारसांत तरी राहूं नये ह्मणून औरंगजेबानें रजपूत कुळांत जन्मलेल्या स्त्रियांशीं लग्नसंबंध केला. ह्या संबंधापासून त्याला मुलेंहि झालीं होतीं. बादशहाचें हेंच धोरण रूपनगरच्या राजकन्येस प्रसिद्धीस येण्यास कारण झालें. औरंगजेबासाठीं रजपूत घराण्यांतील अविवाहित कन्यांचा तपास करण्याच्या कामावर जे लोक नेमिले होते, त्यांच्या दृष्टीस या राजकन्येचें अलौकिक सौंदर्य पडून त्यांनीं तिचें थोर कूळ आणि अप्रतिम लावण्य हीं बादशहास निवेदन केलीं. अर्थात् या राजकन्येशीं आपण विवाह करावा, असा बादशहाचा निश्चय झाला. त्यानें ताबडतोब आपला वकील पाठवून तिच्याबद्दल मागणी घातली आणि तिला दिल्लीस आणण्यासाठीं दोन हजार स्वार पाठविले.

बादशहाची मागणी जाण्याचा अवकाश, कीं, झालें तावडतोब काम! असा प्रकार औरंगजेबासंबंधानें हा वेळपर्यंत झाला होता. येथेंहि आपली कार्यसिद्धि तशीच तावडतोब होईल, अशी त्याची खातरी होती; परंतु रूपनगरची राजकन्या कांहीं सामान्य स्त्री नव्हती! ती स्वतंत्र इच्छेची आणि तेजस्वी स्त्री असल्यामुळें आपण जरी बादशहा आहों तरी सर्वच कांहीं आपल्या इच्छेप्रमाणें होणार नाहीं, असा औरंगजेब बादशहास या बाबतींत पक्का अनुभव आला. स्वधर्मीयांचा

राजा यशवंतसिंग याचीं मागील कृत्यें औरंगजेब बादशहा विसरला होता, असें मुळींच नाहीं. त्याच्या कृत्यांचा पुरा सूड घेऊन जोधपूरच्या घराण्याचीं पाळेंमुळें खणून काढण्याची योग्य संधिच तो पहात होता. इसवी सन सोळाशें सत्तर सालीं अफगाणिस्तानांत बंड झालें. ही उत्तम संधि आहे असें बादशहास वाटून तें बंड मोडण्यासाठीं जें बादशाही सैन्य पाठविण्याची तजवीज होत होती त्या सैन्याचें आधिपत्य त्यानें राजा यशवंतसिंगास दिलें. तेथील रानटी आणि क्रूर लोक राजा यशवंतसिंगास आणि त्याच्या बरोबरच्या रजपुतांस परभारें ठार करून टाकतील, अशा आशेनेंच हें बिकट काम बादशहानें त्याला सांगितलें होतें.

ही कामगिरी मोठ्या मानाची आणि अत्यंत धाडसाची असल्यामुळेंच राजा यशवंतसिंगानें ती पत्करली. पराक्रम गाजविण्याची ही एक उत्तम अशी वेळ आहे, असें जाणून राणीहि आपल्या पतीबरोबर निघाली. आपल्या पतीचें यश आणि त्याच्यावर येतील तीं संकटें या दोहोंत भागीदार व्हावें या हेतूनें त्याच्याबरोबर निघतांना तिला अलोट आनंद झाला, हें सांगावयास नकोच.

या कामगिरीवर जातांना आपला वयांत आलेला वडील मुलगा वडिलार्जित राज्याच्या रक्षणासाठीं ठेवून धाकट्या दोन मुलांस बरोबर घेऊन जाण्याचा त्यांनीं बेत केला. जिकडेतिकडे सर्व व्यवस्था लागली अशी खातरी झाल्यावर प्रसंगीं आणीबाणीच्या वेळीं आपल्या उपयोगीं पडण्यासारखें निवडक सैन्य त्यांनीं बरोबर घेतलें, आणि अफगाण लोकांच्या बंदोबस्तास तीं दोघेंहि निघालीं.

राजा यशवंतसिंग अफगाणिस्तानांत जाऊन थोडे दिवस होतात न होतात तोंच जोधपुर येथें असलेला त्याचा वडील मुलगा पृथ्वी-

सिंग याला घातकी औरंगजेबानें आपल्या दरबारीं बोलावणें पाठविलें. कुमार पृथ्वीसिंग दरबारांत हजर होतांच त्या मानभावी बादशहानें त्याचा अत्यंत प्रेमपूर्वक आदरसत्कार करून आणि राण्याचें व राणीचें कुशल चिंतून त्यांच्यावर सोंपविलेली कामगिरी फत्ते करून राणा लौकरच परत यईल, अशी आशा प्रकट केली.

जरी यशवंतसिंगाच्या मुलाचा बादशहानें बाहेरून इतका आदर-सत्कार केला, तरी त्याला ठार करण्याचा त्यानें मनांत बेत केला होता. एके दिवशीं तो तरुण रजपूत सरदार बादशहाच्या भटीस गेला असतां बादशहानें त्याच्याशीं विशेष सलगी दाखवून त्याचे दोन्ही हात घट्ट धरून " काय, रहाटो , तुझ्या बापाच्या बाहूंत जितकी शक्ति आहे तितकी तुझ्या बाहूंत आहे आणि तुझा स्वभावहि तुझ्या आईच्या स्वभावासारखा तेजस्वी आहे, असें मीं ऐकलें आहे. बोल, आतां तूं काय करशील ? " असें त्याला विचारलें.

" देवानें शहानशहास सुरक्षित राखावें. सरकारांनीं आपला संरक्षण करणारा हात एखाद्या क्षुल्लक प्रजाजनावर ठेवला तर त्याच्या सर्व इच्छा परिपूर्ण होतात. आपणतर माझे दोनहि हात कृपाळू होऊन धरले आहेत, तेव्हां मला तर असें वाटतें, कीं, मी सारें जग जिंकूं शकेन !" असें पृथ्वीसिंगानें ताबडतोब उत्तर दिलें.

कुमारानें हे आवेशानें उच्चारलेले बाणेदार शब्द ऐकून " ओहो ! हा तर दुसरा यशवंतसिंग आहे !" असें ह्मणून बादशहानें वरकांतीं फार खुष झाल्यासारखें दाखविलें. तत्काळ एक बहुमोल पोषाख आणवून तो पृथ्वीसिंगास बक्षिस दिला. पृथ्वीसिंगानें शिरस्त्याप्रमाणें तो तेथच्या तेथें अंगावर चढविला आणि आपणास लौकरच चांगली

बढती मिळेल अशी खातरी वाटून मोठ्या आनंदानें तो आपल्या छावणींत परत गेला.

हाय हाय! त्याच दिवशीं त्याची अखेर झाली! आपल्या छावणींत तो जातो न जातो इतक्यांत त्याच्या अंगाचा दाह होऊं लागला आणि हालहाल होऊन तडफडून त्यानें प्राण सोडला. बादशहानें दिलेल्या पोषाखास विष फांसलें असल्यामुळें त्याचा असा शेवट झाला, हाच समज लोकांचा अद्यापपर्यंत आहे.

औरंगजेबानें आपल्या क्रूरपणाची आणखीहि कमाल केली. पृथ्वीसिंग मृत्यु पावतांच तें वर्तमान राजा यशवंतसिंगास मुद्दाम जासूद पाठवून कळविलें व या शोचनीय गोष्टीनें आपणास अत्यंत दुःख झालें आहे असा राजा व राणी यांस निरोप पाठविला. आपल्या आवडत्या तरुण आणि शूर पुत्राचा असा अकालीं शेवट झालेला ऐकून त्या माता-पितरांस पराकाष्ठेचा शोक झाला. त्या बिचाऱ्यांचें दुर्दैव येथेंहि थांबलें नाहीं. अफगाणिस्तानच्या हवेमुळें आजार होऊन बरोबर असलेले त्यांचे दोघेहि पुत्र मृत्यु पावले!

मुलगे मृत्युमुखीं पडल्यावर राजा यशवंतसिंगाचे फार दिवस गेले नाहींत. कोणी ह्मणत, कीं, पुत्रशोकानें काळीज फुटून तो मरण पावला. पण औरंगजेबाच्या हुकुमानें त्याला विषप्रयोग करण्यांत आला, असाच बऱ्याच लोकांचा समज आहे. त्यानें काबूलाहून जीवंत परत येऊं नये असा औरंगजेबानें पणच केला होता.

बादशहाचा खुनशी स्वभाव आणि राजा यशवंतसिंगाशीं असलेलें त्याचें हाडवैर हीं मनांत आणलीं, तर हा समज खरा ठरतो. जोंपर्यंत यशवंतसिंग जीवंत होता तोंपर्यंत औरंगजेबाच्या मनास स्वस्थपणा

ह्मणून मुळींच नव्हता, असें लोकमत असल्याचें जें एक तत्कालीन इतिहासकारानें लिहिलें आहे, त्यांत पुष्कळ तथ्यांश आहे.

राणीच्या दुःखास तर आतां पारावार नाहींसा झाला. ती अफगाणिस्तानच्या जंगलांत एकटी पडलेली. जवळ नवरा नाहीं, मुलगे नाहींत, अशा अडचणीच्या स्थितींत त्या शोकाकुल पतिव्रतेस जीवित दुःसह होऊन तिनें पतीच्या प्रेताबरोबर सती जाण्याचा निश्चय केला. परंतु थोड्याच दिवसांनीं ती प्रसूत व्हावयाची असल्यामुळें तिच्या विश्वासू नोकरांनीं तिला तसें करूं दिलें नाहीं.

आपल्या शूर राजाच्या मृत्यूची दुर्वार्ता जोधपूरच्या राजनिष्ठ प्रजेस समजतांच आपला धर्मसंरक्षक गेला ह्मणून सर्वांनीं अत्यंत शोक केला, व आतां आपणास कोणी तारणारा राहिला नाहीं या विचारामुळें त्यांची पूर्ण निराशा झाली. थोडे दिवस गेल्यावर काबूल येथें राणी सुरक्षितपणें प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. त्या मुलाचें नांव अजितसिंग असें ठेविलें. प्रवास करण्याइतकें सामर्थ्य अंगीं आल्यानंतर ती तेथून आपल्याबरोबरचे लोक घेऊन निघाली. राणी, तिच्या मुली, लहान अजितसिंग आणि राजा यशवंतसिंगाबरोबरचें सैन्य इतकी सर्व मंडळी दिल्लीस येऊन दाखल झाली. आपल्यावर आलेल्या दुःखकारक प्रसंगांची हकीगत बादशहास कळवून पुढें जोधपुर येथें जाण्याची त्यांनीं तयारी केली. परंतु येथेंहि बिचाऱ्या राणीचें दैव आडवें आलें. यशवंतसिंगाचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा बादशहाचा निश्चय असल्यामुळें त्यानें अजितसिंगास आपल्या स्वाधीन करावें असा राणीस आग्रह केला. तथापि राणीनें ती गोष्ट मान्य केली नाहीं. तिच्या शूर रजपूत शिपायांनींहि राणीचीच बाजू धरली.

बादशहानें तिच्याबरोबरच्या लोकांचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. राजपुत्रास आमच्या स्वाधीन करा ह्मणजे जोधपूरच्या सर्व जमिनी तुह्मांला वांटून देऊं, ह्मणून बादशहानें त्यांनां आशा दाखविली, व दुसरेहि बरेच प्रकार केले, परंतु त्यांनीं आपला रजपूतबाणा न सोडतां "आमचा मुलूख आह्मीं आमच्या मणगटाच्या जोरावर राखलेला आहे, त्याच जोरावर तो मुलूख आणि आमचा राजपुत्र यांचें आह्मी संरक्षण करूं!" असा रोकडा जबाब दिला.

दिल्लीहून जोधपुर येथें जाण्यास निघतांना त्यांनीं लढाईचीच तयारी केली. राणी आणि आपला छोटा राजपुत्र यांच्या संरक्षणाची तजवीज काय करावी, हा त्यांनां पहिला विचार पडला. या अडचणींत रजपूतलोक पडले असतां राणीनेंच तोड काढली. ती ह्मणाली "काय होईल तें होवो, येथून सर्वांची सुटका व्हावी ह्मणून आतां जी आपणास निकराची लढाई करावी लागणार तींत सवाबरोबर येईल तो प्रसंग सोसण्यास मी सिद्ध आहें."

राणी एवढेंच सांगून स्वस्थ राहिली नाहीं, तर राजपुत्राविषयीं जी तजवीज करावयाची तिचीहि सर्व जबाबदारी आपणावरच सोंपवावी, असें तिनें निक्षून सांगितलें.

दुसऱ्या दिवशीं राजपुत्रास तिनें एका मिठाईच्या करंड्यांत निजविलें व तो करंडा एका मुसलमानाच्या हवालीं केला. या प्रसंगात राजघराण्यावर आलेला दुर्धर प्रसंग पाहून त्या मुसलमानासहि दया आली. त्यानें "राजपुत्रास बाहेर नेऊन त्याला तुमच्यापैकीं कोणी ठरलेल्या जागीं येईल तेव्हां त्याच्या हवालीं करीन. तेथपर्यंत त्याच्या केंसालाहि धक्का लागूं देणार नाहीं" अशी कुराणावर हात ठेवून शपथ घेतली.

सदर्हु मुसलमान तो करंडा घेऊन शहराच्या बाहेर पडल्यावर पुढें विचार काय ठरवावा, या प्रश्नाचा खल करण्यास मंडळी जमली. त्यांच्याबरोबर असलेल्या बायकांची आणि मुलांची धडगत मुळींच दिसेना. त्यांनां तेथेंच ठेवावीं, तर तीं शत्रूच्या हातीं पडून त्यांची हालअपेष्टा होण्यास चुकणार नाहीं. ह्मणून अखेरीस निर्वाणीचाच उपाय करण्याचा बेत ठरला. बंदुकीच्या दारूचीं कैक पोतीं एका खोलींत रचून, राणीशिवाय त्यांच्याबरोबर जितक्या बायका होत्या तितक्या सर्वांनां त्या खोलींत घालून खोलीला बत्ती दिली! याप्रमाणें त्या शूर रजपुतांनीं आपल्या बायकांच्या अब्रूचा बचाव केल्यानंतर प्रत्येकानें ढालतरवार सज्ज करून रोजच्यापेक्षां दुप्पट अफू चढविली. याप्रमाणें हातावर शीर घेऊन लढाईस तयार झालेल्या लोकांनिशीं वाड्याचा बाहेरचा दरवाजा उघडून राणी एकदम बाहेर पडली. त्या वाड्यास बादशाही फौजेचा आधींच गराडा पडलेला होता, तेव्हां तत्काळ लढाईस सुरुवात झाली. या वेळीं निराशेचें उत्कट धैर्य प्रत्येकाच्या अंगीं बाणलें असल्यामुळें एकेक रजपूत शिपाई भयंकर योद्धा बनला होता. दुष्ट शत्रूचे जितके लोक बरोबर नेतां येतील तितके नेऊन स्वर्गाचा मार्ग धरण्याचा प्रत्येकाचा निश्चयच झालेला, मग काय विचारावें! रजपुतांनीं लढाईची शिकस्त केली. समरभूमीवर पुष्कळ पडले, परंतु शत्रूचे लोक त्यांनीं कितीतरी पाडले. शेवटीं भयंकर कापाकापी करीत दिल्लीशहरच्या रस्त्यांतून शहराबाहेर जेव्हां राणी पोहोंचली तेव्हां तिच्याबरोबर फारच थोडे लोक शिल्लक राहिले होते. ही लढाई केवळ हिंदुस्तानच्याच नव्हे, तर साऱ्या जगाच्या इतिहासांत ज्या आश्चर्यकारक गोष्टी घडून आल्या आहेत त्यांतील एक होय.

इतकी स्वामिभक्ति, इतकें शौर्य आणि इतका निश्चय अन्य ठिकाणीं क्वचित्च दिसून येईल !

शिल्लक राहिलेल्या आपल्या थोड्याशा शूर योद्ध्यांनिशीं राणी जेव्हां शहराबाहेर पडली, तेव्हां वर सांगितलेल्या त्या मुसलमानाचा तिनें प्रथम शोध केला. त्या मुसलमानानेंहि कबूल केल्याप्रमाणें आपलें काम नेकीनें बजाविलें होतें. अजितसिंगास यत्किंचित्हि इजा न होतां तो अगदीं सुखरूप होता. अत्यंत आनंदानें राणीनें त्याला उचलून घेतलें व लगेच तिनें मोठ्या त्वरेनें प्रयाण केलें. आपला नातेवाईक जो मेवाडचा राणा त्याच्या मुलुखांत जाऊन पोहोंचेपर्यंत ती वाटेंत मुळींच थांबली नाहीं. तेथें जाऊन पोहोंचल्यावर अजितसिंगास तिनें राण्याच्या पदरांत टाकलें व तो मोठा होईपर्यंत त्याचें संरक्षण करण्याची त्याला विनंति केली.

जोधपूरच्या राणीच्या या प्रार्थनेस योग्य मान मिळून मेवाडच्या राण्यानें अजितसिंगास सुरक्षित स्थळीं ठेवण्याची तजवीज केली. छोट्या राजपुत्राच्या संरक्षणार्थ चांगल्या विश्वासू माणसांची योजना करून राण्यानें त्याला अबूच्या पहाडावर ताबडतोब रवाना केलें व तेथें असलेल्या मठांत एका साधूच्या मार्फत त्याच्या संगोपनाची उत्तम प्रकारें व्यवस्था लावण्यांत आली.

राजपुत्र अजितसिंग याची अशा प्रकारें व्यवस्था लागल्यावर जोधपूरची राणी मेवाड येथून निघाली आणि आपल्या राजधानीच्या शहरीं येऊन राहिली. त्या ठिकाणीं त्या वीरस्त्रीनें आपला लहान अजित वयांत येईपर्यंत बरींच वर्षें औरंगजेबाच्या सर्व कारस्थानांपासून, त्याचप्रमाणें आपल्या घराण्याच्या दुसऱ्याहि शत्रूंपासून मोठ्या शिताफीनें आपल्या राज्याचें संरक्षण करून प्रजेचें उत्तम प्रकारें परिपालन

केलें. पुढें अजितसिंग मोठा झाल्यावर त्याचे पराक्रम आपल्या डोळ्यांनीं पाहण्यास जरी ती जीवंत राहिली नाहीं, तरी जोधपुर शहर आणि जोधपूरचें राज्य यांची एक वेळ नष्ट झालेली भरभराट त्यांनां फिरून प्राप्त झालेली तिनें पाहिली.

या प्रकारें आपलें ऐहिक कर्तव्य उत्तम रीतीनें बजावून व मोठमोठ्या राजकार्यधुरंधर आणि समरधीर अशा नरश्रेष्ठांसहि कष्टसाध्य अशी कीर्ति मार्गे ठेवून या बाणेदार आणि कर्तव्यतत्पर वीरस्त्रीनें बराच वृद्धापकाळ झाल्यावर इहलोकाचा त्याग करून आपला शूर पति जो राजा यशवंतसिंग त्याच्याबरोबर शाश्वत सुखाचा अनुभव घेण्यासाठीं मोठ्या आनंदानें स्वर्गलोकीं प्रयाण केलें.

## सुलताना रझिया.

रझिया बेगम ही दिल्लीश्वर अल्तमश याची मुलगी होय. तार्तरींतील एका बड्या सरदाराचा अल्तमश हा अत्यंत आवडता मुलगा होता. इतर भावांनां याच्याविषयीं मत्सर उत्पन्न होऊन त्यांनीं एकदां शिकार करीत असतां याच्या अंगावरील सर्व वस्त्रें आणि अलंकार काढून घेतले व त्याला एका व्यापाऱ्याला गुलाम ह्मणून विकून टाकिलें. या व्यापाऱ्यानें पुढें अल्तमशला बुखाऱ्याच्या राजास विकलें. बुखाऱ्याच्या राजघराण्यांत अल्तमशला चांगलें शिक्षण मिळालें होतें. पुढें राजा मरण पावल्यावर अल्तमशची कर्मदशा पुनः ओढवून त्याला पुनः विकावयास बाहेर काढलें व तो बुखारा येथील एका व्यापाऱ्याच्या पदरीं पडला. त्या व्यापाऱ्यानें त्याला गिझनी येथें नेलें.

या वेळीं गिझनीच्या तक्तावर महंमद घोरी हा होता. अल्तमशाचें सौन्दर्य आणि बुद्धिमत्ता हीं बादशहाच्या कानीं जातांच त्याला विकत घेऊन आपल्या पदरीं ठेवावें अशी घोरीस इच्छा झाली. परंतु ज्या व्यापाऱ्यानें त्याला विकावयासाठीं आणिला होता तो त्याची फाजील किंमत मागूं लागल्यामुळें बादशहानें त्याला विकत घेण्याचें नाकारलें. बादशहानें नाकारल्यामुळें दुसराहि कोणी त्याची जास्त किंमत देण्यास तयार होत नाहीं असें पाहून तो व्यापारी अल्तमशला पुनः बुखारा येथें घेऊन गेला.

कांहीं दिवस लोटल्यावर महंमद घोरीचा सरदार कुतुबुद्दिन यानें बादशहाच्या परवानगीनें अल्तमशला विकत घेतलें. सरदार कुतुबुद्दिन याच्या कुटुंबांतील सर्व माणसांना अल्तमश फार आवडूं लागला. हळुहळू कुतुबुद्दिनाची त्याच्यावर अत्यंत मर्जी बसून तो दास्यत्वांतून मुक्त झाला. स्वतंत्र झाल्यावर अल्तमशला मोठा रोजगार मिळाला; इतकेंच नव्हे, तर कुतुबुद्दिन यानें त्याला आपली मुलगीहि दिली. महंमद घोरी मेल्यावर दिल्लीचें सिंहासन कुतुबुद्दिन यास प्राप्त झालें. पुढें कुतुबुद्दिनाच्या मृत्यूनंतर सर्व सरदारांच्या अनुमतानें अल्तमश यालाच दिल्लीची गादी मिळाली. बादशहाला मुलगा होता, परंतु त्याला लोक अनुकूल नसल्यामुळें त्याचा हक्क बाजूस राहिला.

अल्तमश याला बरींच मुलें झालीं. त्या सर्वांत अत्यंत प्रसिद्धीस आलेली ह्मटली ह्मणजे ही रझिया बेगम होय. अल्तमश हा अत्यंत देखणा पुरुष असल्यामुळें त्याचीं मुलेंहि त्याच्यासारखींच देखणीं होतीं; तथापि त्या सर्वांत रझियेचें सौंदर्य विशेष होतें. या सौंदर्याशिवाय, तरुण मुलींत तर राहोच, पण मुलांतदेखील जें चातुर्य आणि शहाणपण सांपडावयाचें नाहीं तें रझियेच्या ठायीं भरपूर होतें.

बापाची तिच्यावर अत्यंत ममता असे. त्यानें तिला उत्तम शिक्षण दिलें होतें. त्यानें स्त्रीजातीच्या कर्तव्यांत तिला तरबेज केलेंच होतें, पण राजनीतिशास्त्र आणि राज्यकारभारासंबंधीं सर्व विषयहि तिला काळजीपूर्वक पढविले होते. दुर्दैवेंकरून तिच्या आईचा स्वभाव फार कडक व अविचारी असा होता. अंतःपुरांतील उष्ण वातावरणांत बापाकडून मिळालेल्या शिक्षणाचा परिणाम जरी थोडाबहुत कमी होत असे, तरी रझिया जसजशी वाढूं लागली तसतशी ती जास्त विचारी, विद्याव्यसनी, ममताळू आणि शुद्ध अंतःकरणाची अशीच बनत चालली.

रझिया वयांत आली तेव्हां तिच्या बापानें, कुतुबुद्दिन बादशहानें ज्या कामाची सुरुवात केली होती तो 'कुतुब मिनार' नांवाचा आश्चर्यजनक आणि अत्यंत सुंदर बुरूज पुरा करण्याचें काम आरंभिलें. काम पुरें झाल्यावर तत्संबंधानें झालेल्या टोलेजंग समारंभाच्या वेळीं ही विद्याचारसंपन्न राजकन्या हजर होती. त्या प्रसिद्ध स्तंभावर खोद-लेल्या वाक्याची रचना खुद्द रझियेनेंच केली होती, असें ह्मणतात. कुतुबुद्दिन बादशहाच्या वेळीं पहिला मजला तयार झालेला होता. अल्तमश यानें त्याच्यावर आणखी पांच मजले चढविले. या स्तंभाची उंची दोनशें चौतीस फूट असून त्याच्या पायाचा व्यास सत्तेचाळीस फूट आहे. अर्थात् हा वर निमूळता होत गेलेला आहे व अगदीं खालच्या मजल्यापासून वरपर्यंत सभोंवार पायऱ्यांचा जिना असून तो चढतांना मुळींच अडचण पडत नाहीं. अगदीं वरच्या मजल्याचा व्यास नऊ फूट आहे. त्याच्या शिखरावर आरूढ झालें असतां राज-धानीच्या आसपास कैक मैलपर्यंत सर्व प्रदेशाचा अत्यंत मनोरम असा देखावा दृष्टीस पडतो.

रझिया हिला समजूं लागल्यावर या आश्चर्यभूत स्तंभाचें चालत असलेलें काम ती फार उत्सुकतेनें पाहत असे. जसजसें हें काम पूर्णत्वास येऊं लागलें तसतसा तिला जो आनंद होत असे, तो केवळ अपूर्व होता. काम पुरें झालें, तेव्हां बादशहाबरोबर अगदीं वरच्या शिखरापर्यंत चढून सभोंवारच्या अतिशय रमणीय देखाव्याच्या अपूर्व दर्शनसुखाचा आस्वाद घेतांना तिला जो हर्ष झाला, त्याचें वर्णन करतां येत नाहीं.

इसवी सन १२२६ सालीं दक्षिणेंतील स्वतंत्र राज्यें काबीज करण्याच्या उद्देशानें अल्तमश बादशहा दिल्लीहून सैन्यानिशीं निघाला. या स्वारींत त्याचा पूर्ण जय झाला; परंतु या कामांत त्याचीं सहा वर्षें गेलीं. बादशहाच्या गैरहजिरींत राज्यकारभार कोणाकडे सोंपवावा, हा महत्त्वाचा प्रश्न उभा राहिला, तेव्हां बादशहाचे वयांत आलेले वीस मुलगे जरी हयात होते तरी सर्वानुमतें या कामीं रझिया हिचीच योजना करण्यांत आली. बादशहानें जातांना आपल्या गादीवर रझियाची स्थापना केली व " जरी माझे वीस मुलगे आज हयात आहेत तरी राज्यसत्तेचें ओझें त्या सर्वांस जड जाईल; परंतु या माझ्या कोमल रझियेला तें ओझें मुळींच वाटावयाचें नाहीं. या विसांच्या अंगांत जितकें पाणी आहे त्यापेक्षां तें माझ्या या मुलीच्या अंगीं जास्त आहे !" असे अभिमानानें उद्गार काढले; आणि बादशहाच्या गैरहजिरींत तिनें अशा उत्तम रीतीनें राज्यकारभार हांकला, कीं, तिच्याविषयीं लोकांस आरंभीं जें वाटलें होतें तें खरें झालें.

रझिया ही तरुण होती, तथापि आपली जबाबदारी पूर्णपणें ओळखून तिनें कारभारास सुरुवात केली. आपला निश्चय कायम रहावा, न्यायाचा आणि शहाणपणाचा मार्ग कधीं सुटूं नये ह्मणून

तिनें परमेश्वराची प्रार्थना केली, आणि राज्याच्या बंदोबस्ताचें काम इतक्या चोख न्यायानें व नेटानें चालविलें, कीं, तिच्या भावांस बादशहानें केलेली योजनाच योग्य होती असें कबूल करणें भाग पडलें. पुढें सहा वर्षांनीं ह्मणजे १२३२ सालीं बादशहा स्वारीवरून दिल्लीस परत आला तेव्हां राज्यकारभाराचीं सूत्रें तिनें त्याच्या हातीं दिलीं आणि पूर्वीप्रमाणें एखाद्या ममताळू आणि आज्ञाधारक मुलीप्रमाणें ती वागूं लागली.

दक्षिणेंतून परत आल्यावर चारच वर्षें राज्यकारभार चालवून अल्तमश मरण पावला. प्रिय पित्याच्या मृत्यूमुळें रझिया हिला अतोनात दुःख झालें. बादशहाच्या पश्चात् त्याचा मुलगा फिरोज हा गादीवर बसला. हा कमकुवत बुद्धीचा आणि दुष्ट अंतःकरणाचा असल्यामुळें सर्वस्वी आपल्या आईच्याच तंत्रानें वागत असे. सर्व राज्यकारभार आईकडे सोंपवून आपण नाचतमाशांत दंग असे. फिरोज बादशहानें ख्यालीखुशालींत पुष्कळच पैसा उडविला होता. इकडे त्याच्या आईनें जुलमी राज्यपद्धति चालू केल्यामुळें जिकडेतिकडे बंडें उद्भवलीं. अखेरीस सात महिनेपर्यंत अशा रीतीनें राज्य केल्यानंतर त्रासून गेलेल्या प्रजेनें त्याला पदच्युत केलें.

फिरोज बादशहा पदच्युत झाल्यानंतर गादीवर कोणाची स्थापना करावी, हा प्रश्न उत्पन्न झाला. बहुतेक लोकांच्या मनांत रझिया हिलाच गादी द्यावी असें आलें. आपल्या अमीरउमरावांच्या आग्रहापुढें नाइलाज होऊन तिनें गादी चालविण्याचें कबूल केलें आणि 'सुलताना रझिया' अथवा 'चक्रवर्तिनी रझिया' असें नांव धारण करून ती सिंहासनावर आरूढ झाली. जिकडेतिकडे अंदाधुंदी माजली असतांना सर्व लोकांच्या अनुमतानें आणि उघडपणें राज्यकारभाराचीं

सर्व सूत्रें मुकत्यारीनें हातांत वागवणारी स्त्री, ह्मणजे त्या वेळीं आमच्या देशांत ही एक अपूर्वच गोष्ट घडून आली, असें ह्मटलें पाहिजे.

सुलताना रझिया हिची जरी वरकांती सर्वानुमतें बादशाही सिंहासनावर स्थापना झाली होती, तरी सर्वच उमराव तिला अनुकूल नव्हते. ज्या दोन तटांतील सरदारांनीं एक होऊन फिरोज याला गादीवरून काढून टाकिलें होतें, त्यांतील एका तटांतील सरदारांस या गोष्टीविषयीं बरें वाटलें नाहीं. सुलताना रझिया हिच्या अंगीं राज्यकारभारास अवश्य असे गुण नव्हते ह्मणून ही मंडळी नाखुष होती, अशी गोष्ट नाहीं. तर रझिया ही स्त्री असून तिचें साम्राज्य आपण कबूल केलें, याविषयींच त्यांच्या मनांत खंति वाटत असे. हळुहळू या नाखुषीचें उग्र स्वरूप दिसूं लागलें. या उमरावांनीं सैन्य गोळा करून पदच्युत झालेल्या बादशहाच्या वजिरास मुख्य केलें आणि दिल्लीवर स्वारी केली. रझियाच्या सैन्याचा या सैन्यापुढें टिकाव लागला नाहीं. परंतु जी गोष्ट आपल्या सैन्याकडून झाली नाहीं ती तिनें आपल्या शहाणपणानें घडवून आणिली. आपल्या शत्रूंपैकीं कांहींजणांवर आपली मर्जी आहे असें भासवून त्यांच्यांत आणि इतर उमरावांत तिनें चुरस उत्पन्न केली. अर्थात्, त्यांची आपापसांत फाटाफूट होऊन सर्वच तिचे ताबेदार झाले. या लोकांपैकीं ज्यांच्याकडून आपणास विशेष उपद्रव होईल असें तिला वाटलें त्यांनां तिनें देहांत शिक्षा दिली व इतरांस आपल्या स्वाभाविक औदार्याच्या वागणुकीनें आपलेसे करून घेतलें. याप्रमाणें तिनें सर्व गडबडी मोडून जिकडेतिकडे शांतता केली.

यापुढें दोन वर्षें तिचा राज्यकारभार फारच उत्तम रीतीनें चालला. रझिया हिचें राजनीतिचातुर्य जसें श्रेष्ठ प्रतीचें होतें, तशीच अंतस्थ

कारभारांतहि तिची दक्षता वाखाणण्यासारखी होती. ती नित्य सुल-तानी पेहराव करून दरबारांत बसत असे. स्त्रीजातीचा पोषाख व पडदा तिनें टाकून दिला होता. पुरुषाप्रमाणें डोकीस ती टोपी घाली. अर्जदारांचे अर्ज ती स्वतः ऐके, आणि कोणताहि आडपडदा न ठेवतां अगदीं उघडपणें हत्तीवर बसत असे. आपलीं राज्यव्यवस्थेचीं कामें ती अगदीं मनापासून व सदसद्विवेकबुद्धिपूर्वक करीत असे.

माजी कारकीर्दींत जी अंधाधुंदी झालेली होती ती सर्व मोडून तिनें व्यवस्था केली आणि चांगल्या सुधारणा अमलांत आणिल्या. जुने कायदे दुरुस्त केले, महत्त्वाच्या वादांचा निकाल लाविला आणि एकंदर राज्यव्यवस्थेचें काम इतक्या चतुराईनें हांकिलें, कीं, ही स्त्री नसून कोणी एखादा न्यायी आणि कर्तृत्वकुशल बादशहाच आहे, असें परक्यांस वाटलें.

हा वेळपर्यंत विवाह अगर तत्संबंधींचे विचार तिच्या मनात आल्याचें कांहींच दिसून आलें नाहीं. निदान इतिहासांत तरी तशा प्रकारची हकीगत निश्चयात्मक अशी आढळून येत नाहीं. ती लहान असतांना तिचें सौंदर्य पाहून पुष्कळांचें मन तिच्याकडे आकर्षित झालें होतें. परंतु आजपर्यंत तिनें कोणासच उत्तेजन दिलें नव्हतें. बादशाही सिंहासनावर आरूढ होईपर्यंत तिच्या मनाचा या बाबतींत स्पष्ट असा कल दिसल्याचें कोठेंच वाचण्यांत आलेलें नाहीं. नंतर मात्र, तिच्या मनाची ही स्थिति फार वेळ राहिली नाहीं. रझिया हिच्या पदरीं एक हबशी सरदार घोडेस्वारांवर मुख्य होता. ह्या सरदाराचे आरंभींचे दिवस गुलामगिरींत गेले होते हा रूपानें सुंदर, चतुर आणि रझिया-सारख्या स्त्रीचें मन बसण्याइतक्या योग्यतेचा होता. परंतु या हलक्या दर्ज्याच्या माणसावर सुलतानेचें मन बसलेलें पाहून तिच्या सरदारांस

बाईट वाटलें, घोड्यावर बसावयाचें असेल तेव्हां हा हबशी सरदार सुलतानेला वर उचलून ठेवीत असे. ह्यापलीकडे तिनें त्याच्याशीं कोणत्याहि प्रकारची सलगी ठेविली नव्हती. तिच्या शुद्ध कीर्तीस डाग लागण्यासारखें तिच्याकडून वर्तन मुळींच झालें नव्हतें. सुलताना रझिया हिच्या अंगीं सर्व सद्गुण वास करीत होते, आणि तिचें वर्तन बारीक दृष्टीनें पाहणारास तिच्या स्त्रीत्वापलीकडे कोणताहि दोष दिसून येण्यासारखा नव्हता, असें फेरिस्ता म्हणतो.

सुलतानेचें मन ह्या हबशी सरदारावर बसलें होतें, ही गोष्ट मात्र खरी. संधि पाहून त्याला योग्यतेस चढवावें आणि त्याला आपला पति करून उभयतांनीं राज्यसुख अनुभवावें, हा तिच्या मनांतील बेत बऱ्याच लोकांनां कळून चुकला होता. परंतु ह्या प्रीतीचा शेवट चांगला झाला नाहीं. आपल्या प्रियकरास योग्यतेस चढवितेवेळीं सुलतानेलाच अपाय झाला. ह्या सरदारास मुख्य सेनापतीची म्हणजे अमीर-अल-उमराची पदवी सुलतानेनें दिलेली पाहतांच सर्व सरदारांचा क्रोध अनावर झाला आणि त्यांनीं उघड रीतीनें बंड केलें.

अल्टुनिया नांवाचा तुर्की सरदार बंड करण्यास प्रथम प्रवृत्त होऊन त्यानें सैन्याची जमवाजमव केली. ही गोष्ट सुलताना रझिया हिला समजतांच ती आपल्या प्रचंड सैन्यानिशीं त्याच्या ठाण्यावर एकदम हल्ला करण्यास निघाली. परंतु वाटेंत तिच्याच सैन्यानें बंड करून तिचा आवडता जो हबशी सरदार त्याला तिच्या समक्ष ठार केलें. ह्या कृत्यानें सुलताना रझिया हिला इतका अनावर क्रोध आला, कीं, तिच्या सरदारांस आपल्या बचावासाठीं तिला अटकेंत ठेवणें भाग पडलें. त्यांनीं तिला कैद तर केलेंच. इतकेंच नव्हे तर तिच्या विनवणीकडे लक्ष्य न देतां तिला शत्रूच्या स्वाधीन केलें. लगेच त्या

सरदारांनीं दिल्लीकडे माघार खाऊन रझियाचा भाऊ बेहराम याला सिंहासनावर बसविलें. हा बेहराम अत्यंत नीच आणि बदफैली माणूस होता.

बेगमेस शत्रूच्या स्वाधीन करतांना तिच्या सरदारांस आपण काय करीत आहों ह्या गोष्टीचें भान मुळींच राहिलें नव्हतें. तिचा शत्रु जो तुर्की सरदार, त्याला तिची शोचनीय स्थिति पाहून दया आली आणि तिच्या स्वातंत्र्यास त्यानें बिलकुल धक्का लाविला नाहीं. इतकेंच नव्हे, तर सुलताना रझिया हिचें सौंदर्य आणि वर्तन पाहून त्याला फार आनंद झाला आणि त्यानें आपलें अंतःकरण तिला अर्पण केलें. त्या तुर्की सरदाराचें शौर्य आणि अनुपम औदार्य ह्यांचा रझियेच्या मनावर इतका परिणाम झाला, कीं, ती त्याला वरण्यास कबूल झाली. मोठ्या थाटानें बतिन्दा येथें त्या उभयतांचा लग्नसमारंभ झाला.

बतिन्दा येथील किल्ल्यांत तीं उभयतां कांहीं दिवस राहिलीं. नंतर आपल्या महत्त्वाच्या कामाकडे त्यांचें लक्ष्य लागून त्यांनीं मोठें सैन्य जमा केलें व राज्य परत मिळविण्यासाठीं तीं दिल्लीकडे निघालीं. बिचाऱ्या रझियेचें दैव फिरलें तें फिरलेंच ! तिच्याबरोबरच्या सैन्यानें आपली पराकाष्ठा केली, परंतु शत्रूचा जोर विशेष होऊन तिला माघार घ्यावी लागली. पुढेहि आणखी दोन लढाया झाल्या व उभय पक्षांचा पुष्कळ नाश होऊन रझिया आपल्या पतिसहवर्तमान शत्रूच्या हातीं सांपडली. त्या दुष्टांनीं तिला व तिच्या पतीला ठार मारलें.

अखेरपर्यंत रझियेनें आपला बाणा सोडला नाहीं. चार वर्षें उत्तम रीतीनें बादशाही अधिकार चालविल्यावर तिचा भाग्यसूर्य अस्तंगत झाला. ती मरण पावल्यावर तिचें शहाणपण, कार्यकौशल्य आणि सौंदर्य इत्यादि गुण आठवून तिच्यासाठीं पुष्कळ लोक हळहळले.

# रूपनगरची राजकन्या.

रूपनगरच्या राजकन्येची बाळपणची हकीगत फारशी उपलब्ध नाहीं. हिचा जन्म एका प्रख्यात रजपूत घराण्यांत झाला होता. तरी ही तारुण्यावस्थेंत असतांना जी एक विशेष गोष्ट घडून आली ती घडली नसती, तर ही ज्या घराण्यांत जन्मली त्या घराण्याच्या मुलखापलीकडे हिचें नांव फारसें कोणासहि माहित झालें नसतें. रूपनगरच्या राजकन्येचा देशाभिमान, हिची धर्मश्रद्धा, हिचें शौर्य आणि हिचा रजपूत बाणा वगैरे गुणांनीं त्या गोष्टीला ऐतिहासिक महत्व प्राप्त झालें आणि त्या वेळेपासून आजपर्यंत भरतखंडांत तिची ख्याति एकसारखी गाजत आहे. धर्म हा आमच्या राष्ट्राचा जीव होय; आणि ह्या धर्मरूपी राष्ट्रीय जीवितावर जेव्हांजेव्हां प्रसंग आले, तेव्हांतेव्हां ज्या ज्या राष्ट्रीय स्त्रीपुरुषांनीं आपल्या अलौकिक गुणांनीं त्याचें संरक्षण करून इतिहासाची दिशा बदलली, त्यांत या रूपनगरच्या राजकन्येचें नांव प्रमुखत्वानें गणण्यासारखें आहे.

शहाजहान बादशहाची आई मेवाडच्या रजपूत घराण्यांत जन्मली होती. त्याप्रमाणें त्याचा बाप जो जहांगीर, त्याची आईहि रजपूत कुळांतलीच होती. परंतु औरंगजेबाची आई, ही प्रख्यात नूरजहानची पुतणी ( तिच्या भावाची मुलगी ) असल्यामुळें अर्थात्‌च आईकडून त्याचा कोणत्याहि रजपूत घराण्याशीं संबंध नव्हता. आणि ही आपल्यामध्यें मोठीच उणीव आहे असें औरंगजेबास वाटत असे. कोणत्याहि रजपूत घराण्याशीं साक्षात् रक्तसंबंध नसल्यामुळें त्याच्या कारकिर्दीच्या आरंभीं व पुढेंहि अखेरपर्यंत रजपूतलोकांची सहानुभूति त्याला मिळाली नाहीं इतकेंच नव्हे, तर उलट त्यांच्यापासून त्याला

पुष्कळच त्रास भोगावा लागला. राजकर्त्यांनीं प्रजाजनांतील प्रमुख जातीशीं शरीरसंबंध ठेविल्यास त्यांच्या राज्यास विशेष बळकटी येत असते. जहांगीर आणि शहाजहान यांच्या कारकीर्दींत मोंगलांचें राज्य जसें सुरक्षित होतें तसें पूर्वी कधींहि नव्हतें व या कारकीर्दींत हिंदु लोकांस जसें स्नेहानें आणि सलोख्यानें वागविलें जात असे तशा प्रकारची वागणूक त्यांनां कधींहि मिळाली नव्हती.

आपल्यामधील ही उणीव निदान पुढें आपल्या वारसांत तरी राहूं नये ह्मणून औरंगजेबानें रजपूत कुळांत जन्मलेल्या स्त्रियांशीं लग्नसंबंध केला. ह्या संबंधापासून त्याला मुलेंहि झालीं होतीं. बादशहाचें हेंच धोरण रूपनगरच्या राजकन्येस प्रसिद्धीस येण्यास कारण झालें. औरंगजेबासाठीं रजपूत घराण्यांतील अविवाहित कन्यांचा तपास करण्याच्या कामावर जे लोक नेमिले होते, त्यांच्या दृष्टीस या राजकन्येचें अलौकिक सौंदर्य पडून त्यांनीं तिचें थोर कूळ आणि अप्रतिम लावण्य हीं बादशहास निवेदन केलीं. अर्थात् या राजकन्येशीं आपण विवाह करावा, असा बादशहाचा निश्चय झाला. त्यानें तावडतोब आपला वकील पाठवून तिच्याबद्दल मागणी घातली आणि तिला दिल्लीस आणण्यासाठीं दोन हजार स्वार पाठविले.

बादशहाची मागणी जाण्याचा अवकाश, कीं, झालें तावडतोब काम! असा प्रकार औरंगजेबासंबंधानें हा वेळपर्यंत झाला होता. येथेंहि आपलें कार्यसिद्धि तशीच तावडतोब होईल, अशी त्याची खातरी होती; परंतु रूपनगरची राजकन्या कांहीं सामान्य स्त्री नव्हती! ती स्वतंत्र इच्छेची आणि तेजस्वी स्त्री असल्यामुळें आपण जरी बादशहा आहों तरी सर्वच कांहीं आपल्या इच्छेप्रमाणें होणार नाहीं, असा औरंगजेब बादशहास या बाबतींत पक्का अनुभव आला. स्वधर्मीयांचा

छळ करणाऱ्या या बादशहाच्या या उद्दामपणाच्या मागणीनें त्या बाणेदार आणि अभिमानी रजपूतस्त्रीस अत्यंत त्वेष उत्पन्न झाला व अशा संबंधाचा तिला अगदीं किळस वाटला. जीव गेला तरी बेहत्तर, पण औरंगझेबाची बायको ह्मणून होणार नाहीं, असा तिनें निश्चयच केला. परंतु गोष्ट इतक्या निकरास आणावयाच्या पूर्वी, होईल तितका यत्न करून आपल्याच जातीच्या एखाद्या तरुण राजपुत्राशीं आपला विवाह घडवून आणावा आणि बादशहाचे दांत चांगलेच पाडावे, असा तिनें बेत केला.

महाराणा राजसिंह हा इसवीसन १६५४ ह्या सालीं मेवाडच्या गादीवर बसला होता व पुढें थोड्याच दिवसांत एकदोन लढायांत पराक्रम गाजवून त्यानें चांगली कीर्ति मिळविली होती. रूपनगरच्या राजकन्येनें आपल्या संकटांत या रजपूत राजाला आपल्या अब्रूचें संरक्षण करण्यासाठीं विनंति करण्याचें मनांत आणिलें व हाच सदाचारसंपन्न, धर्माभिमानी आणि शूर राणा आपलें व आपल्या अब्रूचें रक्षण करण्यास समर्थ असल्याविषयींचा तिला पक्का भरंवसा वाटून आपलें इच्छित कार्य त्याच्या हातीं सोंपविण्याचा तिनें निश्चय केला.

हा निश्चय झाल्याबरोबर तिनें राजसिंहास एक पत्र लिहिलें व घरच्या उपाध्याच्या हातीं तें देऊन राण्याकडे तें पोहोंचविण्यास सांगितलें. त्या उपाध्याला एवढ्या मोठ्या नाजूक आणि महत्वाच्या कामावर आपली नेमणूक झालेली पाहून फार संतोष झाला आणि मोठा अभिमानहि वाटला. त्या पत्रांत तिनें आपला स्नेहभाव व्यक्त करून औरंगजेबानें उद्दामपणाची जी मागणी घातली होती तिच्याविषयीं हकीगत कळविली होती, व शेवटीं लिहिलें होतें, कीं, "राजहंसानें बगळ्याशीं संबंध कसा करावा? कुलीन, थोर घराण्यांत जन्मलेल्या शुद्ध रक्ताच्या रजपूत

स्त्रीनें माकडतोंड्या रानटी शिखानष्टाची बायको होऊन रहावें काय ? आपण या संकटांतून मला सोडवून माझें पाणिग्रहण करणार नाहीं तर आत्महत्या करण्याचा माझा निश्चय झालेला आहे !"

महाराणा राजसिंह यानें हें पत्र वाचलें आणि त्याला फार आनंद झाला. या शूर व स्वाभिमानी स्त्रीचा स्वीकार करून तिला आपली धर्मपत्नी करावी आणि आपल्या देशासाठीं आणि धर्मासाठीं औरंगजेबावर तरवार उचलावी, असा त्यानें तत्काळ निर्धार केला. मनाचा निश्चय झाल्यावर अगदीं निवडक लोक बरोबर घेऊन तो निघाला आणि आरवली डोंगरास वळसा घालून एकाएकीं रूपनगरच्या किल्ल्यासमोर दाखल झाला. तेथें ताबडतोब बादशहाच्या फौजेवर त्यानें हल्ला केला आणि बहुतेक सर्व सैन्याचा सप्पा उडवून राजकन्येसह तो आपल्या राजधानीस चालता झाला. राण्याचा पराक्रम, सौंदर्य आणि उमदा स्वभाव पाहून रूपनगरची राजकन्या फार खूप झाली आणि तिनें मोठ्या आनंदानें त्याच्याशीं विवाह केला.

मानी औरंगजेब बादशहास ही बातमी समजतांच त्याला पराकाष्ठेचा क्रोध आला. आपली एवढी सत्ता, एवढें सामर्थ्य, एवढा दरारा, परंतु राजकन्येनें हीं सर्व कस्पटाप्रमाणें मानलीं व अशा बेमालूम रीतीनें तिनें आपली मसलत साधली, कीं, आपली इच्छा जागच्या जागीं राहिली, इतकेंच नव्हे तर सर्व बाजूंनीं बेअब्रू पदरांत आली ! ही फटफजिती बादशहाच्या अंतःकरणांत तीव्र शल्यासारखी रुतून बसली. औरंगजेबाचा स्वभाव अत्यंत खुनशी होता खरा, परंतु उतावळा नव्हता. या वेळीं दुसऱ्या अनेक भानगडींकडे लक्ष्य देणें जरूर असल्यामुळें आपली अब्रू पायांखालीं तुडवून विजयी झालेल्या या राजकन्येस कांहीं वेळ आनदांत राहूं देणें त्याला युक्त वाटलें.

मेवाडचा राणा राजसिंह आणि त्याची ही तरुण पत्नी हीं उभयतां बादशहाचा खुनशी स्वभाव जाणून होतीं. तथापि तीं दोघेंहि अत्यंत शूर आणि कर्तव्यनिष्ठ असल्यामुळें बादशहाच्या भीतीचा त्यांच्या सुखावर यत्किंचित्‌हि परिणाम झाला नाहीं. आपल्या प्रजेच्या कल्याणार्थ झटून प्रयत्न करण्यांत त्यांनीं आपला काळ आनंदानें घालविला. याच सुमारास देशांत भयंकर दुष्काळ पडला. हिंदुस्तानांत दुष्काळाच्या रूपानें हा सर्वव्यापी काळ जेव्हां जेव्हां वावरत असतो, तेव्हां तेव्हां लोकांच्या दुःखांस सीमा राहत नाहीं. अशा वेळीं पूर्वकालीन राजेलोकांचें आपल्या प्रजेविषयींचें पितृवात्सल्य उत्तम प्रकारें व्यक्त होत असे. त्यामुळें राजा ह्मणजे प्रजेचा मायबाप हा परंपरागत समज अद्यापिहि लोकांत जागृत आहे. एका एतद्देशीय इतिहासकारानें त्या वेळच्या दुष्काळाचें केलेलें वर्णन वाचलें ह्मणजे त्या वेळीं लोकांची किती दुःस्थिति होत असे, त्याची थोडीशी कल्पना करतां येईल. तो ह्मणतोः—

"शेंकडो कोसांच्या क्षेत्रांत पाण्याचा थेंब नव्हता, भुकेनें लोक जिकडेतिकडे मरून पडले होते व जे आसन्नमरण झाले होते ते क्षुधेच्या वेदनांनीं भ्रमिष्ट झाले होते. ज्या वस्तु कधींहि कोणीं खाल्ल्या नव्हत्या त्यांच्या बऱ्यावाईटपणाकडे, शुद्धाशुद्धतेकडे किंवा ओंगळपणाकडे बिलकुल लक्ष्य न देतां भुकेच्या यातना कांहींतरी कमी करण्याच्या आशेनें लोक त्या खात असत. नवऱ्यांनीं बायकांस सोडून दिलें होतें, त्याचप्रमाणें बायकांनीं नवऱ्यांचा त्याग केला होता. आईबापांनीं पोटचे गोळे अन्नासाठीं विकले होते. एकेक दिवस युगासारखा वाटत होता. जसजसे दिवस जात, तसतसें दुष्काळाचें स्वरूप अधिकाधिक भयंकर होत होतें, आणि त्याचा प्रसार जास्त प्रदेशावर

होत होता. कोणाला कोठें अन्न मिळालें तर त्यानें तें अधाशीपणानें खाऊन तेथल्या तेथेंच तडफडून मरावें ! रात्रीं सर्व तारा आकाशांत स्वच्छ दिसत असत. दिवस निरभ्र, मेघच नाहीं, मग गडगडाट कुठला ? विजेचा चकचकाट स्मृतींतच तेवढा पहावयास मिळे ! सारांश, प्रस्तुतच्या यातना आणि पुढील काळची भीति यांनीं लोकांचीं अंतःकरणें व्यापून गेलीं होतीं. नद्या, तळीं, विहिरी, झरे सर्व सुकून कोरडे ठणठणीत झाले होते. ज्याच्याजवळ पैसा असे ते थोडथोडें अन्न दुष्काळग्रस्तांस वांटीत असत. भिक्षुक, उपाध्ये वगैरे धर्मप्रवर्तकांनीं आपापलीं कामें सोडलीं होतीं. जातच राहिली नव्हती, मग जातिभेद कुठला ? ब्राह्मण कोण, शूद्र कोण हेंच समजण्याची पंचाईत ! सत्ता, शहाणपण, जात, कूळ वगैरे सर्व जाऊन अन्न हीच काय ती एक प्रत्येकाची साध्य वस्तु होऊन राहिली होती. झाडावर पान राहिलें नव्हतें, फूल राहिलें नव्हतें, फार काय, नखांनीं आणि हातांनीं झाडांच्या सालीहि लोकांनीं ओरबडून पोटांतल्या आगींत टाकिल्या होत्या. त्याहूनहि प्रळय झटला ह्मणजे माणसें एकमेकांनां फाडून खात ! कुटुंबांचीं कुटुंबें नाहींशीं झालीं होतीं. पाणीच कोठें राहिलें नाहीं, मग मासे तरी कोठले ? आशा कसली ती कोठेंच दिसत नसे !"

अशा प्रकारें भयंकर दुष्काळ आ पसरून सर्व लोकांस खावयास उठला व लोकांवर दारुण प्रसंग ओढवला तेव्हां या राणीची भूतदया आपल्या पूर्ण स्वरूपानें प्रकट झाली. तिनें सरकारी पेवें उघडीं केलीं आणि लोकांमध्यें जातीनें फिरून क्षुधितांस अन्न वांटणें, आजाऱ्यांस औषधपाणी करणें आणि त्यांनां काय हवें असेल त्याची तरतूद करणें, वगैरे कामें क्षणभरहि विश्रांति न घेतां ती अहर्निश करूं लागली. मोठा भयंकर वणवाच पसरलेला, तो ती बिचारी एकटी कोठवर

विझवील ? परंतु जितकें तिला शक्य होतें तितकें सर्व तिनें आनंदानें आणि मनापासून केलें. जे जगले ते तिचे धन्यवाद गात राहिले आणि जे मेले त्यांनीं मरतांना देवाजवळ तिला दुवा मागून प्राण सोडले.

अशा वेळीं गरिबांस मदत करण्याचा एक मार्ग ह्मटला ह्मणजे लोकांच्या सोईचीं मोटमोठीं कामें काढून त्यांनां कामधंदा पुरवणें, हा होय. हीहि तजवीज राणीकडून मोठ्या प्रमाणावर करण्यांत आली होती. मेवाडच्या राजधानीपासून उत्तरेस पंचवीस मैलांवर राजसमंड नांवाचें एक मोठें सरोवर नवीन तयार करण्याचें काम सुरू करण्यांत आलें. अरवली पर्वतांतून बाराहि महिने ज्यांत पाणी वाहतें अशा गोमती नदीचा प्रवाह सुरू होतो. या प्रवाहास मध्यें तीनहि बाजूंनीं धरण बांधून सरोवर बनविलें. हें धरण पंचवीस मैल व्यासाचें असून दरोबस्त शुभ्र संगमरवरी दगडानें बांधलेलें आहे. सभोंवार अगदीं वरपासून खालीं पाण्यापर्यंत त्याच दगडाच्या पायऱ्या केलेल्या आहेत. या सर्व कामास बाहेरून रुंद आणि भक्कम अशा मातीच्या धक्क्यानें पक्की मजबुती केलेली आहे.

महाराणा राजसिंह, त्याचें घरदार आणि राज्यांतले श्रीमंत लोक या सर्वांनीं या कामासाठीं सुमारें दोन कोटी रुपये काढले. या कामास लागणारा सर्व दगड आसपासच्या खाणींतून जमविला. हें सरोवर मोठें सुंदर आणि अत्यंत उपयोगी आहे. तथापि ज्या हेतूनें तें बांधण्यांत आलें, तो हेतु मनांत आणला ह्मणजे त्याची शोभा कितीतरी पटीनें जास्त वाटते. उपासमारानें मरणोन्मुख झालेल्या लोकांनां मदत करण्यासाठीं हें मोठें राष्ट्रोपयोगी काम महाराणा आणि महाराणी यांनीं उभारून पुरें केलें, ही गोष्ट त्या उभयतांच्या शहाणपणाची आणि प्रजावात्सल्याची नेहमीं साक्ष पटवील. यांत संशय नाहीं.

लढाया आणि दंग्याधोप्यांच्या आणीबाणीच्या वेळींहि हिंदु राजे-रजवाडे आपल्या गरीब प्रजेची किती काळजी घेत, हें पाहिलें ह्मणजे मनाला मोठा आनंद होतो. दुष्काळपीडितांच्या तरणोपायार्थ परोपकारबुद्धीनें जी या राजदंपत्यानें खटपट केली. तिच्या योगानें सर्वांच्या मनांत त्या उभयतांविषयीं आदर उत्पन्न होतो. या दुष्काळाच्या तोंडांतून मेवाडप्रांत सुटतो नसुटतो इतक्यांत त्या प्रांतावर आणि हिंदू राजांच्या इतर प्रदेशांवर एक नवीनच गदा आली. या नवीन प्रसंगांत तर या उभयतां दांपत्याच्या उमद्या स्वभावाचा प्रकाश चांगलाच पडला.

हिंदूलोकांस मुसलमान करण्यासाठीं औरंगजेबानें कांहीं वर्षें पुष्कळ प्रयत्न करून पाहिले, परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. जबरीचे उपायहि सर्व निष्फळ झाले. त्यानें लोकांचीं घरें जाळलीं, गांव उध्वस्त केले, नानाप्रकारांनीं लोकांना छळलें, तरी त्यांची स्वधर्मावरची श्रद्धा कमी न होतां उलट ती जास्तच दृढ होत गेली, असें जेव्हां बादशहानें पाहिलें तेव्हां आपल्या धोरणाचा कांहीं उपयोग होणार नाहीं अशी त्याची पुरी खातरी झाली.

बादशहाला पैशाची अतिशय अडचण पडली, तेव्हां पैसा मिळावा आणि आपला झालेला अपमान भरून यावा अशी त्यानें अजब युक्ति योजिली. इस्लाम आणि हिंदुधर्म यांच्यामध्यें जें अंतर आहे तें हिंदूलोकांनीं पैशाच्या द्वारें भरून काढलें पाहिजे, असा ठराव करून प्रत्येक हिंदूपासून डोईपट्टीदाखल कर वसूल करण्याचा त्यानें हुकूम फर्माविला. या करास इतिहासांत **'जिझिया'** अशी संज्ञा आहे. हा कर पूर्वी अफगाण राजकर्त्यांनीं हिंदूलोकांवर बसविला होता; परंतु मोंगलबादशहांनीं शहाणपणाचें धोरण ठेवून तो रद्द केला. राजनीतीच्या कोणत्याहि तत्त्वाचा अशा प्रकारच्या करास आधार नाहीं. असें असतां

औरंगजेबासारख्या मुत्सद्यानें ही एवढी चूक कशी केली, याचें पुष्कळ इतिहासज्ञांस आश्चर्य वाटतें. या कराच्या योगानें आपल्या धर्माकडे हलकेपणा येतो, ह्मणून कोणीहि हिंदू हा कर देण्यास अर्थात्च तयार नव्हता. शिवाय, पुष्कळांस हा कर देण्याचें सामर्थ्यहि नव्हतें. औरंगजेबापर्यंत सर्व मोंगल बादशहांनीं समबुद्धीनें वागविलेल्या हिंदूलोकांनां हा कर ह्मणजे गुलामगिरीचा छापच वाटूं लागला. हा कर दिला नाहीं तर कैदखाना, जप्ति, सूळ वगैरे शिक्षा सोसाव्या लागणार; बरें द्यावा तर आपण होऊन मुसलमानी धर्म हिंदूधर्माहून श्रेष्ठ आहे असें कबूल केल्यासारखें होणार ! अशा पेंचांत सर्व खानदानीचे हिंदू राजेरजवाडे सांपडले असतां मेवाडच्या राण्यानें विलक्षण नेट धरला आणि आपल्या लोकांस धीर देऊन औरंगजेबास ताळ्यावर आणण्याचा निश्चय केला.

राणीचा तेजस्वी स्वभाव आणि करामत हीं लक्ष्यांत आणिलीं ह्मणजे त्या शूर आणि पाणीदार बायकोनें या धाडसाच्या कामीं आपल्या पतीस चांगलेंच उत्तेजन दिलें असलें पाहिजे, असेंच प्रत्येकाला वाटेल. उभयतांनीं विचार करून बादशहास डोईपट्टीच्या बाबतींत एक पत्र लिहिण्याचें ठरविलें. हें पत्र ह्मणजे एक फार मोठा महत्त्वाचा खलिता आहे. यांत राण्यानें आपला बाणा, थोर परंतु अढळ निश्चय, बादशहास आपल्या अन्यायाचें स्वरूप पूर्णपणें कळेल अशा प्रकारें त्याची केलेली सणसणीत कानउघाडणी, ईश्वराविषयीं अति उच्च कल्पना, निःसीम आणि सत्वशील परोपकारबुद्धि आणि शुद्ध लोकप्रीति हीं त्या पत्रांत इतकीं प्रकाशित झालीं होतीं, कीं, त्याच्यापेक्षां अधिक उदात्त विचार कोणत्याहि देशाच्या अथवा कोणत्याहि काळच्या पत्रव्यवहारांत सांपडणें शक्यच नाहीं.

या खलित्यांत जहांगीर आणि शहाजहान यांच्या कारकीर्दींतील शहाणपणाच्या धोरणांचा उल्लेख करून त्या वेळच्या लोकस्थितीचें वर्णन केलें आहे. मागील काळ आणि चालू स्थिति यांची तुलना करतांना राण्याची स्पष्टोक्ति खरोखर वाखाणण्यासारखी आहे. राणा ह्मणतो " शहानूशहा, ही मागची स्थिति आपणास निवेदन केली आहे. आतां आपल्यासभोंवार काय दिसतें, तें पहा ! आपल्या कारकीर्दीत पुष्कळ लोकांचीं मनें आपल्या साम्राज्यास प्रतिकूळ झालेलीं आपण पाहतों. या लोकांच्या विमनस्कतेचा परिणाम आपल्या राज्यास भोंवल्याशिवाय राहीलसें आपल्यास वाटतें काय ? जिकडेतिकडे नासधूस आणि लुटालूट स्वैरपणें संचार करीत असल्यामुळें राज्यविस्तार आंखडत येईल. आपल्या राज्यांतील प्रत्येक प्रांत आज विपन्नावस्थेंत आहे. प्रांताचे प्रांत उजाड होत चालले आहेत, आणि लोकांवर संकटांची परमावधि झाली आहे. खुद्द बादशहाच्या खजिन्यांत पैशाची टंचाई, तर इतर लोकांची सांपत्तिक स्थिति काय झाली असेल याचा आपणच विचार करा. सैन्यांत असंतोष वाढत आहे, व्यापारी ओरडत आहेत. मुसलमान नाराज आणि हिंदु कंगाल. फार काय सांगावें, लाखों लोक अन्नास मोताद होऊन निराशेनें आणि त्वेषानें आपलीं डोकीं फोडून घेत आहेत ! "

पुढें प्रस्तुत विषयाकडे वळून राण्यानें लिहिलें होतें:—"इतक्या विपन्नावस्थेस जाऊन पोहोंचलेल्या लोकांपासून जबर करभार घेण्याच्या कामीं जो आपल्या सत्तेचा दुरुपयोग करतो, त्या राजाचा मान प्रजेमध्यें कसा राहील ? हिंदुस्तानचा बादशहा आपल्या दुबळ्या हिंदू प्रजेविषयीं मत्सरग्रस्त होऊन जुलमानें त्यांच्यापासून कर वसूल करतो, अशी लोकवार्ता इतर देशांतहि पसरली आहे ! ईश्वरप्रणीत

ह्मणून जे ग्रंथ आहेत त्यांच्यावर जर आपली श्रद्धा असेल तर केवळ मुसलमानांचाच नव्हे, तर सर्व मनुष्यजातीचा पालक परमेश्वर आहे, हें अबाधित तत्त्व आपणांस त्यांत सांपडेल. मुसलमान अथवा मूर्तिपूजक हे दोघेहि त्या परमात्म्यास सारखेच आहेत. वर्णभेद हा त्याच्याच इच्छेनें अस्तित्वांत आला. कारण, सर्व अस्तित्वाचा उगम त्याच्याचपासून आहे. आपल्या मशिदींत त्याची प्रार्थना चालते, मूर्तिपूजकांच्या देवळांत जेथें घंटारव होतो तेथेंहि पूजाविषय तोच असतो. ईश्वराच्या इच्छेनें अस्तित्वांत असलेले इतर धर्म व इतर रीतीभाती यांची निंदा करणें ह्मणजे त्याच्याच इच्छेला न जुमानण्यासारखें आहे. एखादें चित्र जर आपण विरूप केलें, तर तें चित्र काढणाऱ्या चितारयाचा आपणावर राग होणें साहजिक आहे. 'ईश्वराच्या कृतींतील दोष काढण्याचा आव घालून अमूक बरें आणि अमूक वाईट आहे असें ह्मणण्याचें साहस कोणीं करूं नये!' ह्मणून जें एका कवीनें ह्मटलें आहे, तें अगदीं बरोबर आहे."

बादशहाचा राग शांत करण्यासाठीं ह्मणून हें पत्र लिहिलें होतें, परंतु पत्राचा उद्देश एकीकडेसच राहून त्याच्या उलट परिणाम झाला. या पत्रानें बादशहास विशेषच चीड आली. आपल्या हातांत आलेल्या राजकन्येचें मोठ्या शिताफीनें हरण करून राण्यानें आपली फजिती केली होती, ती बादशहाच्या मनांत सारखी डंवचत होतीच. त्या अपमानाच्या जागृत स्मृतीमुळें औरंगजेबाचा क्रोधाग्नि जास्तच भडकला. त्यांतहि राण्यानें कर देण्याचें साफ नाकबूल करून महंमदी धर्माचें वर्चस्व मान्य केलें नाहीं, या गोष्टीनें बादशहास मुसलमान लोकांच्या धर्माभिमानाची या कामीं आयती मदत मिळाली. अर्थात्, लढाईस धर्माचें स्वरूप देण्याची उत्तम संधि औरंगजेबास सांपडून

त्यानें मोठ्या प्रमाणावर युद्धाची तयारी चालविली. बंगाल, काबूल आणि दक्षिण या ठिकाणीं असलेली बादशाही फौज त्यानें दिल्लीस बोलावून एवढी जंगी तयारी केली, कीं, ती पाहून एका छोट्या रजपूत संस्थानिकाच्या पारिपत्यासाठीं ही फौज गोळा केली नसून दुसरें कोठलें तरी राज्य जिंकण्याचा बादशहाचा हेतु असेल असेंच पुष्कळांस वाटलें.

औरंजेबासारख्या निश्चयी बादशहाच्या ह्या मातबर सैन्याशीं लढून आपला मुळींच निभाव लागणार नाहीं. अशी जरी राणीची खातरी होती, तरीहि आपण रणांगणीं मरून पडेपर्यंत आपल्या राणीचें आणि आपल्या संस्थानाचें रक्षण करण्याचा त्यानें निश्चय केला. एकामागून एक ह्याप्रमाणें बादशहानें सर्व शहरें काबीज केलीं; परंतु लोक त्याला हार जाईनात. ते डोंगर आणि पहाड हीं मजबूत ठिकाणें धरून बसले होते. त्या ठिकाणीं बादशहास त्यांच्यावर हल्ला करणें भाग पडलें. आतां मात्र वेळ फिरली. रजपूत लोकांनीं बादशहाच्या सैन्यास आरंभीं मुळींच अटकाव केला नव्हता; परंतु जसजसें तें सैन्य अडचणीच्या जागीं आलें, तसातसा तत्काळ जिकडूनतिकडून रजपूत लोकांनीं त्याच्यावर निकराचा हल्ला केला. पुढें आलेल्या सैन्याचा पुरा नाश होईपर्यंत त्यांनीं हल्ल्याचा जोर कमी केला नाहीं. असे अनेक वेळां हल्ले करून बादशहाच्या प्रचंड सैन्याची त्यांनीं पुरी नासाडी केली. अखेरीस जें थोडेंसें सैन्य शिल्लक राहिलें तें घेऊन दिल्लीस परत जातांना बादशहास या पराजयामुळें फार दुःख झालें. बादशाही निशाण, हत्ती, तंबू वगैरे सामान रजपुतांच्या हातीं पडलें. सर्व रजपुतान्यांत जिकडेतिकडे विजयोत्साहाचा गजर झाला. ही अत्यंत महत्वाची गोष्ट इ० स० १६८० च्या मार्च महिन्यांत घडली.

या लढाईचा परिणाम हिंदूस जितका अनुकूल व्हावा असें वाटलें होतें तितका जरी झाला नाहीं, तरी तो बराच चांगला झाला. औरंगजेबाचा जरी पूर्ण पराजय झाला, तरी त्याची बादशाही सत्ता कायमच असल्यामुळें, त्याला पुनः लढाई चालविणें अशक्य नव्हतें. तथापि हा झगडा पुढें चालू ठेवणें त्याला बरें वाटलें नाहीं; राण्याचें तहाचें बोलणें कबूल करून त्यानें युद्ध बंद केलें. डोईपट्टीचा कर उठविलाहि नाहीं किंवा त्याच्याविषयीं विशेष आग्रहहि धरला नाहीं. तथापि यापुढें हा कर हिंदू लोकांपासून बादशहानें ह्मणण्यासारखा वसूल केला नाहीं. यावरून राण्याचा मुलुख जरी उध्वस्त झाला होता, तरी या युद्धांत जयाची प्राप्ति अखेर त्यालाच झाली, असें ह्मटलें असतां चालेल.

आरंभापासून अखेरपर्यंत या युद्धांत राणी नेहमीं आपल्या पतिसंनिध असे. तिनें संकटांत राण्याला धीर द्यावा, त्याचें समाधान करावें आणि आपल्या प्रेमानें त्याची हिंमत वाढवावी. औरंगजेबाच्या सैन्याच्या धाडीमुळें ती जरी आपल्या राजधानींतील सुखास अंतरली होती, तरी त्याचें तिला मुळींच वाईट वाटलें नाहीं. उलट, बादशहाच्या तावडींतून सुटून ज्याला आपण आपलें अंतःकरण वाहिलें त्या आपल्या प्रिय पतीच्या संनिध आपण आहों, या गोष्टीनें तिला पुष्कळ सुख झालें. सुखांत किंवा संकटांत राण्यावर तिची निसीम भक्ति असे, आणि तिनें आपल्या कर्तव्यांत कधींहि कांहीं उणें पडूं दिलें नाहीं. आपल्यामुळें राण्यास इतकीं संकटें भोगावीं लागलीं ह्मणून तिला वाईट वाटे; परंतु याच कारणानें तिचें त्याच्यावरील प्रेम अतिशय वाढलें होतें. अत्यंत बिकट प्रसंगांतहि बाजूस असलेल्या आपल्या प्रिय पत्नीकडे पाहून, अरवली डोंगरावरून झडप घालून रूपनगरच्या

राजकन्येस आपण उचलून आणलें या गोष्टीच्या स्मरणानें राण्यास फार आनंद होई.

---

## राणी करणरथ.

मेवाडचा राणा रायमल्ल ह्याला तीन मुलगे होते. या तिघांपैकीं जयमल्ल आणि पृथ्वीराज हे आपल्या पित्याच्या हयातींतच मृत्यू पावले होते. रायमल्ल मरण पावल्यावर मेवाडच्या गादीवर त्याचा तिसरा मुलगा राणा संग हा बसला. या संग राण्याला सात बायका होत्या. राणी करणरथ ही संगाची सर्वांत धाकटी बायको होय. भाऊभाऊंत वितुष्टपणा आल्यामुळें संगास बरींच वर्षें मेवाडप्रांत सोडून बाहेर अज्ञातवासांत रहावें लागलें होतें. हे जे विपत्तीचे दिवस त्याला काढावे लागले, त्यामुळें त्याच्या अंगांतील उत्तम गुण प्रादुर्भूत होऊन तो जेव्हां गादीवर बसला तेव्हां त्यानें आपल्या स्वावलंबी आणि निश्चयी स्वभावाच्या योगानें सर्व लोकांवर चांगलीच छाप बसविली.

या राजाच्या कारकीर्दींत मेवाडच्या भरभराटीची कमाल झाली. दूरदूरच्या प्रदेशांतहि मेवाडच्या राण्याचा दरारा बसून राहिला होता. दुर्दैवेंकरून राजाच्या सद्दीचा जोर असाच अखेरपर्यंत कायम राहिला नाहीं. भरभराटीचीं पुष्कळ वर्षें गेल्यावर संग राण्याच्या दैवानें उलट खाण्यास सुरुवात केली. त्याचा भाग्यसूर्य अस्ताचलाचा मार्ग आक्रमण करूं लागला. आपल्या मोंगली सैन्यानिशीं बाबर त्याच्या राज्यावर चाल करून आला. अनेक वेळां मोंगली सैन्याचा संग राण्यानें पराभव केला, परंतु त्याच्या राज्यांतील फितुर शत्रूस दुजोरा आणण्यास

कारणीभूत होऊन राण्यास आपल्या उरलेल्या सैन्यानिशीं पलायन करणें भाग पडलें.

मेवाडच्या डोंगरांत राणा संग आश्रय करून राहिला होता व शत्रूस हांकून लावल्याशिवाय आपली राजधानी जें चितुर शहर त्यांत प्रवेश करावयाचा नाहीं, असा त्यानें आपला निश्चय सर्वांस जाहीर केला. त्याच्या आयुष्याची दोरी तुटली नसती, तर त्यानें आपला हा पण निःसंशय पुरा केला असता. परंतु या नवीन आश्रयस्थानांतहि राजद्रोही लोकांनीं त्याची पाठ सोडली नाहीं. नाना प्रकारचीं संकटें, हालअपेष्टा आणि जीवावरचा प्रसंग यांनां न जुमानतां अतुल पराक्रमानें आपल्या राज्याचें वैभव ज्यानें वाढविलें, व आपल्या शौर्यानें बाबरासारख्या पराक्रमी शत्रूकडूनहि ज्यानें धन्यवाद मिळविले, अशा आपल्या राजास त्याच्याच प्रधानमंडळांतील कांहीं अधम लोकांनीं विषप्रयोग करून मृत्युपंथीं पाठविलें !

राणा संग हा मध्यम बांध्याचा पुरुष होता खरा, तथापि त्याची शक्ति फार अचाट असे. त्याची अंगकांति सुंदर असून डोळे अत्यंत विस्तृत होते. हा डोळ्यांचा विस्तृतपणा त्याच्या वंशजांमध्यें आजहि पाहण्यांत येतो. मृत्युसमयीं त्याच्या शरीराची स्थिति पहाणाऱ्या कोणालाहि त्याच्या चरित्राचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहिलें नसतें. ऐन तारुण्यांत असतांना पृथ्वीराजाबरोबर तंटा होऊन मारामारी झाली. त्या झटापटींत संगाचा एक डोळा गमावला होता. दिल्लीच्या लोदी राजांबरोबर युद्ध करीत असतांना त्याचा एक हात तुटून पडला होता. एका पायाला तोफेचा गोळा लागून तो जायबंदी झाला होता. शिवाय भाल्याच्या आणि तरवारीच्या ऐंशीं जखमा त्याच्या शरीराच्या निरनिराळ्या भागांवर झाल्या असल्याच्या स्पष्ट खुणा होत्या ! असो.

वीरास शोभा आणणाऱ्या या अलंकारांनीं मंडित असा राण्याचा देह जरी अग्निसात् झाला, तरी त्याच्या शौर्याची आणि पराक्रमाची कीर्ति सर्व भरतखंडांत आज आहे त्याप्रमाणें पुढेंहि सदैव दुमदुमत राहील.

राणी करणरथ ही संग राण्याची सर्वांत धाकटी बायको होती, हें वर सांगितलेंच आहे. तथापि हिचें सौंदर्य सर्वांत अधिक होतें व हिच्यावर राण्याची अत्यंत प्रीति होती. करणरथ राणीचें आपल्या विख्यात पतीवर जें प्रेम असे, त्याला तर सीमाच नव्हती! अनेक समरांगणांवर मिळविलेले वीरश्रीचे प्रसाद अशा ज्या जखमा त्यांनीं राण्याचा देह व्यापून जाऊन त्याचें सौंदर्य जरी अदृश्य झालें होतें, तरी त्याचें शौर्य, त्याचें धैर्य, त्याचा सत्त्वशील स्वभाव आणि त्याचें कनवाळू अंतःकरण यांच्या प्रभेनें तो सदैव सूर्यासारखा तेजःपुंज दिसत असे. त्याची जगद्विख्यात कीर्ति, ठिकठिकाणीं दिसणाऱ्या अनेक जखमांच्या किरणांनीं सर्वत्र फांकलेली वीरश्री, आणि प्रेमपूर्ण अंतःकरण, यांच्या योगानें करणरथ राणीचें अंतःकरण संग राण्यावर पूर्णनिष्ठेनें बसलें होतें. परंतु हायहाय! पतीवर एवढी निष्ठा, एवढें प्रेम करणाऱ्या त्या महान् पतिव्रता वीरपत्नीस, त्या निष्ठेचा आणि प्रेमाचा सर्वांशीं योग्य मोबदला जो पतिसहवास, तो फार वेळ लाभला नाहीं. लग्नसमारंभ आटोपून थोडे दिवस जातात न जातात तोंच राण्यावर अकस्मात् पराजयाचा प्रसंग आला, व ज्या प्रधानांस त्यानें वैभवास चढविलें होतें त्यांच्याच राजद्रोहास तो बळी पडला!

राण्याचा अंत झाल्यावर थोड्याच महिन्यांनीं राणी करणरथ प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. त्याचें नांव उदेसिंग असें ठेविलें होतें. या उदेसिंगाचा जन्म जसा संकटावस्थेंत झाला, त्याचप्रमाणें पुढील आयुष्यक्रमांतहि त्याला नाना प्रकारच्या प्रसंगांतून आपला निभाव करून घ्यावा लागला.

संग राण्याप्रमाणें मोठ्या सायासानें त्याला मेवाडच्या गादीची प्राप्ति झाली व त्यानें आपल्या कारकीर्दींत राज्य उत्तम प्रकारें चालविलें.

राणा संग मृत्यु पावल्यावर त्याचा मुलगा रतनसिंग हा गादीवर बसला. त्यानेंहि समरांगण हीच आपली राजधानी केली होती. पांच वर्षें राज्य करून हाहि राणा मृत्युमुखीं पडला. रतनसिंगानंतर संग राण्याचा दुसरा मुलगा विक्रमाजित् हा गादीवर बसला. हा राजपुत्र रागीट, खुनशी, आणि बेमुर्वत स्वभावाचा असल्यामुळें त्याचें आणि सरदारलोकांचें लौकरच बनेनासें होऊन त्यांच्यांत दुही माजली. राज्यांत अंदाधुंदी होऊन जिकडेतिकडे अस्वस्थता पसरली. त्याचे सरदार त्याला मुळींच मान देत नसत, इतकेंच नव्हे, तर एकदा त्यांनीं त्याचा हुकूम मानण्याचें साफ नाकारलें. राण्यालाहि आपला हुकूम अमलांत आणण्याचें सामर्थ्य राहिलें नव्हतें.

करणरथ राणीचा पुत्र उदेसिंग या वेळीं सहा वर्षांचा लहान मुलगा होता. तथापि मेवाडच्या सरदारांच्या मनांत तो भरला, एवढेंच नव्हे, तर विक्रमाजितास पदच्युत करून उदेसिंगास गादीवर बसवावें व सर्व कारभार राणीच्या हातीं द्यावा, असेंहि कितीएकांस वाटलें. परंतु रजपूत लोकांत बालराजाचें राज्य सुयंत्र चालत नसल्याचा वारंवार अनुभव आलेला असल्यामुळें कांहीं वजनदार सरदारांनीं ह्या व्यवस्थेस हरकत आणिली.

ह्या गोष्टीचा विचार दरबारी लोकांत चालला असतां असा एक प्रसंग ओढवला, कीं, प्रत्येकास आपल्या निभावाची कांहींना कांहींतरी तरतूद करणें भाग पडलें, आणि मेवाडच्या राज्यांत मोठमोठ्या घडामोडी होऊन गेल्या राज्यांतील या दुहीची इत्थंभूत बातमी गुजरातचा सुलतान बहादुरशहा ह्याला लागून मागील सूड उगवून घेण्याची ही

उत्तम वेळ आहे असा विचार करून त्यानें मोठें सैन्य जमविलें आणि राणा विक्रमाजितावर स्वारी केली. राणा विक्रमाजित् या वेळीं बुंदी प्रांतांत छावणी देऊन राहिला होता. तशाहि स्थितींत राण्यानें शत्रूशीं मोठ्या शौर्यानें लढाई दिली. परंतु ऐन वेळीं बरेच लोक त्याला सोडून गेल्यामुळें त्याचा निभाव लागला नाहीं.

राण्यास सोडून निघालेले लोक थेट चितुर येथें गेले आणि राजपुत्र उदेसिंगाचें शत्रूपासून संरक्षण करण्यासाठीं आपण आलों आहों, असें त्यांनीं राणी करणरथ हिला कळविलें. राण्याला समरांगणांत टाकून आलेल्या लोकांचा राणीस फार राग आला आणि त्यांची तिनें अत्यंत निर्भर्त्सना केली. तथापि बहादुरशहाचा हेतु चितुर शहर घेण्याचा असल्याविषयींची बातमी तिला कळल्यामुळें शहरच्या व किल्ल्याच्या बचावासाठीं तिनें त्यांस ठेवून घेतलें.

चितुर शहरच्या नांवांत इतकी कांहीं जादू भरलेली होती, कीं, त्या शहरावर प्रसंग आल्याची बातमी मिळाली पुरे, कीं, जिकडून तिकडून त्याच्या संरक्षणासाठीं रजपूत लोक धावून येत. ह्या वेळींहि असाच प्रकार झाला. त्यांतहि करणरथ हिच्यासारख्या तरुण, सौंदर्यसंपन्न आणि बाणेदार राणीचें आमंत्रण असल्यामुळें तर त्यांनां विशेषच हुरूप आला. थोडक्याच वेळांत कशाहि प्रसंगांत चितुर शहरचें रक्षण सहज करतील असे अनेक शूर योद्धे जमा झाले.

गुजरातच्या सुलतानानें ह्या मोहिमेसाठीं मोठेंच सैन्य आणलें होतें. तट पाडावयाच्या नेहमींच्या सामुग्रीशिवाय युरोपीयन गोलंदाजांनीं तयारींत ठेविलेल्या मैदानी तोफाहि त्यानें आपल्याबरोबर आणिल्या होत्या. वेढ्याच्या कामीं तोफांचा उपयोग केल्याचें हिंदुस्तानच्या इतिहासांत हें पहिलें उदाहरण होय. ह्याच नवीन साधनांच्या

योगानें सुलतानास चितुर शहर घेण्याच्या कामीं यश आलें, असें ह्मणावयास हरकत नाहीं.

शहरच्या संरक्षक फौजेनें कैक महिनेपर्यंत शत्रूस दाद दिली नाहीं. राणीची देखरेख आणि तिच्याकडून मिळत असलेलें उत्तेजन यांचा परिणाम असा झाला, कीं, रजपूत योद्धयांनीं पराक्रमाची केवळ कमाल केली. शहरसंरक्षणाची व्यवस्था, सैन्याची रचना, फार काय, एकंदर सर्व लष्करी कामांत राणीची पूर्ण दक्षता होती. अडचणीच्या प्रसंगीं सरदार लोकांच्या सभेंत राणी नेहमीं असे, इतकेंच नव्हे, तर चिलखत चढवून व हातांत नंगी समशेर घेऊन आपल्या लोकांची वीरश्री उत्तेजित करण्यासाठीं ती तटावर अगदीं पुढें उभी राही !

इतकी निकराची लढाई रजपूत लोकांकडून चालू असतांहि शत्रूचें राऊल पुढेंच पडत गेलें. त्यांतहि जेव्हां एक भयंकर सुरुंग उडून तटाचा बराच भाग एका बाजूनें कोसळून पडला, तेव्हां तर शहराच्या सुरक्षितपणाविषयीं रजपूत लोकांस भीतिच पडली. या वेळीं राणीनें अशी युक्ति काढली, कीं, तिच्या योगानें ऐन आणीबाणीच्या वेळीं-सुद्धां शहरच्या बचावाची आशा वाटूं लागली. रजपूत राजेरजवाडे आणि सरदार लोकांस आपापलें सैन्य एकत्र करून आणखी थोडे दिवस तिनें दम धरण्यास सांगितलें. तेवढ्या मुदतींत सड्या स्वाराबरोबर हुमायुन बादशाहाकडे आपली राखी पाठवून शहरच्या बचावासाठीं त्याची मदत मागण्याचा तिनें निश्चय केला.

राजस्थानांतील ही राखी पाठविण्याची चाल प्रसिद्ध आहे. ही राखी अथवा हातांतलें कंकण, कोणत्याहि स्त्रीनें संकटाच्या वेळीं कोणा रजपूत वीराकडे पाठविलें, ह्मणजे त्या दोघांमध्यें बहिणीभावाचें नातें झालें, असा त्या लोकांचा समज आहे. राखी हातांत पडली ह्मणजे

ज्याच्या हातीं ती येईल त्यानें ती पाठविणाऱ्या स्त्रीच्या संरक्षणार्थ धांव घेतलीच पाहिजे. मग त्या कामीं त्याचा जीव जावो अथवा राहो. ही राखी पाठविण्याच्या पलीकडे या उभयतांमध्यें जास्त संबंधाची मुळींच जरूर नाहीं. एवढेंच नव्हे, तर जिच्या संरक्षणार्थ हा राखीबंद भाऊ आपला प्राण संकटांत घालतो, तिचें त्याला दर्शनसुद्धां होण्याचा बहुधा संभव नसतो. हा बंधुभगिनीचा संबंध एकदा अशा रीतीनें जडला, ह्मणजे आमरण तो तसाच राहतो. एखाद्या राजकन्येचा राखीबंद भाऊ होण्यांत कोणत्याहि योद्ध्यास त्या वेळीं मोठा अभिमान वाटत असे. शिवाय, ही राखी ह्मणजे विशेष मोलाची असली पाहिजे, असें मुळींच नाहीं. रेशमाचा नुसता दोरा असो, किंवा रत्नजडित कंकण असो, दोघांचा परिणाम सारखाच. या राखीचा स्वीकार केल्याची खूण ह्मटली ह्मणजे या जोडलेल्या भावाकडून राखी पाठविणाऱ्या बहिणीस एक रेशमाची अथवा जरीची कांचोळी जात असे. या कांचोळीबरोबरच त्यानें तिच्या साहाय्यार्थ निघालें पाहिजे. राजस्थानच्या इतिहासांत या कांचोळीबरोबर कधींकधीं सर्व प्रांताचा प्रांत गेल्याचीं उदाहरणें आहेत!

हुमायुन बादशहाच्या हातीं जेव्हां ही राणीची राखी जाऊन पोहोंचली, त्या वेळीं तो बंगाल्यांत बंडखोर सरदारांबरोबर लढाईंत गुंतला होता. राणीनें पाठविलेली राखी पाहून हुमायुन इतका खूष झाला व तिचें विनंतिपत्र वाचून त्याला इतका आनंद झाला, कीं, त्यानें तिच्या विनंतीचा तेव्हांच स्वीकार केला. करणरथ राणीशीं बंधुत्वाचें नातें त्यानें अत्यंत आनंदानें पतकरिलें, आणि आपल्या या जोडलेल्या भगिनीच्या मुलाचें ह्मणजे उदेसिंगाचें संरक्षण करण्याचें वचन त्यानें मोठ्या प्रेमानें दिलें

चितुर शहराच्या बचावाची गोष्ट तर राहूं दे, परंतु हिंदुस्तानच्या बादशाही सरकारास अत्यंत महत्त्वाचा असा जो रिणतंभोरचा किल्ला तो जरी राणीनें मागितला असता, तरीहि आपण तो तेव्हांच देऊन टाकला असता, असें बादशहानें जासुदाबरोबर सांगून पाठविलें. बंगाल्यांतलें काम तसेंच सोडून आपलें वचन पाळण्यासाठीं हुमायुन बादशहा आपल्या सैन्यानिशीं चितुर शहराकडे निघाला; परंतु बादशहा येऊन पोहोंचण्यापूर्वींच बहादुरशहानें तें शहर सर केलें होतें. रजपूत लोकांनीं आपल्या पराक्रमाची पराकाष्ठा केली; परंतु शत्रूंच्या सामर्थ्यांपुढें त्यांचा इलाज चालेना. एकामागून एक माऱ्याच्या जागा सुलतानाच्या ताब्यांत गेल्या आणि मरावें किंवा स्वाधीन व्हावें, एवढाच काय तो प्रश्न रजपुतांपुढें राहिला.

या प्रश्नाचा निकाल करण्यास रजपूत वीरांस फार वेळ लागला नाहीं. त्यांनीं निर्वाणीची तयारी केली. शहररक्षक देवतेस संतुष्ट करण्यासाठीं राजकुळांतील पुरुष बळी द्यावा, आणि शहरांतील सर्व स्त्रियांनीं जोहर करून सर्व पुरुषांनीं शत्रूशीं लढत आपले प्राण धारातीर्थीं अर्पण करावे, असा सर्वानुमतें ठराव झाला. त्याप्रमाणें देवलचा राणा रावजी आपले प्राण देवीस अर्पण करण्यास सिद्ध झाला. त्याला सर्व राजचिन्हांनीं मंडित करून मेवाडचें निशाण त्याच्यावर उभारलें व सर्वांनीं आपली अखेरची तयारी केली. पुढें लोकांस कोणीतरी पुढारी हवा, ह्मणून राजपुत्र उदेसिंग याला तेवढा जीवंत ठेविला. आपला केवळ प्राण असा जो उदेसिंग त्याला अखेरचा निरोप देतेवेळीं राणी करणरथ अत्यंत शोकाकुल झाली. तिनें त्याला बुन्दीचा राजा सूरतनसिंग याच्या हवालीं केलें.

इतर सर्व पुरुषांनीं केशरी रंगाचे पोषाख चढविले आणि बायकांसाठीं जोहरची सर्व तयारी करण्यांत आली. यथासांग तयारी करण्यास वेळच नव्हता. किल्ल्यांत ही व्यवस्था लागते न लागते इतक्यांत शत्रूनें तटास आणखी एक भगदाड पाडलें आणि लगेच सुलतानाचें सैन्य आंत घुसलें. घाईघाईनें काष्ठें व इतर ज्वालाग्राही वस्तूंचा पर्वतप्राय ढीग करून खडक पोंखरून केलेल्या विस्तीर्ण गुहेंत दारूचीं पोतीं भरलीं. तेरा हजार बायका आपले देह अब्रूसाठीं अग्नीस अर्पण करण्यास निघाल्या ! सर्वांच्या अग्रभागीं करणरथ राणी होती. तिनें त्या सर्वांस चांगला उपदेश करून शत्रूच्या हातून देहाची विटंबना होऊं देण्यापेक्षां आपला पवित्र देह सर्वपावक जो अग्निनारायण त्याच्या हवालीं करून आपल्या पतींबरोबर स्वर्गसुखाचा लाभ करून घेणें किती श्रेयस्कर आहे तें थोडक्यांत सांगितलें. लगेच शेवटचा विधि होऊन राणीसहवर्तमान तेरा हजार बायकांनीं अग्निप्रवेश केला !!!

हा भयंकर विधि आटोपल्यावर किल्ल्याचे दरवाजे खुले करून सर्व रजपूत देवळच्या राण्याबरोबर बाहेर निघाले व त्या सर्वांनीं निराशेच्या धैर्यानें लढून आपले देह धारातीर्थीं पावन करून घेतले !

पुढें गुजरातच्या सुलतानानें नगरांत प्रवेश केल्यावर त्याच्या दृष्टीस जो देखावा पडला, तो पहातांच त्याच्या चेहऱ्यावरचें पाणी नाहींसें झालें. जिकडेतिकडे छिन्नविच्छिन्न प्रेतांशिवाय त्याच्या दृष्टीस कांहींच पडलें नाहीं !

हुमायुन बादशहास जरी वेळेवर येतां आलें नाहीं, तरी राणीच्या मृत्यूचा सूड उगवतां येईल इतक्या अवकाशांत तो येऊन ठेपला आणि पुढें बहादुरशहास सैन्यानिशीं त्यानें शहरांतून हांकून काढलें व त्याची इतकी दाणादाण उडवून दिली, कीं, चितुर तर राहोच, पण

त्याला आपल्या स्वतःच्या मुलखांतहि टिकाव धरतां येईना. समुद्र-किनाऱ्यापयत तो पळत गेला व गलबतांतून दीव बेटांत जाऊन पोहोंचला

ज्या राणीनें आपलें व आपल्या लहान पुत्राचें संरक्षण करण्याचें पवित्र काम बंधु समजून आपल्याकडे सोंपविलें, तिचा, आपली मदत जाण्याच्या पूर्वी, अशा भयंकर प्रकारें अंत झालेला पाहून हुमायुन बादशहानें अत्यंत शोक केला. पुढें पुष्कळ वर्षेंपर्यंत त्याला या दुःखाचा विसर पडला नाहीं.

## पतियाळाची राणी कुंवरसाहेब

पतियाळा संस्थान सर्व शीख संस्थानांत फार प्रसिद्ध आणि महत्त्वाचें आहे. तेथील महाराजास ब्रिटिश सरकारकडून सतरा तोफांची सलामी मिळते. या महाराजापेक्षां वरच्या दरज्याचे असे एक कांय ते काश्मीरचेच महाराज आहेत. पंजाबच्या एतद्देशीय राजेरजवाड्यांत पतियाळाच्या महाराजापेक्षां दुसरा कोणी संस्थानिक मानमरातबानें वरचढ नाहीं

पतियाळा संस्थानच्या कारभाराशीं आमच्या चरित्रनायिकेचा संबंध इसवी सन १७९३ सालीं सुरू झाला. त्या वेळीं पतियाळाच्या गादीचा मालक राजा साहेबसिंग ह्मणून एक तरुण, कमकुवत आणि व्यसनी असा राजपुत्र होता. स्वतः राज्यकारभार हांकण्यास तो अर्थात् असमर्थ होता. संस्थानांतील आडदांड सरदारलोकांवर त्याला विश्वास ठेवून रहातां येईना. अशा वेळीं त्यानें एक फार महत्त्वाची तोड काढली. ती ही, कीं, आपली बहीण राणी कुंवरसाहेब हिला बोलावून आणून तिच्याकडे राज्याचा सर्व कारभार सोंपविला.

लहानपणापासून सौन्दर्य आणि शहाणपणा यांविषयीं राणी कुंवरसाहेब हिची ख्याति होतीच. सरदार जयमल्लसिंग कन्हया या नांवाच्या एक शीख सरदाराशीं तिचें लग्न झालें होतें. दिनानगरच्या वरच्या बाजूस बारी दुवाबच्या बऱ्याच भागाची मालकी सरदार जयमल्लसिंगाकडे होती. जयमल्लसिंगास आपल्या बायकोच्या योग्यतेविषयीं फार अभिमान वाटत असे. कुंवरसाहेब हिच्या भावानें पतियाळाचा मुख्य कारभार आपल्या हातीं घेण्याविषयीं जेव्हां तिला विनंति केली तेव्हां हें अति बिकट काम पतकरण्याचें तिनें मोठ्या धैर्यानें कबूल केलें. ह्या तिच्या कबुलीस जयमल्लसिंगाची पूर्ण संमति होती. परंतु हें मुख्य प्रधानकीचें काम पतकरतांना राज्यव्यवथेंत आपणास वाटेल तो फेरबदल करण्यास, अथवा वाटतील त्या सुधारणा अमलांत आणण्यास पूर्ण मोकळीक असावी, असा तिनें राजा साहेबसिंगाकडून करार करून घेतला होता.

राज्यकारभार हातीं घेतल्यानंतर राणी कुंवरसाहेब हिनें इतक्या शहाणपणानें, नेटानें, आणि दक्षतेनें कारभार हांकला, कीं, थोडक्याच दिवसांच्या अवकाशांत पूर्वींचे पुष्कळ गैरव्यवस्थेचे प्रकार नाहींसे होऊन संस्थानची स्थिति सुधारणेच्या मार्गास लागली आणि राजास पुष्कळ आनंद झाला. सर्वत्र शांतता आणि भरभराट पुनः नांदवायास लागलीं, असें पाहून पतियाळाच्या प्रजेसहि नवीन उमेद आली.

अशा स्थितींत पुष्कळ दिवस गेले नाहींत तोंच आपला पति संकटांत पडल्याची बातमी राणीसाहेबांस समजली. फत्तेसिंग ह्मणून एक सरदार जयमल्लाचा एक चुलत भाऊ होता. फत्तेसिंगाचें आणि जयमल्लाचें पुष्कळ दिवसांपासून वैर होतें. त्यानें डाव साधून जय-

मल्लास पकडलें व कैद करून ठेवलें. हें वर्तमान ऐकतांच राणीस आपल्या नवऱ्याविषयीं फार काळजी लागली. तिनें आपला भाऊ राजा साहेबसिंग याच्या पदरचें सैन्य बरोबर घेऊन आणि सैन्याचें आधिपत्य स्वतःकडे घेऊन फत्तेगडावर स्वारी केली व मोठ्या पराक्रमानें आपल्या पतीची शत्रूच्या हातून सुटका केली. या कामीं तिनें जें धाडस आणि शौर्य दाखविलें, त्याच्या योगानें तिची कीर्ति वाढून संस्थानांत तिचा अंमल चांगलाच बसला.

इ. स. १७९४ या सालीं मराठ्यांचें मातब्बर सैन्य यमुना नदी उतरून पतियाळाकडे वळलें. मार्गांतील सर्व शीख संस्थानांकडून मराठ्यांनीं खंडणी घेतली होती. पतियाळाच्या जवळ आल्यावर मराठ्यांच्या सरदारानें राजा साहेबसिंगास शरण येण्याविषयीं निरोप पाठविला. आपल्या निरोपास नकाराचा जवाब येईल, असें मराठ्यांस मुळींच वाटलें नव्हतें. कमकुवत राजा, आणि मुख्य प्रधान तर केवळ एक तरुण स्त्री, अशी स्थिति असल्यामुळें मराठ्यांस सर्व थट्टाच वाटत होती. तथापि लौकरच त्यांचा भ्रम दूर झाला. राणीकडून त्यांनां एक सणसणीत पत्र आलें. त्यांत संस्थानचा उपमर्द केल्याबद्दल राग प्रदर्शित करून 'तुम्हांला वाटेल तें करा!' असा रोकडा जवाब दिला होता.

राणीनें अशा प्रकारचा नेट धरलेला पाहून आसपासच्या सर्व शीख लोकांस पुष्कळच अवसान आलें. आसपासच्या संस्थानांतून राजेरजवाडे तिच्या कुमकेस आले. हां हां म्हणतां राणीजवळ सात हजार सैन्य जमलें. त्याचें आधिपत्य स्वतः स्वीकारून मराठ्यांचा समाचार घेण्यास राणी कुंवरसाहेब रणमैदानावर आली. अंबालापासून थोड्याच अंतरावर मर्दनपुर नांवाचें गांव आहे, त्याच्याजवळ

या दोन्ही सैन्यांची गांठ पडली व चांगलीच झटापट झाली. शीख लोकांची संख्या फार कमी असल्यामुळें अर्थात्‌च त्यांचें फार नुकसान होऊन ते माघार घेऊं लागले. पतियाळाच्या सैन्याबरोबर राणी स्वतः हजर होती, हें वर सांगितलेंच आहे. राजा साहेबसिंग नगरांतच राहिला होता. त्याला सैन्याबरोबर निघण्याचें धैर्य झालें नाहीं. या युद्धांत शीख लोकांचा पराजय होतो असें जेव्हां स्पष्ट दिसूं लागलें, तेव्हां राणीनें जें वर्तन केलें, त्यावरून सेनापतीच्या कामास ती किती योग्य होती, तें दिसून येतें. आपले लोक मागें फिरतात असें दिसून येतांच ती आपल्या रथांतून एकदम खालीं उतरली आणि म्यानांतून तरवार उपसून आपल्या लोकांसमोर उभी राहून गर्जना करून ह्मणाली "पतियाळा संस्थानचे वीरहो! तुह्मी रणांगणांतून पळ काढणार काय? तसें केलेंत तर तुमची जी बेअब्रु होईल ती कधींच नाहींशी होणार नाहीं! मी स्त्री आहें—तुमच्या राजाची मी बहीण! मला रणांत एकटी मरावयास सोडून देऊन तुह्मी शत्रूस पाठ दाखवून जाणार ना? शूर वीरांनो! हाच तुमचा पुरुषार्थ? हेंच तुमचें शौर्य? मी तुह्मांला निश्चयपूर्वक सांगतें, तें ऐका. तुह्मीं जाणार तर खुशाल जा. मीं एक पाऊलसुद्धां मागें घेणार नाहीं!"

राणीचा हा निश्चय व तिचें हें आवेशाचें भाषण ऐकल्यावर त्यांनां इतकी लज्जा वाटली व धैर्य आलें, कीं, त्यांनीं सर्वांनीं मिळून मोठ्या निकरानें हल्ला केला व संध्याकाळ होईपर्यंत मराठ्यांचें कांहींएक चालूं दिलें नाहीं. रात्र पडेपर्यंत कोणत्याच बाजूची सरशी झाली नाहीं. रात्र झाली तेव्हां राणीस पतियाळा येथें परत जाण्याविषयीं तिचे सरदार आग्रह करूं लागले. कारण, रात्रीच्या आश्रयानें तिला सुखरूप परत जातां येण्यासारखें होतें. सकाळ झाल्यावर शत्रु जोर करून आपल्या

कमजोर झालेल्या सैन्याचा धुव्वा उडविल्याशिवाय राहणार नाहीं, ही त्यांची खातरी होती. परंतु राणीनें हा उपदेश साफ अमान्य केला. शत्रूचा मोड केल्याशिवाय परत जावयाचें नाहीं, हा तिचा निश्चय बिलकुल ढळला नाहीं. मराठ्यांच्या छावणीवर रात्रीच्या काळोखांत अचानक हल्ला करण्याचा आपला बेत सांगून सावधगिरीनें तयारी करण्याविषयीं तिनें हुकूम फर्माविला. ही धाडशी कल्पना अमलांत आली, तरच जयाची थोडीबहुत आशा होती. असो. राणीच्या हुकुमाप्रमाणें सर्व फौज शस्त्रांनिशीं हल्ला करण्यास तयार झाली. शीख लोक मराठ्यांच्या छावणीपर्यंत लपूनछपून रांगतच गेले व तेथें गेल्यानंतर एकदम उठून जसा एखादा पर्वताचा कडा एकाएकीं तुटून पडतो, तसे ते मराठ्यांवर काळोख्या रात्रीं तुटून पडले ! जे समोर आले ते शीख लोकांच्या तरवारींस बळी पडले व छावणींत एकच गोंधळ उडून गेला. ह्या हल्ल्यांत मराठ्यांचें विशेषसें नुकसान झालें, अशी गोष्ट नाहीं; परंतु त्यांच्या मनावर त्याचा परिणाम विशेष झाला. शीख सैन्याचें आधिपत्य जरी स्त्रीकडे होतें, तरी तिचा निश्चय आणि युद्धकौशल्य सामान्य प्रतीचें नव्हतें, अशी त्यांची खातरी झाली. या रात्रीच्या हल्ल्यानें कच खाऊन भयाभीत झालेलें मराठ्यांचें सैन्य पतियाळाकडला मोर्चा फिरवून परत आपल्या हद्दींत येण्यास निघालें. पुढें मराठ्यांनीं पतियाळाच्या शीख लोकांवर स्वारी करण्याचा नादच सोडून दिला. अशा प्रकारें राणीचें शौर्य आणि चातुर्य यांच्या योगानें पतियाळा संस्थानाचा बचाव झाला.

नाहेनच्या राजाविरुद्ध त्याच्या लोकांनीं १७९५ सालीं बंड केलें. राजाकडून बंडाचा प्रतिकार होईना व बंडवाले शिरजोर होऊन राजा अगदींच अडचणींत आला. त्याला मदत करावी, या उद्देशानें राणीनें

आपलें सैन्य सिद्ध केलें व त्याच्या मदतीस ती जातीनें गेली. पुढें नाहेनच्या राजाचा लोकांवर पूर्णपणें अंमल बसवून, स्वतः तीन महिनेपर्यंत तेथें राहून तिनें त्या लहानशा संस्थानची चांगली व्यवस्था लावली. या कामगिरीबद्दल तिची मोठी वाहवा झाली, आणि राजानेंहि तिला बहुमोल देणग्या दिल्या.

नाहेनच्या स्वारीनंतर दोन वर्षांनीं आणखी एक अशीच गोष्ट घडून आली. जॉर्ज टॉमस म्हणून एक धाडशी युरोपियन, हिंदुस्तानांत सदोदित चालू असलेल्या घडामोडींत आपल्या तरवारीनें नशिबाचा मार्ग मोकळा करीत असतां त्याला यश येऊन त्याच्या हातीं हन्सी आणि हिसार हे दोन प्रांत पडले. मिळालेल्या या सिद्धीनें संतुष्ट न होतां, जॉर्ज टॉमस शीख लोकांच्या मुलुखावर हल्ले करूं लागला. त्याच्याजवळ पायदळाचीं आठ पलटणें, एक हजार स्वार आणि पन्नास तोफा, इतकी युद्धसामुग्री होती. मुख्यमुख्य शीख सरदार लाहोरास गेले आहेत ही संधि पाहून झिन्द या मजबूत ठाण्यास त्यानें एकदम वेढा दिला. झिन्दच्या वेढ्याची बातमी समजतांच शीख सरदार लाहोराहून निघून वेढा उठविण्यासाठीं सैन्य जमा करूं लागले. पुढें शत्रूच्या सैन्याशीं त्यांच्या बऱ्याच चकमकी झाल्या, परंतु त्यांत जॉर्ज टॉमस याचीच सरशी झाली. पतियाळाची राणी कुंवरसाहेब हिनें आपल्या लोकांनिशीं त्यांस वेळींच मदत केली नसती, तर शीख सरदारांचा त्याच्यापुढें मुळींच टिकाव लागला नसता.

राणी कुंवरसाहेब हिच्या नांवाचा दरारा व तिच्या सैन्याची मजबुती यांचा परिणाम शत्रूवर चांगलाच झाला. जॉर्ज टॉमस याला पतियाळाचें सैन्य आणि त्याच्यावर आधिपत्य चालवणारी पराक्रमी राणी यांच्यासमोर आपला निभाव लागणें कठीण आहे असें कळून चुकलें. त्यानें

झिन्दचा वेढा उठविला आणि मेहम येथें तो परत निघून गेला. परंतु तेथेंहि शीख लोकांनीं त्याचा पाठलाग केला. जॉर्ज टॉमस यानें शीख सैन्यास फसविण्यासाठींच हा पळ काढला होता. मराठ्यांच्या सैन्यावर राणीनें जसा रात्रीचा हल्ला केला होता त्याप्रमाणें यानेंहि या वेळीं रात्रीची संधि साधून दोन हजार फौजेनिशीं शिखांच्या सैन्यावर एकाएकीं हल्ला केला. राणीच्या सैन्याशिवाय इतर शीख सैन्य सावध नव्हतें. आपला जय झाला असें त्यांनां वाटून ते लोक खाण्यापिण्याच्या चैनींत दंग झाले होते. एकाएकीं टॉमसचे स्वार छावणींत शिरले आणि त्यांनीं शीख लोकांची दाणादाण उडविली.

ही दाणादाण झाल्यावर शीख लोकांचा जमाव फुटल्यासारखा झाला. सरदारलोक आपापसांत भांडूं लागले. ते एकत्र होते तोंपर्यंत जॉर्ज टॉमसच्यास त्यांचा वचक असे; पण ते परस्पर भांडून फुटल्यावर एकेका सरदाराचें त्याच्यापुढें केव्हांहि चालण्यासारखें नव्हतें. हें युद्ध असेंच पुढें कांहीं दिवस चाललें. परंतु जॉर्ज टॉमस याची स्थिति उत्तरोत्तर जास्तच अडचणीची होऊं लागली. मराठ्यांबरोबर लढाईचा प्रसंग आल्यास आपणास पुढें कोणाचीहि मदत होणार नाहीं, ह्मणून शीख लोकांस आपले स्नेही करून ठेविलें तर बरें, असें त्याला वाटूं लागलें. अर्थात् त्यानें तह करून युद्ध संपविलें. या एकंदर प्रकरणांत कीर्ति झाली ह्मटली ह्मणजे एकट्या राणीचीच ! तिनें आपल्या हाताखालचें सैन्य अखेरपर्यंत फार व्यवस्थेनें आणि आपल्या अगदीं हुकमतींत ठेविलें होतें. इतर सरदारलोक जर तिच्या इतक्या जोमानें आणि निश्चयानें वागले असते, तर जॉर्ज टॉमसचा केव्हांच पुरा निकाल लागला असता.

तथापि तह झाला हाहि राणी कुंवरसाहेब हिच्याच दराऱ्याचा परिणाम होय. लढाई संपल्यावर राणी आपल्या संस्थानांत परत आली. बाहेरील सर्व भीति याप्रमाणें नाहींशी झाल्यावर राणीला विश्रांति घेणें जरूर पडलें. पण इतक्यांत अंतःकलह सुरू झाले. कुंवरसाहेबांचें वाढलेलें वजन आणि सत्ता हीं पाहून संस्थानांतील प्रमुख लोकांना तिच्याविषयीं मत्सर वाटूं लागला. राजाच्या प्रीतींतल्या लोकांनीं कुंवरसाहेबांसंबंधानें नाना तऱ्हांनीं त्याचे कान भरले. राजाला स्वतः विचार करण्याची शक्ति नसल्यामुळें त्याचेंहि मन फिरलें. बहिणीवरची त्याची ममता कमी होऊं लागली. राजानें आपल्या संस्थानची जी व्यवस्था लावावयाची ती त्याच्या बहिणीनें लाविली होती; अनेक वेळ संस्थानचा बचाव केला होता; परंतु आतां राजाला ह्यांपैकीं कोणत्याहि गोष्टीची स्मृति राहिली नाहीं ! ही जी सर्व महत्त्वाची कामगिरी तिनें बजावली होती, तिचा मोबदला अथवा बक्षिस तिला काय मिळालें ? राजाकडून होत असलेला तिरस्कार आणि त्याचे कटु शब्द हेंच ! तिच्यावर सर्व प्रकारच्या काल्पनिक अपराधांचा आरोप ठेवण्यांत आला. इतकेंच नव्हे, तर ज्याच्या हितासाठीं तिनें इतके जिवापाड श्रम घेतले तोच तिचा सख्खा भाऊ राजा. साहेबासिंग हा कुंवरसाहेबांच्या मनांतून आपल्या जिवाला अपाय करण्याचें आहे असें समजून-उमजून खोटें सांगूं लागला.

आपण केलेल्या कामगिरीपेक्षां आवडत्या लोकांच्या मसलतीच राजाला जास्त आवडतात, असें जेव्हां राणी कुंवरसाहेब हिला दिसून आलें, तेव्हां तिला पराकाष्ठेचा त्रास आला. तिनें शहर सोडलें आणि आपल्या जहागिरीच्या प्रांतांत थिरियन येथें तिनें एक नवीन किल्ला बांधला होता तेथें ती जाऊन राहिली. या तिच्या जाण्यानें तर राजाला

खत झाली तेव्हां उभयतांस आनंद झाल्यासारखें दिसलें. थोडा वेळ परस्परांचें बोलणें झाल्यावर कुतुबशहानें आपला दरबारी हत्ती आणवण्याचा हुकूम केला व तो पुढें आणून उभा करतांच त्याच्यावर तो चढून बसूं लागला. याप्रमाणें कुतुबशहा हत्तीवर बसत असतांना शेर अफगन अदबीनें बाजूस उभा राहिला. इतक्यांत एका शिपायानें त्यांच्या घोड्यावर वार केला. तें पाहतांच त्याचे डोळे उघडून पुढें होणारा प्रकार त्याच्या लक्ष्यांत आला. लगेच कुतुबाच्या बरोबरच्या शिपायांनीं तरवारी उपसल्या. शेर अफगन याला आतां कांहीं तरी तडकाफडकी तजवीज करून आपला जीव वांचविला पाहिजे असें दिसून येतांच त्यानें घोड्यास टांच मारली. हत्तीपाशीं क्षणार्धांत येऊन त्यानें त्याच्या वरची अंबारी तरवारीचा वार करून तोडली आणि आंत बसलेल्या कुतुबाचे दोन तुकडे केले. याप्रमाणें बादशहाचें प्रिय करण्यासाठीं कुतुब यानें जी मसलत केली होती ती अंमलांत आणीत असतां तो बिचारा प्राणास मुकला आणि विश्वासघात करणारास योग्य तें प्रायश्चित्त त्याला मिळालें !

कुतुबशहाचा निकाल लावल्यावर सभोंवतीं जमलेल्या शिपायांकडे शेर अफगन पाहूं लागला. थोडा वेळ झटापट झाल्यावर कुतुबबरोबर असलेल्या सरदारांपैकीं चौघे जण मरून भूमीवर पडले. बाकीचे सरदार आणि शिपाई भयचकित होऊन दूर पळाले आणि त्याला वेढा देऊन उभे राहिले. चोहोंकडून त्यांनीं त्याच्यावर बाणांचा आणि बंदुकींचा मारा सुरू केला. एक गोळी लागून शेर अफगनचा घोडा मरून पडला. आतां इलाज राहिला नाहीं, असें पाहतांच त्या शूर आणि उमद्या सरदारास फार वाईट वाटलें. त्यानें या असंख्य शिपायांच्या नामर्दपणाबद्दल त्यांची पुष्कळ निर्भर्त्सना केली. "तुह्मी एकेक माझ्या समोर या आणि मर्दास उचित अशा मार्गानें क्षात्रधर्म आचरण

थोडनच्या किल्ल्यांत हें अपमानाचें दुःख भोगीत राणीनें कांहीं दिवस काढले; परंतु अखेरीस ती तेथूनहि निसटली. आपल्या एका दासीचा पोषाख अंगावर घालून तिनें पहारेकऱ्यांस फसविलें व तेथून आपली सुटका करून घेतली. मोकळीक झाल्यावर ती थिरियन येथें गेली आणि आपल्याला अनुकूल असे पुष्कळ लोक तेथें होते त्यांस एकत्र करून तेथील किल्ल्याची तिनें चांगली मजबुती केली व राजा तेथें पुनः आल्यास त्याला चांगलाच प्रतिकार करण्याच्या तयारीनें ती तेथें राहिली.

आपल्या मसलतगारांच्या सांगण्यावरून राजानें याउपर तिच्या वाटेस न जाण्याचा निश्चय केला. राणी कुंवरसाहेब थिरियन येथें बरींच वर्षें राहिली. यानंतर राज्याच्या उलाढालींत ती पडली नाहीं. आपल्या इस्टेटीची व्यवस्था लावीत ती स्वस्थपणानें राहिली होती. लुटालुटीच्या मोहिमेंतून मोकळेपणा मिळे, तेव्हां जयमल्लसिंग आपल्या पत्नीस भेटावयास जात असे; परंतु नवराबायको विशेष अशीं एकत्र राहत नसत. त्यांचा आयुष्यक्रम जरीं निरनिराळ्या तऱ्हेचा होता, तरी त्यांची एकमेकांविषयीं आदरबुद्धि फार असे; आणि अखेरपर्यंत त्यांची एकमेकांवर फार चांगली निष्ठा राहिली होती. इ. स. १७९९ या वर्षीं राणी कुंवरसाहेब मृत्यु पावली. भावाकडून झालेल्या अन्यायानें तिला विशेष दुःख होऊन तिचा शेवट लौकर झाला, असें त्या वेळचा इतिहासकार ह्मणतो. तिच्या मृत्यूमुळें सर्व पक्षांच्या लोकांस अत्यंत दुःख झालें. तिचें शहाणपण, तिचें शौर्य आणि तिचें सौंदर्य या गुणांनीं लोकांचें अंतःकरण तिच्याकडे वेधून गेलें होतें. संस्थानावर जिनें इतके उपकार केले ती ज्या दिवशीं पतियाळा शहर सोडून गेली तो दिवस दुर्भाग्याचा, असेंच लोकांनां वाटलें.

कुंवरसाहेबांच्या मृत्यूनंतर राजा साहेबसिंग कांहीं वर्षे जगला; परंतु पश्चात्तापानें त्याचे हे दिवस चांगले गेले नाहींत. बहीण मृत्यु पावल्यावर त्याला तिचे उपकार आठवूं लागले. जिनें आपलें खरें हित केलें व मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगांतून आपलें राज्य वांचविलें, तिच्याशीं आपण कृतघ्नपणानें वागलों, असें त्याला मरेपर्यंत वाटत होतें.

## नूरजहान.

सर्व जगाच्या इतिहासांत आपलें अनुपम सौंदर्य आणि आश्चर्यपूर्ण चरित्र यांच्या योगानें चिरस्मरणीय होऊन बसलेल्या नूरजहानसारख्या सुप्रसिद्ध स्त्रिया फार थोड्या सांपडतील. सेमिरामिस हिनें आसिरियावर, अथवा क्लिओपाट्रा हिनें इजिप्तवर जशी अनियंत्रित सत्ता गाजविली, तशी सत्ता नूरजहान हिनें बादशहा जहांगीर आणि त्याचें प्रचंड राज्य यांच्यावर एकसारखी वीस वर्षें गाजविली. प्रत्यक्ष घडून आलेल्या गोष्टी केव्हांकेव्हां कादंबरीलाहि मागें सारतात, या गोष्टीची सत्यता नूरजहान हिच्या चरित्रांत जशी पहावयास मिळेल, तशी इतर पराक्रमी स्त्रिया अगर पुरुष यांच्या चरित्रांत क्वचित्च आढळून येईल.

जगाच्या प्रारंभापासून मानवजातीच्या इतिहासाचा कोणताहि काळ घ्या, त्यांत स्त्रीवर्चस्वाचा इतिहासावर परिणाम झालेला पहाण्यांत येत नाहीं, असें कधींहि होणार नाहीं. कधीं स्त्रियांवर जुलूम करणाऱ्याच्या दुष्ट बुद्धीनें पुरुष प्रवृत्त झालेले आपण पाहतों, तर कधीं ते त्यांचे दास बनलेलेहि आपल्या पहाण्यांत येतात. कधीं पुरुषांच्या

उदात्त चरित्रास स्त्रियांकडून प्रेरणा मिळाली असली, तर कधीं त्यांच्याच वर्चस्वाचा परिणाम पुरुषांच्या वर्तनावर होऊन ते अधोगतीस गेलेले आहेत. जगाच्या घडामोडीस ज्यांचीं चरित्रें कारणीभूत झालेलीं आहेत, व ज्यांची स्मृति इतिहासानें जतन करून ठेवली आहे अशा नरश्रेष्ठांच्या कृतींचा विचार केला, तर त्यांच्या वर्तनावर स्त्रीसहवासाचाच परिणाम मुख्यत्वेंकरून कायमचा असा झालेला दिसून येतो. युगींयुगीं परिवर्तन पावणाऱ्या मनुष्यजातीच्या घडामोडींत या परिणामाचें कारण अनेक वेळां अदृश्य असें जरी असलें, तरी धूमकेतूच्या सप्रकाश पुच्छाप्रमाणें कधींकधीं तें अतर्क्य अशा कृतीच्या रूपानें भासमान होतें. पुरुष आणि स्त्रिया या दोन जातींच्या इतिहासांत दोघांचें वर्चस्व एकमेकांवर एकंदरीनें समतोल झालेलें आहे, असेंच दिसून येतें. मग पुरुषांच्या एकतर्फी वर्तनानें स्त्रीजातीस कांहीं वेळ जरी हीन स्थितींत रहावें लागलें, तरी दुसऱ्या वेळीं कांहीं स्त्रियांनीं आपले गुण आणि पराक्रम यांच्या योगानें आपलें व आपल्या वर्गाचें वजन तितकेंच किंबहुना त्याहूनहि जास्त वाढविलें आहे. प्रस्तुत लेखाचा विषय जी आपल्या सौंदर्यानें साऱ्या जगाच्या डोळ्यांस सूर्यप्रकाशाप्रमाणें आनंदविणारी नूरजहान, तिचा जीवनवृत्तांत पाहिला ह्मणजे आह्मी ह्मणतों त्याची साक्ष पटेल.

या सौन्दर्यशालिनी स्त्रीचा लहानपणचा, तसाच मोठेपणचा इतिहास पाहिला तर तो सर्वत्र आश्चर्यमय असाच दिसून येतो. नूरजहानचा बाप ख्वाजा आयास हा मूळचा पश्चिम तार्तरीचा रहिवासी असून आपलें नशीब काढण्यासाठीं आपली जन्मभूमि सोडून हिंदुस्तानांत आला होता. याचा जन्म मोठ्या खानदानीच्या कुळांत झाला होता, तथापि दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडल्यामुळें याचें घराणें अगदीं

कंगाल स्थितीस आलें होतें बापाजवळ ख्वाजा आयास याला देण्यास पैसा नव्हता, तथापि त्याच्याकडून त्याला ज्याची प्राप्ति झाली होती, त्याची योग्यता पैशाहून कितीतरी पटीनें जास्त होती. ती देणगी ह्मटली ह्मणजे उदार शिक्षण होय. या शिक्षणामुळें ख्वाजा आयासच्या बुद्धीस आणि अंतःकरणास चांगला संस्कार झाला होता. अगदीं तरुण वयांत असतांना आपल्यासारख्याच मोडकळीस आलेल्या एका घराण्यांतील सुस्वरूप तरुणीवर ख्वाजा आयासचें प्रेम जडलें. लवकरच विवाहविधि होऊन त्या उभयतांमध्यें नवराबायकोचें नातें जमून आलें. उत्तरेकडील भागांत ज्या तार्तार लोकांस दारिद्र्याची पीडा असह्य वाटे, ते त्या वेळीं हिंदुस्तानचा रस्ता धरीत. घरदाराची व्यवस्था नसतांना गृहस्थाश्रमाचा आरंभ करणाऱ्या ख्वाजा आयास यालाहि तोच मार्ग धरावा लागला.

प्रवासाचा निश्चय होतांच ख्वाजा आयास यानें आपल्याजवळ होतें नव्हतें तें सर्व विकून एक घोडा आणि थोडेसे पैसे इतक्या सामुग्रीनिशीं तो आपल्या तरुण पत्नीसहवर्तमान हिंदुस्तानाकडे येण्यास निघाला. आधींच नाजूक व त्यांतहि कांहीं महिने गेले असल्यामुळें अशक्त झालेल्या आपल्या बायकोस घोड्यावर बसवून ख्वाजा आयास आपण पायीं चालूं लागला.

कांहीं काळपर्यंत सर्व कांहीं यथास्थित चाललें; परंतु त्यांनां वाटलें होतें त्याच्यापेक्षां प्रवास फार दूरचा होता व त्यांच्याजवळ असलेल्या अल्प पुंजीनें तो पार पडण्यासारखा नव्हता. त्यांच्यापाशीं असलेला सर्व पैसा खर्च होऊन गेल्यावर त्यांनां मोठीच पंचाईत पडली. कांहीं दिवस भिक्षा मागून मार्गक्रमण करणें त्यांनां भाग पडलें. पुढें हिंदुस्तान आणि तार्तरी यांच्यामध्यें असलेल्या निर्जन प्रदेशाच्या सीमेवर जेव्हां तीं उभयतां येऊन ठेपलीं, तेव्हां त्यांच्या हालांस जी सुरवात

झाली, तिचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे. कोठेंच घर नाहीं; थंडी तर कडाक्याची आणि अडचणींत हांक मारावी तर कोणी मनुष्य आसपास ती ऐकून मदतीस धांवेल असा मुळींच संभव नव्हता. परत फिरावें तर अंतर पुष्कळ असल्यामुळें हाल अतोनात होणार. पुढें जावें तर त्या निर्जन प्रदेशांत मरून पडण्याशिवाय दुसरी गतिच नव्हती !

तथापि छाती करून तीं उभयतां त्या निर्जन वनांत शिरलीं. त्यांचे होत असलेले हाल पुरे नव्हते असेंच जणू काय त्यांच्या दुर्दैवास वाटून त्यानें त्यांच्यावर अगदीं कडेलोटाचा प्रसंग आणला. ख्वाजा आयासच्या बायकोस प्रसववेदना होऊं लागल्या. प्राण जातो कीं रहातो अशा स्थितींत ती प्रसूत होऊन जिचें पुढचें आयुष्य स्वर्गतुल्य वैभवांत गेलें अशा त्या नूरजहानचा जन्म अशा विपदास्थेंत झाला. कोणी प्रवासी वाटेनें जात असलेला भेटेल व आपणास कांहीं मदत होईल अशा आशेनें तीं उभयतां त्या लहान अर्भकास जवळ घेऊन कांहीं तास वाट पहात राहिलीं; परंतु अमावास्येच्या काळ्याकुट्ट अंधारांत चंद्रप्रकाशाची वाट पहाणाराप्रमाणेंच त्यांची अवस्था झाली. होतांहोतां रात्रीनें आपला अमल बसविला. आधींच रान आणि त्यांत काळोखी रात्र ! चोहींकडून हिंस्र श्वापदांच्या गर्जना त्यांच्या कानीं येऊं लागल्या आणि भीतीनें त्यांची अगदीं गाळण उडाली. अशा स्थितींत त्या ठिकाणीं रात्र काढणें फार धोक्याचें वाटून ख्वाजा आयासनें आपल्या बायकोस घोड्यावर बसविलें. आईनें मुलीला उचलून घेतलें, पण तिला नुसतें बसून राहण्याचीसुद्धां शक्ति नसल्यामुळें तिला मुलीस उचलून धरवेना. आयास तर इतका थकून गेला होता, कीं, त्याला उभें राहण्याचीसुद्धां पंचाईत

पडली. एकीकडे मुलीविषयीं मन कळवळे तर दुसरीकडे सर्वांचा निभाव लागण्याची मुष्कील ! अशा विचारांत तीं उभयतां बराच वेळ घुटमळत राहिलीं. अखेरीस त्या बालकास तेथेंच रस्त्यावर ठेवण्याचा बेत झाला. गुंडाळण्यास कपडा नसल्यामुळें लतापल्लवांनीं त्या मुलीस त्यांनीं आच्छादिलें व तिचें रक्षण करण्याविषयीं परमेश्वराची शोकाकुल अंतःकरणानें प्रार्थना करून अत्यंत दुःखानें डोळयांतून अश्रुधारा सोडीत तीं उभयतां पुढील मार्ग क्रमूं लागलीं. केवळ निरुपायानें तशा स्थितींत जरी एका झाडाखालीं आईबापांनीं त्या मुलीस ठेविलें होतें, तरी तिचा भाग्योदय जवळ येत असल्याकारणानें तिचें रक्षण झालें. ज्या झाडाखालीं तिला ठेविलें होतें, तें झाड दिसेनासें होतांच नूरजहानच्या आईच्या अंतःकरणानें ठाव सोडला. ती घोड्यावरून खालीं पडली व तिनें दुःखानें हंबरडा फोडला. आपल्या सकुमार बालकाकाडे धांव घेण्यासाठीं ती वर उठण्याचा प्रयत्न करूं लागली, परंतु तेवढ्या प्रयत्नांतच तिची उरलेली सर्व शक्ति नष्ट होऊन ती भूमीवर निश्चेष्ट पडली. ती जसजशी शुद्धीवर येऊं लागली तसतसें ख्वाजा आयास तिचें समाधान करूं लागला. शेवटीं कांहीं इलाज चालत नाहीं असें पाहून त्यानें परत जाऊन मुलीस आणण्याचें कबूल केलें. ज्या ठिकाणीं मुलीला ठेविली होती त्या ठिकाणीं तो येऊन पहातो तर तेथें जो प्रकार त्याच्या दृष्टीस पडला तो पाहतांच भीतीनें तो बहुतेक भ्रमिष्ठच झाला. एक मोठा भयंकर कृष्णसर्प त्या मुलीसभोंवती वेटाळें घालून बसला होता. त्याला पाहतांच आयास यानें मोठी आरोळी मारली आणि मुलीचा बचाव करण्यासाठीं तो पुढें धांवला. त्याच्या आरोळीनें सर्प भिऊन जवळच्या बिळांत निघून जातांच त्यानें मुलीस कवटाळून वर उचलून घेतलें व तसाच पळत

आपली बायको ज्या ठिकाणीं शोकनिद्रेंत निश्चेष्ट होऊन पडली होती तेथें तो आला. बायको शुद्धीवर आली तेव्हां तिनें आपल्या मुलीस जवळ घेतलें व तीं उभयतां झालेल्या प्रकाराविषयीं बोलत राहिलीं. ज्यापेक्षां अशा अतर्क्य रीतीनें आपल्या मुलीचा बचाव झाला, त्यापेक्षां तिचा कांहींतरी विलक्षण भाग्योदय खास होणार, असेंच त्यांनां वाटलें, आणि विधात्यानें तिच्यासाठीं कांहीं तरी उच्चपद नेमून ठेविलें नसतें तर तिचा या प्राणसंकटांतून असा बचाव झाला नसता. परंतु तिला जें महत्पद पुढें प्राप्त झालें, त्याची कल्पना त्या उभयतांस त्या वेळीं झाली नाहीं, यांत आश्चर्य कशाचें ? तें कोणाच्याहि कल्पनेच्या बाहेर होतें! ज्या हिंदुस्तानांत कोणाचाहि आश्रय नसतां आपण पोटाच्या सोयीसाठीं जात आहों, तेथील बादशाही सिंहासनावर आपली मुलगी आरूढ होणार व आपल्या सौंदर्यानें आणि कर्तृत्वशक्तीनें साऱ्या जगास चकित करणार, ही गोष्ट त्यांच्या स्वप्नसृष्टींतहि कधीं दृग्गोचर झाली नसती !

ज्या वेळीं तो कृष्ण सर्प मुलीला सोडून बिळांत नाहींसा झाला तीच वेळ यांच्या भाग्यदिवसाची प्रभात झाली, असें ह्मटलें असतां चालेल. सूर्यप्रकाशापुढें जसा अंधार पळून जाऊन गिरिगव्हरांत लपतो, तसें, त्यांच्या भाग्यसूर्यापुढें त्यांचें कृष्णसर्परूपी दुर्दैव नाहींसें झालें. वेळ फिरला ह्मणजे अनपेक्षित मार्गानें दैवयोग जुळून येतो. त्या ठिकाणीं मुलीला घेऊन तीं उभयतां बसलीं असतां कांहीं मुसलमान प्रवासी त्यांनां भेटले. त्यांच्याजवळ लवाजमा बराच होता. त्यांनीं या संकटांत मदत करून त्यांनां आपणाबरोबर लाहोरास नेलें. त्या वेळीं अकबर बादशहाची स्वारी तेथेंच होती. बादशहाजवळच्या अमामीदारांत एक गृहस्थ आपल्या दूरच्या नात्याचा आहे

असें आयास यास समजलें तेव्हां त्याला आनंद झाला. या इसमाची सत्ता मोठी असून त्याचें बादशहाजवळ चांगलें वजन होतें. या संबंधी गृहस्थाच्या मदतीनें त्याचा ऊर्जितकाळ येण्यास सुरुवात झाली. आयास यास उत्तरोत्तर मोठी बढती मिळून त्याला दरबारांत पहिल्या प्रतीची मानमान्यता प्राप्त झाली. आपल्या योग्यतेनें आणि मेहनतीनें तो एक हजार स्वारांचा अमलदार झाला. तो जसा भाग्यशाली तसाच बुद्धिवान् असल्यामुळें एका पदावरून दुसऱ्या पदावर बढती मिळत जाऊन थोडक्या काळांत बादशहातीच्या खजीनदारीची अत्यंत महत्त्वाची थोर जागा त्याला मिळाली. याप्रमाणें थोड्या वर्षांपूर्वी एका निर्जन वनांत बायको व मुलगी यांसह जो मरणोन्मुख होऊन पडला होता, तो आपल्या भाग्याच्या आणि गुणांच्या जोरावर सर्व राज्यांत अगदीं पहिल्या प्रतीचा सरदार आणि मुत्सद्दी बनला. लाहोर येथें येऊन कांहीं दिवस लोटल्यावर ज्या मुलीवर रानांत इतके भयंकर प्रसंग आले होते तिच्या स्वरूपमाधुर्याची चोहोंकडे ख्याति होऊन तिला 'मेहर उन्निसा' ह्मणजे स्त्रीतारांगणांतला चंद्र असें नांव मिळालें. ती पंधरा वर्षांची झाली तेव्हां तर पूर्णमासी चंद्राच्या संपूर्ण आणि निष्कलंक तेजानें सर्वांच्या नेत्रांवर आपल्या सौंदर्याचा अमृतवर्षाव करूं लागली. साऱ्या खंडांत तिच्यासारखी सुरूपसंपन्न स्त्री त्या वेळीं हिंदुस्तानांत किंवा दुसऱ्या कोणत्याहि देशांत नव्हती. तिचें मनहि चांगल्या काळजीपूर्वक दिलेल्या शिक्षणानें सुसंस्कृत झालेलें होतें. चित्रकला, काव्यकला, गायन आणि नृत्यकला इत्यादि सर्व ललितकलांत तिची बरोबरी करील अशी त्या वेळीं दुसरी स्त्रीच नव्हती. आईची रूपसंपत्ति आणि बापाचें बुद्धिवैभव तिच्यामध्यें एकवटून तिच्या अंतर्बाह्य तेजाचे किरण असे फांकत, कीं, कोळशाच्या राशींत हिरा लोपून जाणें जसें

अशक्य, अथवा शेवाळांतूनहि कमलाच्या शोभेकडे जशी दृष्टि जावी, तसें हें स्त्रीरत्न जरी दारिद्र्यपंकानें परिवेष्टित असतें, तरी त्याच्याकडे जगाचे डोळे लागल्याशिवाय राहते ना. मग ख्वाजा आयाससारख्या संपत्ति, बुद्धि आणि कीर्ति या तीन सिद्धींनीं थोर पदास पोहोंचलेल्या उमरावाच्या अपत्यपदवीवर असलेल्या या तरुणीचा महिमा काय वर्णावा ? तिच्या अनेक गुणगुरुत्वाच्या आकर्षणांत मोठमोठे खानदानीचे उमराव आणि नामांकित योद्धे सांपडून तिला आपल्या पत्नीपदावर स्थापन करून तिच्या चरणीं आपलें सर्वस्व अर्पण करण्यास सिद्ध झाले. परंतु ज्याचें शौर्य आणि हृदयसौन्दर्य अप्रतिम होतें अशा एका सरदारावर आयासचें मन बसलें होतें व तो त्याला पसंत वाटला होता. हा भाग्यशाली तरुण शेर अफगान नांवाचा एक पर्शियन सरदार होता. बंगाल्यांत याला मोठी जहागीर होती व अकबराच्या दरबारांत याच्यासारखा गुणसंपन्न आणि बलाढ्य दुसरा सरदार नव्हता.

परंतु बापाची ही इच्छा आणि योजना यांच्यासंबंधानें मेहर उन्निसा हिला कांहींएक ठाऊक नव्हतें. तिची स्वतःची इच्छा निराळीच होती. शहाजादा सेलिम याचें प्रेम संपादन करावें, असें तिच्या महत्त्वाकांक्षी मनाला वाटत असे. एकदा त्याची व आपली भेट झाली तर आपल्या सौन्दर्यास तो सहज मोहून जाईल, असा तिचा समज असल्यामुळें ती तशा समयाची वाट पाहत होती, आणि तशी संधिहि लवकरच आली. शहाजादा एकदा तिच्या बापाला भेटण्यासाठीं तिच्या घरीं आला व बराच वेळ राहिला. दरबारखाना होऊन गेल्यानंतर मुख्यमुख्य पाहुण्यांशिवाय बाकीची सर्व मंडळी निघून गेली. मद्याचे पेले भरून दिवाणखान्यांत आणल्यानंतर जनानखान्यांतील प्रमुख स्त्रिया बुरख्यानिशीं मुलाखतीस बाहेर आल्या. हीच संधि त्या लोकोत्तर

तेथून पलीकडे जाणें भाग पडलें. ही उताराची जागा फार बिकट होती. जागोजाग खळगे असल्यामुळें त्या ठिकाणीं पाणी खोल होतें. पुष्कळांस पोहून जाणें भाग पडलें व त्यांच्याजवळची दारू भिजून गेली. भिजलेल्या कपड्यांचें आणि चिलखताचें ओझें जास्त झाल्यामुळें त्यांनां भराभर नदी ओलांडतां येईना. शत्रूच्या लोकांशीं हातघाई करीतकरीत त्यांनां पैलतीर गांठावें लागलें. आपला भाऊ आणि मुख्यमुख्य सरदारांचे तरणेबांड आणि हिंमतवान मुलगे बरोबर घेऊन नूरजहान अगदीं पहिल्यानें नदींत शिरली. मोहब्रतखान आणि त्याचे रजपूत यांनीं मोठ्या जोरानें राणीच्या मंडळीवर हल्ला केला. तोफेचे गोळे आणि बाण यांचा नुसता वर्षाव नूरजहानच्या हौद्यासभोंवार चालला होता, तथापि ती शूर स्त्री बिलकूल डगमगली नाहीं! आपल्या लोकांस ती एकसारखें उत्तेजन देत होती. तिनें आपल्या भात्यांतले बाण शत्रूच्या लोकांवर अचूक टाकून पुष्कळांनां ठार केलें. अखेरीस तिच्या हत्तीवरचा महात मरून खालीं पडला. तिच्या मांडीवर तिच्या मुलीची मुलगी होती तिला एक बाण लागून जखम झाली. तिच्या हत्तीच्या सोंडेवर एक जोराचा वार लागला व त्या कळेसरसा तो मागें फिरून आवरेनासा झाला.

इतकें झालें तेव्हां अर्थात्च युद्धाचा निकाल लागला. नूरजहानच्या लोकांचें धैर्य सुटून ते जीव घेऊन पळाले. पराभूत झालेल्या राणीस पकडण्यासाठीं मोहबतखानानें जिवापाड मेहनत केली, परंतु मोठ्या हुषारीनें आणि चलाखीनें ती तेथून निसटून लाहोरास गेली, व मोहबतखानाचे सारे प्रयत्न फुकट गेले. त्यानें बादशहाकडून बळजबरीनें पत्रें लिहून नूरजहान हिला कळवलें, कीं, सर्व गोष्टींचा निकाल सलोख्यानें झाला आहे, सबब आपणास बादशहाच्या स्वारींत येण्यास

त्यानें वेळ न लावतां शेर अफगनच्यासंबंधानें झालेला वाङ्‌निश्चय प्रसिद्ध केला. मेहरउन्निसा हिला तें ऐकतांच फार राग आला. तिनें पुष्कळ दुःख केलें आणि बेत फिरविण्याविषयीं आपल्या बापाची पुष्कळ विनवणी केली; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. इकडे सेलिम यानें आपल्या तर्फे बादशहानें रदबदली करावी ह्मणून अकबराची पुष्कळ विनवणी करून पाहिली. परंतु कांहीं उपयोग न होतां अशा प्रकारचा अन्याय शहाजाद्यासाठींसुद्धां आपण करणार नाहीं, असें बादशहानें त्याला निक्षून सांगितलें. सेलिम याला नंतर लज्जेनें उगी रहावें लागलें. मेहरउन्निसेनेंहि आतां आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून बापानें ठरविल्याप्रमाणें शेर अफगन याच्याशीं आपलें लग्न करून घेतलें. तिची महत्त्वाकांक्षा बाजूस ठेवली तर बापानें योजिलेला वर तिला आवडत नव्हता, असें मुळींच नव्हतें.

सेलिम याच्या ह्मणण्याप्रमाणें झालेला वाग्निश्चय मोडण्यास शेर अफगन कबूल झाला नाहीं, ह्मणून बढतीसंबंधानें त्याला बरेंच नुकसान सोसावें लागलें. बादशहाच्या दराऱ्यामुळें शहाजाद्यास त्याच्यावर उघड हात टाकतां येण्यासारखें नव्हतें. तथापि दरबारचें मत त्याच्याविषयीं कलुषित करण्यास त्यानें कमी केलें नाहीं. अखेरीस शेर अफगन दरबारास कंटाळून बंगाल येथें आपल्या जहागिरीवर गेला व तेथील सुभेदारापासून बरद्वानचा राज्यकारभार त्यानें आपल्याजवळ घेतला. अकबराच्या मृत्यूपर्यंत तो तेथेंच राहिला. त्याचा संसार त्या ठिकाणीं चांगल्या सुखानें चालला होता. आपल्या शूर आणि गुणसंपन्न पतीविषयीं मेहरउन्निसा हिला फार अभिमान वाटत असे.

कांहीं लोकांचा असा समज आहे, कीं, बंगालमध्यें असतांना शहाजाद्याशीं तिचा पत्रव्यवहार चालू होता व सेलिम याचें तिच्या

नवऱ्यासंबंधानें जें वर्तन झालें, त्याला तिची पूर्ण संमति होती. परंतु या आरोपांस इतिहासाचा आधार मिळत नाहीं. विश्वसनीय माहिती-वरून निराळाच प्रकार दिसून येतो. सेलिम याचा विसर तिला पडला नव्हता, ही गोष्ट खरी. तथापि आपल्या नवऱ्याशीं तिचें वर्तन सचोटीचें होतें. लग्नानंतर थोड्या वर्षांनीं तिला एक मुलगी झाली.

इसवी सन १६०५ या वर्षी अकबर बादशहा मृत्यु पावला जहांगीर ह्मणजे जगज्जेता या भपकेदार नांवानें सेलिम बादशाही सिंहासनावर आरूढ झाला व सूर्य क्षितिजावर येण्याच्या मंगल समयीं त्यानें राजमुकुट आपल्या शिरोभागीं ठेविला. राज्याभिषेक झाल्यावर चाळीस दिवसपर्यंत एकसारखा उत्सव चालू होता. हा उत्सव इतक्या थाटानें करण्यांत आला, कीं, तसा उत्सव या खंडाच्या इतिहासांत अपूर्व होता. असें ह्मटलें असतां चालेल. हा उत्सव आटोपल्यावर बादशहाचें लक्ष्य मेहरउन्निसेकडे लागलें. अकबर जीवंत असतां त्याच्या भीतीनें त्यानें जो प्रेमाग्नि दाबून ठेविला होता, त्याला पेट घेण्यास आतां भरपूर अवसर सांपडला. हिंदुस्तानचा सर्व सत्ताधारी बादशाहा आपण असल्यामुळें मेहरउन्निसा ही दुसऱ्याची विवाहित पत्नी असली तरी तिला आपल्या स्वाधीन करून घेण्याचा आपणास भरपूर अधिकार आहे, असें त्याला वाटलें. स्त्रीसह दिल्लीस येऊन दरबारास हजर रहावें असा हुकूम शेर अफगन यास बादशहानें पाठविला. हुकुमाप्रमाणें तो सरदार हजर झाल्यावर बादशहानें वरकांतीं त्याच्यावर प्रेम दाखवून त्याला नवीन मानमरातब मेहेर केले.

शेर अफगन हा स्वभावतः निष्कपटी आणि उदार असल्यामुळें बादशहाच्या मनांत आपल्याविषयीं कांहीं काळेंबेरें असेल ही शंकाहि

त्याला कधीं आली नाहीं. इतका काळ लोटला आहे, बादशहाचें मन इतर स्त्रियांवर गुंतून त्याला पूर्वीचा विसर पडला असेल, अशा समजुतीवर तो गेला होता. परंतु तो समज चुकला असें त्याला पुढें कळून आलें.

आपल्या प्रतिस्पर्ध्याचा नायनाट करून ज्या स्त्रीवर आपलें मन बसलें आहे तिला हस्तगत करण्याचा बादशहाचा निश्चय झाला होता. त्याचें मन तिला कधींच विसरलें नव्हतें व तिला आपलीशी करून घेण्याची आशा त्याच्या मनानें कधींहि सोडली नव्हती. आपला बेत साध्य करून घेण्यासाठीं त्यानें जो मार्ग योजिला होता, तो मात्र त्याच्या योग्यतेस हीनपणा आणण्यासारखा होता.

बादशहाचा पहिला बेत त्याला वाघाच्या पारधींत धोक्यांत घालून त्याचा नाश करण्याचा होता. निडरबरीच्या रानांत एक भयंकर वाघ उठल्याची बातमी आली: या वाघानें शेजारच्या खेड्यापाड्यांतून बरींच गुरें उचलून नेलीं होतीं. शिवाय कांहीं माणसांसहि त्यानें खाल्लें होतें. या वाघाची पारध करण्यास बादशहा स्वत: निघाला. त्याच्याबरोबर त्याचे मुख्यमुख्य सरदार आणि शेर अफगन हे गेले होते. त्या वेळच्या शिकारी पद्धतीप्रमाणें कैक मैलपर्यंत सभोंवार वेढा देऊन चारी बाजूंनीं रानांत शिकारी मंडळी शिरली. अखेरीस वाघानें आपलें स्थान सोडलें व गुरकावत तो पुढें येऊं लागला. वाघाचें गुरकावणें स्पष्ट ऐकूं येतांच बादशहाची मंडळी थांबली. सर्व सरदार जमा झाल्यावर “तुमच्यापैकीं एकटा वाघाच्या अंगावर जाऊन त्याच्यावर हल्ला करण्यास कोण समर्थ आहे?” असा बादशहानें सर्वांस प्रश्न केला. हा प्रश्न ऐकतांच लगेच तीन सरदार पुढें होऊन

बादशहाजवळ वाघाच्या अंगावर चालून जाण्याची परवानगी मागूं लागले. हें चाललें आहे इतक्यांत बादशहास वाटलें होतें त्याप्रमाणें शेर अफगनच्या अंगांत स्फुरण चढलें. आपली आजपर्यंत गाजलेली कीर्ति या वेळीं जाऊं देऊं नये असा विचार करून पुढें होऊन तो ह्मणाला " हत्यारांनिशीं जनावरावर हल्ला करणें यांत विशेष पुरुषार्थ नसून अन्याय आहे. ईश्वरानें वाघास जसे अवयव दिले आहेत तसे माणसासहि दिलेले आहेत. शिवाय, आपल्या शक्तीचा उपयोग करण्यास माणसाजवळ विचारशक्तिहि दिलेली आहे. "

बाकीच्या सरदारांनीं या म्हणण्यास आक्षेप घेतला. ते ह्मणाले " निसर्गतः वाघाच्या शक्तीपेक्षां माणसाची शक्ति फार कमी आहे. यासाठीं त्याचा पाडाव शस्त्रानेंच केला पाहिजे. "

" बरें आतां पहा, तुमची चूक तुह्मांला दाखवितों," असें ह्मणून शेर अफगन यानें ढालतरवार फेंकून दिली आणि रिकाम्या हातानें वाघावर चाल करण्यास तो सिद्ध झाला. असें करणें वेडेपणाचें आहे, असें सांगून एकदोन वेळ या घातुक कृत्यापासून त्याला परावृत्त करण्याचा बादशहानें प्रयत्न केला, तथापि चाललेल्या प्रकारापासून मनांतल्यामनांत त्याला आनंदच वाटला. सर्व सरदारांस शेर अफगनच्या या कृत्याचा अचंबा वाटला. त्याच्या धैर्याची तारीफ करावी किंवा त्याच्या मूर्खपणाचा निषेध करावा, हें त्यांना कांहींच समजेना. वाघाची आणि शेर अफगन याची झटापट सुरू झाली. फार वेळ अत्यंत भयंकर कुस्ती होऊन अखेरीस त्या हिंस्र जनावरानें प्राण सोडला. अर्थात् माणूस विजयी झाला. ठिकठिकाणीं जखमा होऊन त्यांतून रक्तस्राव बराच झाल्यामुळें सरदार शेर अफगन अगदीं थकून गेला होता.

बादशहानें त्याला त्याच्या राहत्या वाड्यांत पोहोंचविलें. कांहीं दिवसांनी मेहरउन्निसेच्या शुश्रूषेनें त्याच्या जखमा बऱ्या होऊन त्याची प्रकृति पूर्ववत् चांगली झाली. हजारों लोकांनीं हें अलौकिक धैर्याचें कृत्य पाहिलें असल्यामुळें शेर अफगनच्या शौर्याची कीर्ति जिकडेतिकडे पसरली ! बादशहाला मात्र आपला हेतु साध्य न झाल्यामुळें अत्यंत खिन्नता वाटली; परंतु त्याचा निश्चय कायम राहिला. निराशा आणि फजिती यांच्या योगानें त्याची इच्छा उलट दुप्पट वाढली.

हरप्रयत्न करून मेहरउन्निसेस हस्तगत करावी, या हेतूनें आणखी एक मसलतीचा पाया त्यानें घातला. प्रकृति दुरुस्त होतांच शेर अफगन बादशहाच्या मुलाखतीस गेला. बादशहानें त्याची वाहवा करून आपलें प्रेम व्यक्त केलें, शेर अफगन यालाहि बादशहाचें यांत कांहीं कपट असेल, असें वाटलें नाहीं जहांगीर बादशहानें त्याचा घात करण्याचा बेत पूर्वींच करून टेविला होता. एका भल्या मोठ्या मस्त हत्तीच्या महातास शेर अफगन यास अरुंद गल्लींत अडवून, लोकांस अपघातासारखें वाटे अशा रीतीनें त्याला चेंगरून टाकण्याचा त्यानें हुकूम केला होता.

तो शूर सरदार पालखींतून आपल्या वाड्यांत परत जात असतां एका अरुंद गल्लीच्या टोंकावर एक हत्ती असून बाहेर पडण्याचा मार्ग बंद झाला आहे, असें त्यानें पाहिलें. त्याबरोबर हत्ती एकीकडे करण्यासाठीं त्यानें आपल्या नोकरांस हुकूम फर्माविला; परंतु तो हुकूम मान्य न करतां भ्यालेल्या नोकरांनीं धन्यासकट पालखी तेथेंच टाकून पळ काढला. नोकर लोकांचें हें भ्याडपणाचें वर्तन पहातांच शेर अफगन चटकन् उभा राहिला आणि एक अति तीक्ष्ण तरवार त्यानें म्यानांतून बाहेर काढली. या तरवारीनें हत्तीच्या सोंडेवर अशा सफाईनें त्यानें एक जोराचा वार केला, कीं, तत्क्षणीं ती मुळांतून तुटून खालीं पडली. हत्ती वेदनेनें

यज्ञास हजर रहाण्याचें साफ नाकारलें व आपल्यापेक्षां कोणत्याहि बाबतींत जयचंद श्रेष्ठ नाहीं, असें त्यांनीं उघड जाहीर केलें.

पृथ्वीराज आणि समरसिंह यांचें हें उद्दामपणाचें वर्तन कनोजच्या दरबारीं समजलें, तेव्हां जयचंदास फार क्रोध आला. ताबडतोब सैन्यानिशीं दिल्लीवर स्वारी करून पृथ्वीराजास खेंचून समारंभास आणण्याचा आपला बेत त्यानें जाहीर केला. त्या दोघांची हजिरी समारंभाच्या वेळीं नसल्यास सर्व खटाटोप व्यर्थ जाईल, इतकें त्यांचें महत्त्व असल्यामुळें तर त्याला फार वाईट वाटलें. त्या वेळीं यज्ञच तहकूब करावा लागतो कीं काय, असा सुमार दिसूं लागला; परंतु यज्ञांत ब्राह्मणांची चंगळ उडणार असल्यामुळें त्यांनीं इतक्या थरास गोष्ट आणूं दिली नाहीं. त्यांनीं स्वारी करण्याचा सल्ला राजास दिला आणि युद्धाचा परिणाम प्रतिकूळ झाला तर सर्वच कार्यभाग ढांसळणार व आपल्यापुढें आलेल्या द्रव्याच्या राशी पदरांत पडणार नाहींत असें वाटून त्यांनीं एक खाशी युक्ति काढली. अशा वेळीं आपला कार्यभाग युक्तीनेंच करून घेतला पाहिजे, असें त्यांनीं राजाला सांगितलें. युद्ध सुरू केल्यास एकंदर राज्य ताब्यांत येण्यास विलंब लागेल व यज्ञाचा योग फारच लांबणीवर पडेल, यासाठीं हे दोन राजे समारंभास येत नसले तर त्यांच्यासाठीं यज्ञाची खोटी न करतां पृथ्वीराज आणि समरसिंह यांच्या सुवर्णप्रतिमा करून समारंभ साजरा करून घ्यावा, असा सल्ला त्यांनीं जयचंदास दिला. हा सोपा उपाय जयचंदासहि मान्य होऊन त्यानें तत्काळ त्या दोघांच्या सुवर्णप्रतिमा करण्याचा हुकूम केला. प्रतिमा तयार होतांच देवडीवरच्या पहारेकऱ्याच्या जागीं पृथ्वीराजाची प्रतिमा स्थापन करून त्याची राजेलोकांत नाचक्की करण्याचा त्यानें घाट घातला.

इतक्यांत त्यांपैकीं एकास पश्चात्ताप होऊन तो ओरडून साथीदारांस ह्मणाला " थांबा. आपणास बादशहाचा हुकूम झाला आहे, नव्हे का? मग आह्मांला मर्दासारखें वागलें पाहिजे. आधीं एकटा इसम, व त्यांतहि निद्रिस्त, अशावर आह्मी चाळीस असामी हल्ला करणार!"

त्याच्या ओरडण्यानें जागा झालेला शेर अफगन " शाबास शूरा! बरोबर बोललास, " असें ह्मणून बिछान्याखालची तरवार घेऊन एका कोंपऱ्यांत आपल्यावर येणाऱ्या हल्ल्याची वाट पाहत राहिला. थोडक्या वेळांत निम्मे अधिक मारेकरी त्यानें आपल्या तरवारीस बळी दिले व कांहीं जखमी केले. बाकीचे पळून गेले. ज्या ह्माताऱ्यानें ओरडून त्याला जागें केलें होतें तो मात्र राहिला. शेर अफगन यानें आपल्यावर उपकार करणाराच्या हातांत हात घालून मोठ्या प्रेमानें तो त्याच्याशीं बोलूं लागला. ह्या नीच आणि बेशरमपणाच्या कृत्याविषयींची सर्व माहिती त्याच्याकडून घेऊन त्यानें त्याला पुष्कळ बक्षिस दिलें व ती हकीगत लोकांस समजावी ह्मणून त्यास जाण्यास मोकळीक दिली. ह्या रात्रीच्या हल्ल्याची हकीगत लोकांत पसरतांच त्याच्या शौर्याची कीर्ति इतकी झाली, कीं, तो जेथें जाई तेथें लोकांची मनस्वी गर्दी होई व त्यामुळें त्याला बाहेर पडणेंच फार कठीण होई.

आतां शेर अफगान आपल्या पत्नीसह बंगालची राजधानी सोडून आपल्या जुन्या राहाण्याच्या ठिकाणीं बरद्वान प्रांतांत जाऊन राहिला. तेथें तरी एकीकडे राहिल्यानें आपण सुरक्षित राहूं, असें त्याला वाटलें; परंतु त्याची तीहि आशा व्यर्थ होती. थोड्याच दिवसांनीं बंगालचा सुभेदार स्नेही या नात्यानें त्याच्या भेटीस तिकडे गेला. प्रांताचा मुख्य अंमलदार आपल्या भेटीस येत आहे असें ऐकतांच शेर अफगन घोड्यावर स्वार झाला आणि बरोबर अवघे दोन नोकर घेऊन त्याला सन्मानपूर्वक शहराबाहेर सामोरें गेला. दोघांची मुला-

खत झाली तेव्हां उभयतांस आनंद झाल्यासारखें दिसलें. थोडा वेळ परस्परांचें बोलणें झाल्यावर कुतुबशहानें आपला दरबारी हत्ती आणवण्याचा हुकूम केला व तो पुढें आणून उभा करतांच त्याच्यावर तो चढून बसूं लागला. याप्रमाणें कुतुबशहा हत्तीवर बसत असतांना शेर अफगन अदबीनें बाजूस उभा राहिला. इतक्यांत एका शिपायानें त्यांच्या घोड्यावर वार केला. तें पाहतांच त्याचे डोळे उघडून पुढें होणारा प्रकार त्याच्या लक्ष्यांत आला. लगेच कुतुबाच्या बरोबरच्या शिपायांनीं तरवारी उपसल्या. शेर अफगन याला आतां कांहीं तरी तडकाफडकी तजवीज करून आपला जीव वांचविला पाहिजे असें दिसून येतांच त्यानें घोड्यास टांच मारली. हत्तीपाशीं क्षणार्धांत येऊन त्यानें त्याच्या वरची अंबारी तरवारीचा वार करून तोडली आणि आंत बसलेल्या कुतुबाचे दोन तुकडे केले. याप्रमाणें बादशहाचें प्रिय करण्यासाठीं कुतुब यानें जी मसलत केली होती ती अंमलांत आणीत असतां तो बिचारा प्राणास मुकला आणि विश्वासघात करणारास योग्य तें प्रायश्चित्त त्याला मिळालें !

कुतुबशहाचा निकाल लावल्यावर सभोंवतीं जमलेल्या शिपायांकडे शेर अफगन पाहूं लागला. थोडा वेळ झटापट झाल्यावर कुतुबबरोबर असलेल्या सरदारांपैकीं चौघे जण मरून भूमीवर पडले. बाकीचे सरदार आणि शिपाई भयचकित होऊन दूर पळाले आणि त्याला वेढा देऊन उभे राहिले. चोहोंकडून त्यांनीं त्याच्यावर बाणांचा आणि बंदुकींचा मारा सुरू केला. एक गोळी लागून शेर अफगनचा घोडा मरून पडला. आतां इलाज राहिला नाहीं, असें पाहतांच त्या शूर आणि उमद्या सरदारास फार वाईट वाटलें. त्यानें या असंख्य शिपायांच्या नामर्दपणाबद्दल त्यांची पुष्कळ निर्भर्त्सना केली. "तुह्मी एकेक माझ्या समोर या आणि मर्दास उचित अशा मार्गानें क्षात्रधर्म आचरण

करा," वगैरे अनेक गोष्टी त्यानें त्यांस सांगितल्या; परंतु त्या दुष्टांनीं त्याची विनंति मान्य केली नाहीं. आतां मरण हाच अखेर परिणाम, असें पक्कें जाणून त्यानें तरवार खालीं टाकून दिली आणि मक्केकडे तोंड करून थोडी माती हातांत घेतली आणि पाण्याच्या ऐवजीं तीच आपल्या डोक्यावर उडवून त्यानें परमेश्वराची प्रार्थना केली. नंतर तो शांतपणें उभा राहिला. तथापि त्याच्या शत्रूंस जवळ येण्याची छाती होईना. बंदुकीच्या सहा गोळ्या त्याच्या शरीरांत घुसल्या, तेव्हां त्यांनीं त्याचा प्राण बाहेर काढला. तो मरून जमिनीवर पडला तरी भीतीनें त्याच्यावर ते लोक गोळ्या टाकीतच होते! त्याच्या शत्रूंनीं त्याच्या शौर्याची तारीफ केली; परंतु त्याची कीर्ति वाढविण्यांत त्यांनीं आपली फारच बदनामी करून घेतली, असें जें एका इतिहासकारानें ह्मटलें आहे तें सर्वथैव खरें आहे.

याप्रमाणें शेर अफगनचा अंत झाला! त्याच्यासारखा निष्कपटी, उदार, दयाळू आणि शूर त्या वेळीं दुसरा कोणी नव्हता. असें हें श्रेष्ठ नररत्न धुळीस मिळण्याचें कारण पाहूं गेलें असतां आपणास काय बरें आढळून येतें? अर्थात् एका स्त्रीचें अद्भुत सौन्दर्य!

आपल्या शौर्यशाली पतीस अशा प्रकारचा मृत्यु आल्यावर मेहरउन्निसा हिच्या अंतःकरणाची स्थिति कशी झाली असावी, याविषयीं निरनिराळे लोक निरनिराळे तर्क करितात. आपल्या पराक्रमी पतीच्या मरणानें तिला खरोखरच अत्यंत दुःख झालें होतें, असें कांहीं इतिहासकार ह्मणतात. हें त्यांचें मत खरें असण्याचा पुष्कळच संभव आहे. कुतुब मरतांच त्याच्या जागीं जो सरदार आला, त्यानें तिला विचार करण्यास मुळींच अवधि दिला नाहीं. शेर अफगन ठार झाला अशी खातरी होतांच त्यानें त्याच्या वाड्यास गराडा देऊन मेहर-

उन्निसेस आपल्या ताब्यांत घेऊन तिला तशीच दिल्लीस रवाना करून दिली. पतीच्या आकस्मिक मृत्यूनें झालेल्या दुःखाच्या पहिल्या उमाळ्याचा कांहीं भलताच परिणाम होऊन तिनें जर आपला घात करून घेतला असता, तर तो सरदार अर्थात् बादशहाच्या क्रोधास बळी पडता. असें होऊं नये ह्मणून त्यानें त्वरा करून तिला जहांगीर बादशहाजवळ पोहोंचती केली. मेहरउन्निसा दिल्लीस पोहोंचल्यावर जी गोष्ट घडूं नये ती घडली. बादशहाचें तिच्याशीं जें वर्तन झालें त्यांत कठोरपणा आणि दुर्लक्ष्य हीं दिसून आलीं. राजवाड्यांतील नीरस अशा खोल्यांत तिची राहाण्याची व्यवस्था करून तिला अगदींच थोडी नेमणूक त्यानें करून दिली. सहा वर्षेंपर्यंत बादशहाचें तिला दर्शनहि झालें नाहीं.

बादशहाचें मन असें कसें फिरलें, याविषयीं निरनिराळीं कारणें देण्यांत आलीं आहेत. कांहींच्या मतें आपला आवडता दूधभाऊ जो कुतुब, त्याच्या मरणास मेहरउन्निसेविषयींचा आपला मोह कारणीभूत झाला असें वाटून बादशहाचें मन बदललें. तिच्यावर बादशहाचें असलेलें प्रेम आणि तिला हस्तगत करण्यासाठीं त्यानें केलेले खुनशी उपाय यांचा विचार केला असतां कुतुबशहाच्या मरणाचा अशा प्रकारचा परिणाम बादशहाच्या मनावर होईल, हें संभवत नाहीं.

दुसरी जी हकीगत दिलेली आहे तिच्यांत बराच तथ्यांश असावा असें वाटतें. शेर अफगनचा घात झाल्यावर जेव्हां मेहरउन्निसा हिला दिल्ली येथें राजवाड्यांत दाखल केलें, तेव्हां तिच्याविषयीं अत्यंत आतुर झालेल्या बादशहानें तिची मुलाखत घेतली. शेर अफगनच्या अप्रतिम गुणांवर तिचा लोभ जडला होता, अर्थात् त्यामुळें त्याचा खून करविणाऱ्या जहांगीर बादशहाचें दर्शन होतांच त्या मनस्वी मानी

स्त्रीस अतोनात कोप आला व तिनें त्याला अत्यंत निर्भर्त्सनापूर्वक झिडकारलें. या मानहानीनें बादशहाच्या अंतःकरणांत प्रदीप्त झालेल्या क्रोधाग्नींत तिच्याविषयींच्या प्रेमाची आहुति पडली. त्यानें तिला तावडतोब निघून जाण्यास सांगून आपल्या आईच्या तैनातीस तिची नेमणूक केली व तिच्या खर्चासाठीं अवघे साठ रुपये दरमहा नेमून दिले. नंतर त्यानें तिचें नांवच सोडून दिलें !

परंतु हिऱ्याचें तेज कोठेंहि झांकलें जात नाहीं. जनानखान्याच्या एकांतवासांत जरी ती होती, तरी तिच्या गुणांचा प्रकाश तेथेंहि पडला व तिला नूरमहाल ह्मणजे जनानखान्यांतील चांदणी हें नांव मिळालें. तेथें असतांना घरांतलें काम, शिवणकाम आणि कशिदा काढणें यांत ती आपला वेळ घालवूं लागली. शिवणें आणि कशिदा काढणें या कामांत तेथील अनेक स्त्रियांत तिची बरोबरी कोणालाहि करतां येण्यासारखी नव्हती. सौंदर्य व स्त्रियांस भूषविणारे इतर सर्व गुण यांच्या योगानें ती सर्वांत श्रेष्ठ असल्यामुळें तिच्या उक्तींत सर्व काव्य, तिच्या कृतींत सर्व चातुर्य आणि तिच्या कल्पनेंत सर्व रुचीचें सार अशी तिच्यावर सर्वांची श्रद्धा बसली होती. तिचें बोलणें, चालणें, तिनें आपल्या कल्पनासृष्टींतून निर्माण केलेल्या नवीन वस्तु आणि आराम-साधनें व जें जें कांहीं तिनें आपल्या चातुर्यानें प्रचारांत आणलें असेल तें तें सर्व तेथील स्त्रीसमाजास फार आवडूं लागलें. कशिद्याचीं कामें विकून जो पुष्कळ पैसा तिनें आपल्याजवळ केला होता, त्याचा उप-योग नाना प्रकारचें मोलवान् सामान घेऊन तिनें आपल्या खोल्या फार सुशोभित करण्याकडे केला. आपल्या दासींस ती नेहमीं बहुमोल वस्त्रें आणि दागिने वापरण्यास देत असे, तथापि आपला स्वतःचा पोषाख अगदीं साधा ठेवी.

तिच्या सौन्दर्याची आणि गुणांची सर्वत्र होत असलेली तारीफ ऐकून जहांगीर बादशहास तिला एकदा भेटावें असें वाटलें. आपल्या हेतूची बातमी न फोडतां अकस्मात् जाऊन तिला भेटण्याचा त्यानें बेत केला. अशा रीतीनें बादशहा तिच्या खोलींत गेला, तेव्हां तेथील सर्व शोभा व एकंदर टापटीप पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें. तेथील सर्व कांहीं सुंदर आणि श्रीमंतीच्या थाटाचें होतें. त्या सर्वांची मालकीण जी नूरमहाल ती एका नकशीदार कोचावर जरा टेंकून राहिल्यासारखी उभी असून तिचा पोषाख साधा व शुभ्र असा होता; परंतु तो पोषाख तिच्या सहज लावण्यानें इतका खुलला होता, कीं, तशी शोभा बगदादचें जरतारी काम, अथवा काश्मीरचा कशिदा यांनीं चकाकणाऱ्या पोषाखासहि आली नसती ! तिच्या सभोंवार आपापलें काम करीत तिच्या दासी बसल्या होत्या. त्या सर्वांच्या अंगावर उंची वस्त्रें होतीं. पुष्कळ वर्षें बादशहाची तिला भेट झाली नव्हती. शिवाय, आज बादशहाची स्वारी आपल्या भेटीस येणार याविषयीं तिला कांहींच बातमी नव्हती. असें असल्यामुळें तिची आरंभीं जरा धांदल उडाली. बादशहानें आंत प्रवेश केला तेव्हां तिनें लवून मुजरा केला, परंतु मुखांतून एकहि शब्द काढला नाहीं. तिला तेथें येऊन जरी सहा वर्षें झालीं होतीं, तरी तिचें लावण्य पूर्वीपेक्षांहि जास्त तेजस्वी दिसे. जहांगीर तर भांबावून गेला व कांहीं वेळ त्याच्या तोंडांतूनहि शब्द निघाला नाहीं.

बादशहाच्या मनाला जरा स्थिरपणा आला तेव्हां तो कोचावर बसला. नूर महाल हिलाहि त्यानें बसावयास सांगितलें. बादशहानें विचारिलें " असें कां बरें ? तुमच्या दासी पहाव्या तर त्यांच्या अंगावर थाटाचा आणि मोलवान् पोषाख, आणि त्यांच्या मालकिणीकडे पाहावें तों सर्व बेत साधा !!!"

त्या चतुर स्त्रीनें मोठ्या धूर्तपणानें उत्तर दिलें "या दासी माझी सेवाचाकरी करितात. माझ्या आवडीप्रमाणें चांगलींचांगलीं वस्त्रं मी त्यांनां देत्यें व त्यांची हीन स्थिति आपल्या समजाप्रमाणं मी सुसह्य करित्यें. अर्थात् मी जी त्यांची मालकीण त्या माझ्या मर्जीप्रमाणं त्यांनां वागावं लागतं. परंतु, शहानशहा, मी तर हुजूरची दासी असल्यामुळं माझा पोषाख हुजुरच्या मर्जीप्रमाणं असला पाहिजे. हुजुरची मर्जी कळेल तेव्हां मी त्याप्रमाणं वर्तन करीन."

सहा वर्षे एकीकडे असल्यामुळें नूरमहाल हिच्या मनांत फरक झाला होता व बादशहाच्या वैरामुळें आपला पति मृत्युमुखीं पडला ही गोष्ट विसरण्याइतकी तिच्या मनाची तयारी झाली होती. तिच्याबरोबर बोलत असतां बादशहाचें पूर्वीचें प्रेम जागृत होऊन त्यानें प्रीतिपुरःसर अंतःकरणानें तिला आलिंगन दिलें व झाल्या गोष्टी विसरण्याविषयीं तिची विनवणी केली. तेथच्या तेथें मोठ्या आकाराच्या चाळीस मोत्यांचा बहुमोल कंठा स्वहस्तें तिच्या गळ्यांत घालून "मी तुला माझ्या सिंहासनाची अधिकारीण करीन," असें मधुर वाक्य त्यानें तिच्या कानांत सांगितलें. लगेच त्या खोल्यांतून तिला नेऊन राणीचे भव्य दिवाणखाने तिच्या हवालीं केले. बादशहानें आपल्या लग्नाचा थाट फारच भपक्यानें केला. तिचें पूर्वीचें नांव बदलून आतां तिला नूरजहान ह्मणजे जगज्योत्स्ना हें नांव बादशहानें दिलें. तिचें नांव सोन्याच्या नाण्यावर खोदण्याचा त्यानें हुकूम केला. "नूरजहानचें नांव सोन्यानें घेतलें तर सोन्याचें सौंदर्य शंभरपट वाढेल," असे अभिमानयुक्त उद्गार तिच्या सहवासाच्या स्वर्गसुखांत असलेल्या बादशहाच्या मुखांतून निघाले.

नूरजहानची अपार सत्ता बादशहाकडून तिच्या बापास मुख्य वजिरीचीं वस्त्रें मिळाल्याकारणानें चांगली दृढ झाली. तिचा भाऊ आसफखान याला जहांगिरानें आपल्या दरबारचा पहिल्या प्रतीचा उमराव केलें. या आसफखानाच्या मुलीशीं बादशहाचा पुत्र शहाजहान याचा विवाह झाला. शेर अफगनपासून नूरजहान हिला जी एक मुलगी होती, तिच्याशीं शहारियार ह्मणून बादशहाचा दुसरा मुलगा होता त्यानें लग्न केलें. याप्रमाणें ज्या कुटुंबास निर्जन वनांत मरून पडण्याचा प्रसंग आला होता, त्याचा भाग्यसूर्य सर्व तेजानें चोहींकडे प्रकाश पसरूं लागला.

लग्नाच्या पहिल्या दिवसापासून एकसारखीं वीस वर्षे बादशहावर आणि हिंदुस्तानच्या विस्तीर्ण राज्यावर नूरजहान हिनें अधिकार चालविला, आणि तिनें तो अधिकार फार शहाणपणानेंच चालविला. तिच्या मर्जीबाहेर राज्यांत कोणाला कसलीहि जागा अथवा अधिकार मिळत नसे. कोणत्याहि परराष्ट्राशीं तह वगैरे करणें तो तिच्या संमतीनें नेहमीं होत असे. नूरजहानचा राहण्याचा थाट अप्रतिम असे. जहांगीर बादशहानें आपला वृत्तांत लिहिला आहे त्यांत आपल्या पत्नीविषयीं उल्हासयुक्त अभिमानानें त्यानें पुढीलप्रमाणें लिहून ठेविलें आहे:—"राणीची सदभिरुचि आणि वैभव यांचें स्मारक अशी एखादी बाग अथवा इमारत ज्या ठिकाणीं उभारली गेली नाहीं, असें साऱ्या राज्यांत एकहि शहर सांपडणें कठीण!"

राज्यकारभारांत त्याचप्रमाणें स्त्रियांच्या विशिष्ट कर्तव्यांत नूरजहानची बुद्धि फार चांगली चालत असे. तिनें आपल्या अभिरुचीनें दरबारची शोभा वाढवून टापटिपीच्या व्यवस्थेनें दरबारचा खर्चहि कमी केला होता. दिवाणखान्यांत ठेवावयाच्या सामानाची एखादी नवीन

रचना ती आपल्या कल्पनेनें काढी. पूर्वीपेक्षां जास्त सुबक आणि सोयवार असे बायकांचे पोषाख तिनें प्रचारांत आणिले. गुलाबी अत्तर, जें या देशांत प्रचारांत आलें, त्याच्या उपयोगाची सुरुवात तिनें केली किंवा तिच्या आईनें केली, याविषयीं निश्चित अशी माहिती अद्याप मिळत नाहीं.

कांहीं वर्षे सर्व कांहीं यथास्थित चाललें; परंतु जहांगीर बादशहानंतर गादीचा वारसहक्क कोणाकडे जावयाचा, हा प्रश्न उद्भवल्यामुळें तंटे सुरू झाले. जहांगीर आणि राणी नूरजहान यांच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचें वितुष्ट अखेरपर्यंत आलें नाहीं. जो तंटा उत्पन्न झाला तो मुलांमध्यें झाला. बापाच्या मागें गादीवर बसण्याचा हक्क शहाजहानाचा आहे, असा सर्वसाधारण समज होता; परंतु कित्येकांस नूरजहानचा जांवई शहारियार याला गादी मिळावी, असें वाटत होतें. शहाजहानानें उघड बंड केलें; परंतु त्यांत त्याचा पराजय होऊन त्याला बापाची क्षमा मागावी लागली, आणि बादशहानें त्याला क्षमा केली.

शहाजहानाचें बंड मोडून व्यवस्था लागते न लागते इतक्यांत मोहबतखान ह्मणून एका नामांकित आणि बलिष्ठ सरदारानें बखेडा करण्यास सुरुवात केली. या बंडांत नूरजहान मोठ्या धैर्यानें वागली. मोहबतखानासारखा दुसरा विजयशाली सरदार त्या वेळीं कोणी नव्हता. राज्याच्या संरक्षणार्थ अगर आपल्या स्वतःच्या राजकारस्थानाच्या सिध्यर्थ त्यानें तरवार उपसल्यास त्याच्या सभोंवार हजारों कसलेले वीर विलंब न लागतां गोळा होण्याइतकी त्याची कीर्ति होती. हा सरदार बंगालचा सुभेदार होता व याच्या राज्यकारभारांत पैशाची पुष्कळ अफरातफर झाली होती, असे खरेखोटे आरोप त्याच्यावर दरबारा-

समोर आले होते. त्याला एकदम दरबारास हजर होण्याचा हुकूम झाला. आपल्यावरील आरोपासंबंधाची हकीगत जाहीर करून दरबारचें बोलावणें टाळण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न करून पाहिला, परंतु दरबारचा विशेषच आग्रह पाहून त्याला दिल्लीस येणें भाग पडलें. त्यानें येतांना आपल्या बरोबर पांच हजार रजपूत आणले होते.

जहांगीर बादशहा काबूलवर कूच करून जाण्याच्या तयारींत होता. बादशाही छावणी थोड्या अंतरावर आहे असें पाहून वादग्रस्त बाबतीचा उलगडा करण्यासाठीं मोहबतखानानें आपला जांवई पुढें पाठविला व बादशहाच्या तब्यतीचा अजमास पाहून मग मुलाखतीस जावें, असा त्यानें बेत ठरविला. त्यानें जो हा जासूद पाठविला होता, त्याला बादशहाच्या हुकुमानें चांगली चाबकांची बोळवण मिळाली व तसेंच त्याला परत घालवून देण्यांत आलें. आपल्या माणसाची अशा प्रकारें फजिती झालेली पाहून मोहबतखानास फार वाईट वाटलें व अतोनात रागहि आला; परंतु राग न दाखवितां आपल्या झालेल्या अपमानाचा सूड उगविण्याची तो वाट पाहत राहिला.

झेलम नदीवर बादशहाच्या लोकांचा तळ पडला होता. दुसऱ्या दिवशीं पहांटेस सैन्याचा मुख्य भाग पुलावरून पलीकडे पार झाला. मागून बादशहाचा खास गोट जावयाचा होता. सैन्याचा मुख्य भाग दूर गेला हें पाहतांच आपणास पाहिजे होती ती संधि सांपडली असें मोहबतखानास वाटलें. त्यानें तत्क्षणीं आपले लोक पुढें सारले आणि पुलास आग लावून दिली. तसाच मागें फिरून त्यानें आपला मोर्चा बादशाही तंबूवर फिरविला व एकदम तंबूंत शिरून तो बादशहाच्या समोर उभा राहिला. आपल्या बचावासाठीं आपणास हें कृत्य करावें लागलें, असें त्यानें जहांगिरास सांगितलें. बादशहास तत्काळ एका

हत्तीवर बसवून त्यानें आपल्या छावणींत नेलें. तेथें गेल्यावर "हुजूरनीं कांहीं फिकीर करूं नये. हुजूरच्या सुरक्षितपणास किंचित्हि कमतरता पडणार नाहीं. मीं हें कृत्य केवळ स्वतःच्या बचावासाठीं केलें आहे. कारण, मलाहि आपला बचाव पाहिला पाहिजे." असें तो बादशहास ह्मणाला.

इकडे नूरजहान जनानखान्याच्या तंबूंत होती. तिनें हा सर्व प्रकार पाहिला, परंतु तिचें धैर्य खचलें नाहीं. नदीच्या पलीकडे ताबडतोब जाऊन सैन्यांत मिळावें आणि तेथून पाहिजे तितके लोक बरोबर घेऊन मोहबतखानावर हल्ला करून बादशहास बंधमुक्त करावें, असें तिनें मनांत आणलें, लगेच वेषांतर करून ती बाहेर निसटली व पालखींत बसून पलीकडे सैन्यांत जाऊन दाखल झाली. आपला भाऊ आणि मुख्य सरदार यांस ताबडतोब बोलावणें पाठवून तिनें त्यांनां आपल्या समोर आणविलें. आपला बादशहा अशा रीतीनें धोक्यांत पडण्याइतकी हयगय त्यांनीं कशी केली, याविषयीं तिनें त्यांची खूप निर्भर्त्सना केली. ती नुसतें बोलूनच थांबली नाहीं, तर फौज पाठवून बादशहास सोडविण्याच्या तजविजीस लागली. फिदरखान नांवाच्या एका सरदारास रातोरात कांहीं लोकांनिशीं पोहून पलीकडे जाण्यास व बादशहा ज्या तंबूंत असेल त्याच्यावर हल्ला करण्यास तिनें फर्माविलें; परंतु ही धाडसाची युक्ति फसली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं साऱ्या फौजेला बादशहाच्या बचावासाठीं बाहेर पडण्यास हुकूम झाला. नूरजहाननें सैन्याचें आधिपत्य स्वतः-कडे घेतलें होतें. एका उंच हत्तीवर हौद्यांत बसून ती सैन्यास हुकूम करूं लागली. हातांत धनुष्य आणि बाणांनीं भरलेले चार भाते तिनें बरोबर घेतले होते. पूल जळून गेल्यामुळें जवळच नदीस उतार होता

तेथून पलीकडे जाणें भाग पडलें. ही उताराची जागा फार बिकट होती. जागोजाग खळगे असल्यामुळें त्या ठिकाणीं पाणी खोल होतें. पुष्कळांस पोहून जाणें भाग पडलें व त्यांच्याजवळची दारू भिजून गेली. भिजलेल्या कपड्यांचें आणि चिलखताचें ओझें जास्त झाल्यामुळें त्यांनां भराभर नदी ओलांडतां येईना. शत्रूच्या लोकांशीं हातघाई करीतकरीत त्यांनां पैलतीर गांठावें लागलें. आपला भाऊ आणि मुख्यमुख्य सरदारांचे तरणेबांड आणि हिंमतवान मुलगे बरोबर घेऊन नूरजहान अगदीं पहिल्यानें नदींत शिरली. मोहबतखान आणि त्याचे रजपूत यांनीं मोठ्या जोरानें राणीच्या मंडळीवर हल्ला केला. तोफेचे गोळे आणि बाण यांचा नुसता वर्षाव नूरजहानच्या हौद्यासभोंवार चालला होता, तथापि ती शूर स्त्री बिलकूल डगमगली नाहीं! आपल्या लोकांस ती एकसारखें उत्तेजन देत होती. तिनें आपल्या भात्यांतले बाण शत्रूच्या लोकांवर अचूक टाकून पुष्कळांनां ठार केलें. अखेरीस तिच्या हत्तीवरचा महात मरून खालीं पडला. तिच्या मांडीवर तिच्या मुलीची मुलगी होती तिला एक बाण लागून जखम झाली. तिच्या हत्तीच्या सोंडेवर एक जोराचा वार लागला व त्या कळेसरसा तो मागें फिरून आवरेनासा झाला.

इतकें झालें तेव्हां अर्थात्‌च युद्धाचा निकाल लागला. नूरजहानच्या लोकांचें धैर्य सुटून ते जीव घेऊन पळाले. पराभूत झालेल्या राणीस पकडण्यासाठीं मोहबतखानानें जिवापाड मेहनत केली, परंतु मोठ्या हुषारीनें आणि चलाखीनें ती तेथून निसटून लाहोरास गेली, व मोहबतखानाचे सारे प्रयत्न फुकट गेले. त्यानें बादशहाकडून बळजबरीनें पत्रें लिहून नूरजहान हिला कळवलें, कीं, सर्व गोष्टींचा निकाल सलोख्यानें झाला आहे, सबब आपणास बादशहाच्या स्वारींत येण्यास

मुळींच अडचण नाहीं. हीं पत्रें पाहून तिच्या मनांतील सर्व संशय नष्ट झाला. ती तावडतोब बादशहाच्या छावणींत दाखल होण्यासाठीं निघाली; परंतु छावणीजवळ येतांच मोहबतखानाच्या लोकांनीं तिच्या-भोंवतीं गराडा घातला. याप्रमाणें कैद करून तिला बादशहापुढें हजर केलें. आपला जांवई शहारियार यास गादीवर बसविण्याची हिची खटपट आहे, व त्यामुळें हिच्यावर राजद्रोहाचा आरोप लागू होत असल्याकारणानें हिला देहांतशासन योग्य आहे, असें मोहबतखानानें बादशहास जाहीर केलें. बादशहाची योग्यता आह्मी सर्व लोक देवा-सारखी मानीत असतां माणसाच्या उच्चनीचपणाकडे पाहून बादशहाच्या हातून अन्याय झाल्यास लौकिकास हलकेपणा येईल, असेंहि त्यानें जहांगिरास बजावलें.

अशा प्रसंगांत पडलेल्या आपल्या आवडत्या राणीच्या योग्यतेकडे व शौर्याकडे न पाहतां बादशहानें तिला तत्काळ देहांतशिक्षा देण्याच्या हुकुमावर सही केली. जहांगिराच्या या नीचपणाचा निषेध करावा तितका थोडा होईल. याहि वेळीं बिलकूल न डगमगतां बादशहाचा हुकूम नूरजहाननें शांत चित्तानें ऐकला. शिक्षा अमलांत येण्याच्या पूर्वी आपली व बादशहाची एक वेळ मुलाखत व्हावी, एवढी विनंति तिनें केली. "राजे अथवा बादशहा एकदां कैदेंत पडले ह्मणजे स्वातं-त्र्याबरोबर त्यांचें जीवितहि नष्ट होतें हा नियम आहे. मला एकदा शहास भेटूं द्या. ज्या हातानें माझ्या देहान्तशिक्षेच्या हुकुमावर सही झाली आहे तो हात माझे नेत्र अश्रुजलानें भिजवतील तरी ! दुसरें कांहीं माझें मागणें नाहीं." असें ती ह्मणाली.

या विनंतीस मोहबतखानानें आपली संमति दिली. नूरजहान हिनें बादशहाकडे पाहिलें. तिच्या तोंडांतून शब्दच निघेना. तिची ती मुद्रा

पाहून बादशहास गहिंवर आलें व "मोहबत, या स्त्रीस तूं वांचवणार नाहींस? बघ बरें तिच्या डोळ्यांतून. पाणी कसें चाललें आहे तें!!" बादशहा म्हणाला. त्या सरदाराचें उमदें अंतःकरण दयेनें वितळून गेलें व "शहाची आज्ञा फुकट कशी जाईल?" असें उत्तर देऊन तेव्हांच त्यानें राणीस मुक्त केलें.

पुढें कांहीं महिने बादशहा आणि नूरजहान मोहबतखानाच्या नजरकैदेंत होतीं. हा बलाढ्य सरदार आपल्या यजमानांस आपल्या छावणींतून बरोबर फिरवी. अखेरीस बादशहा पुरा नरम झाला व आपल्या मानखंडनेचेंहि चांगलें उट्टें निघालें, असें पाहून त्यानें आपल्या सत्तेंतून त्या उभयतांची मुक्तता केली. मोहबतखानाच्या ताब्यांतून सुटतांच नूरजहानच्या सांगण्यावरून बादशहानें मोहबतखानास राजद्रोही ठरविलें व त्याला ठार मारणारास मोठें बक्षिस देण्याचें जाहीर केलें; परंतु मोहबतखानाच्या युद्धचातुर्याचें महत्त्व किती आहे तें सांगून असफखानानें नूरजहानचा रोष कमी केला. बादशहाकडून त्याला माफी देववली आणि दक्षिणेंतील सैन्यावर त्याला मुख्य नेमून तेथील सुभेदारी त्याला सांगितली. याप्रमाणें बादशहा आणि मोहबतखान यांच्यामधील लढ्याचा निकाल होऊन धन्यावर चाकरानें जय मिळविला!

पुढें आणखी कांहीं वर्षें नूरजहानचें साम्राज्य पूर्ववत् चाललें. परंतु १६२८ या वर्षीं जहांगीर मरण पावला तेव्हां त्याच्याबरोबर नूरजहानची सत्ताहि नाहींशी झाली. पतीच्या नंतर अठरा वर्षांनीं ती मरण पावली. तिला दरसाल सरकारांतून पंचवीस लाखांची नेमणूक असे. जहांगीर मृत्यु पावल्यानंतर मरेपर्यत ती नेहमीं शुभ्र पोषाख वापरी. पुस्तकें वाचणें, व शास्त्रांचा अभ्यास करणें, यांत ती आपला

वेळ घालवी. राहिलेल्या वेळीं ती विश्रांति घेत असे. तिचा स्वभाव मानी असल्यामुळें तशा सत्ताहीन स्थितींत राजकारणाच्या गोष्टी तिनें साफ सोडून दिल्या. आपला राहण्याचा वाडा व बागबगीचे यांतच तिनें आपल्या आयुष्याचा पुढचा काळ घालविला.

या भाग्यशाली स्त्रीच्या पूर्व काळांतलें वैभव व महत्त्वाच्या घडामोडी आणि उत्तर काळांतील सुखशांतीचा जीवनवृत्तांत" हीं मनांत आणलीं ह्मणजे पालमिराच्या अत्यंत भाग्यशाली राणीच्या उत्तरचरित्राचें स्मरण होतें. नूरजहान हिनें हा काळ जसा लाहोरच्या सुखनिवासांत घालविला तसे त्या राणीनें टायबर नदीच्या कांठीं आपल्या वाड्यांत उतार वयाचे दिवस शांत चित्तानें घालविले.

# कनोजची राजकन्या.

मुसलमानांची समशेर हिंदुस्तानांत घुसल्यापासूनचा आमचा इतिहास पाहिला, तर सर्व राजकारस्थानें व राजकीय उलाढाली यांच्या मुळांत द्रव्यलोभ, राज्यलोभ, खासगी द्वेष आणि मत्सर व कधींकधीं स्त्रियांच्या अभिलाषानें उत्पन्न झालेला कलहाग्नि, हींच बहुधा दृष्टीस पडतात. धर्माभिमानापेक्षां त्याच्या अतिरेकानें उत्पन्न झालेलें जें धर्मवेड, त्याचा परिणाम या आमच्या देशास पुष्कळच भोगावा लागला आहे. प्रस्तुत चरित्रविषयाच्या कथेवरून खासगी द्वेषानें बाहेरच्या लोकांस आंत घुसण्यास कशी सवड मिळाली, हें सहजीं दिसून येणार आहे. मुसलमानी सत्ता स्थापित होईपर्यंत व त्यानंतरहि बराच काळ ज्या लढाया आणि घोर युद्धसंग्राम घडून आले, त्यांत रजपूत लोकांनीं इतकें जाज्वल्य शौर्य आणि अद्भुत

पराक्रम दाखविले आहेत, कीं, अशा वीयशाली आणि पराक्रमी लोकांस देशभक्तीची आणि देशस्वातंत्र्याची जर खरी कल्पना असती, तर आज आमची स्थिति कांहीं निराळीच झाली असती. रजपुतांचे शौर्यादि गुण भाट कवींच्या काव्याचा आत्माच होऊन बसले आहेत; परंतु त्या वेळची परिस्थिति स्वदेशबुद्धीस जर अनुकूळ असती, तर त्यांच्या गुणांचे परिणाम, आमच्या याच देशांत नव्हेत, तर जगांतील इतर पुष्कळ देशांत स्मारकरूपानें आज पाहण्यास मिळाले असते. रजपुतांचा इतिहास जसा वीररसानें थबथबलेला आहे, तसा पृथ्वी-तळावरील दुसऱ्या कोणत्या तरी जातीचा इतिहास असेल काय ?

आमची चरित्रनायिका जन्मास आली त्या वेळीं हिंदुस्तानांत मुख्य अशीं चार राज्यें होतीं. तीं कनोज, दिल्ली, मेवाड आणि गुजराथ हीं होत. या चारांत पहिलीं दोन फार बलाढ्य होतीं. दिल्ली येथें त्या वेळीं सुप्रसिद्ध पृथ्वीराज हा राज्य करीत होता. हा चव्हाण कुळांत मुख्य असे. रजपूतांतले अगदीं वेंचीव लोक ह्मटले ह्मणजे पृथ्वीराजाजवळ होते ते. दिल्लीपेक्षांहि कनोजचें राज्य बलाढ्य होतें. कनोज येथें राजा जयचंद राज्य करीत होता. त्याच्याजवळ ऐशीं हजार चिलखती लोक, तसेच तीस हजार घोडेस्वार, तीन लक्ष पायदळ आणि दोन लक्ष तिरंदाजी लोक इतकें सैन्य होतें. शिवाय, कैक हत्ती होते ते निराळेच. सारांश, जयचंद हा त्या वेळचा एक मोठाच भूपति होता, असें ह्मटलें असतां चालेल.

या जयचंदास एक कन्यारत्न झालें. तिचें नांव संयोगिता. हीच 'कनोजची राजकन्या' या नांवानें प्रसिद्ध आहे. सौंदर्य आणि बुद्धीचा चलाखपणा, यांविषयीं हिची साऱ्या देशांत त्या वेळीं पुष्कळ ख्याति

होती. बापाचा तर सारा जीव तिच्यावर असे व राज्यांतल्या सर्व लोकांचें प्रेम तिच्यावर बसलें होतें.

कोणत्याहि स्थितींत असलें रत्न निपजलें असतें, तरी त्याचा प्रकाश पडला असता; तथापि जयचंदानें जें एक कार्य आरंभिलें, त्याच्या योगानें तिचें नांव इतिहासांत प्रमुखपणें पुढें येण्यासारख्या गोष्टी घडून आल्या. शत्रूंवर एकसारखा विजय मिळत गेल्यामुळें जयचंदाचा अभिमान इतका वाढला होता, कीं, राजसूय यज्ञासारखा यज्ञ करून आपलें साम्राज्य इतर सर्व राज्यांवर विधिपूर्वक स्थापित करावें, असें त्याला वाटलें. अशा प्रकारचा यज्ञ पांडवांच्या नंतर कोणी केला नव्हता. ज्या ज्या वेळेस असले यज्ञ झाले, त्या त्या वेळेस भयकर युद्धें होऊन शोणिताच्या नद्या वाहलेल्या आहेत. या यज्ञाच्या वेळीं सर्व यत्किंचित् कामें मांडलिक अथवा पाडाव केलेल्या राजांकडून करून घेण्याची पद्धत असते.

या यज्ञसमारंभाची तयारी आबाढव्य प्रमाणावर चालली. जयचंदानें सर्व राजांस आमंत्रणें पाठविलीं. समारंभाच्या शेवटीं आपल्या रूपवती कन्येचें लग्न करण्याचेंहि त्यानें योजिलें होतें. समारंभाचा दिवस नजीक येत चालला, तसे राजेरजवाडे, सरदार वगैरे लोक राजधानींत जमूं लागले. जयचंदाचे स्नेही होते ते अर्थात् आनंदानें आले. मांडलिकांस आल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. बाकी जे राहिले ते जळफळत जळफळतच आले. या विधीस हजर असल्यानें जयचंदाचें साम्राज्य आपण कबूल केल्यासारखें होणार, या गोष्टीनें त्यांचें मन खिन्न झालें होतें. जयचंदास असा यज्ञ करण्यास अधिकार बिलकूल नाहीं, असें स्पष्ट आणि धैर्यानें जाहीर करणारे दोनच राजे होते. एक दिल्लीचा अधिपति पृथ्वीराज आणि दुसरा चितोरचा समरसिंह. या दोघांनीं

यज्ञास हजर रहाण्याचें साफ नाकारलें व आपल्यापेक्षां कोणत्याहि बाबतींत जयचंद श्रेष्ठ नाहीं, असें त्यांनीं उघड जाहीर केलें.

पृथ्वीराज आणि समरसिंह यांचें हें उद्दामपणाचें वर्तन कनोजच्या दरबारीं समजलें, तेव्हां जयचंदास फार क्रोध आला. तावडतोब सैन्यानिशीं दिल्लीवर स्वारी करून पृथ्वीराजास खेंचून समारंभास आणण्याचा आपला बेत त्यानें जाहीर केला. त्या दोघांची हजिरी समारंभाच्या वेळीं नसल्यास सर्व खटाटोप व्यर्थ जाईल, इतकें त्यांचें महत्त्व असल्यामुळें तर त्याला फार वाईट वाटलें. त्या वेळीं यज्ञच तहकूब करावा लागतो कीं काय, असा सुमार दिसूं लागला; परंतु यज्ञांत ब्राह्मणांची चंगळ उडणार असल्यामुळें त्यांनीं इतक्या थरास गोष्ट आणूं दिली नाहीं. त्यांनीं स्वारी करण्याचा सल्ला राजास दिला आणि युद्धाचा परिणाम प्रतिकूळ झाला तर सर्वच कार्यभाग ढांसळणार व आपल्यापुढें आलेल्या द्रव्याच्या राशी पदरांत पडणार नाहींत असें वाटून त्यांनीं एक खाशी युक्ति काढली. अशा वेळीं आपला कार्यभाग युक्तीनेंच करून घेतला पाहिजे, असें त्यांनीं राजाला सांगितलें. युद्ध सुरू केल्यास एकंदर राज्य ताब्यांत येण्यास विलंब लागेल व यज्ञाचा योग फारच लांबणीवर पडेल, यासाठीं हे दोन राजे समारंभास येत नसले तर त्यांच्यासाठीं यज्ञाची खोटी न करतां पृथ्वीराज आणि समरसिंह यांच्या सुवर्णप्रतिमा करून समारंभ साजरा करून घ्यावा, असा सल्ला त्यांनीं जयचंदास दिला. हा सोपा उपाय जयचंदासहि मान्य होऊन त्यानें तत्काळ त्या दोघांच्या सुवर्णप्रतिमा करण्याचा हुकूम केला. प्रतिमा तयार होतांच देवडीवरच्या पहारेकऱ्याच्या जागीं पृथ्वीराजाची प्रतिमा स्थापन करून त्याची राजेलोकांत नाचक्की करण्याचा त्यानें घाट घातला.

पृथ्वीराजास ही बातमी समजतांच आपला असा अपमान करणाऱ्या जयचंदाचा पक्का सूड घेण्याचा त्यानें निश्चय केला. जयचंदाच्या राजधानींत जाऊन तेथून ती प्रतिमाच उचलून आणावी, असें त्यानें मनांत आणून त्या तयारीस तो लागला. अर्थात्, काळाच्या जबड्यांत शिरण्यासारखेंच हें कृत्य होतें; परंतु त्या निधड्या छातीच्या पथ्वीराजास त्याचें कांहींच वाटलें नाहीं. त्यानें उशीर मुळींच लावला नाहीं. मोठ्या खुबीनें त्यानें आपला वेष पालटला व चांगले पांचशें निवडक योद्धे बरोबर घेऊन गुप्तपणें कनोज येथें जाऊन तो दाखल झाला. इकडे समारंभ खूप जोरानें चालला होता. मेजवान्यांवर मेजवान्या झडत होत्या व सर्व शहर आनंदाच्या गडबडींत दंग होऊन गेलें होतें. अशा वेळीं शहरांत शिरून देवडीवर असलेली आपली सुवर्णप्रतिमा उठवून अगणित सेनेंतून तरवारीनें त्वरित मार्ग काढून पथ्वीराज बाहेर आला व आपल्या लोकांसहवर्तमान स्वस्थानीं निघून गेला. हें बेसुमार छातीचें कृत्य बहुतेक निश्चितपणें होणाऱ्या प्राणहानीकडे बिलकूल लक्ष्य न देतां त्यानें अशा सफाईनें केलें व हजारों हत्यारबंद पहारेकऱ्यांच्या हातून तो इतक्या झोंकानें सुरक्षित निसटून गेला, कीं, त्याची जिकडेतिकडे फारच वाहवा झाली.

पृथ्वीराजाचें धैर्य आणि पराक्रम हीं कनोज येथें ज्याच्या त्याच्या तोंडीं झालीं.जयचंदास तर हें अपमानदुःख अंतःकरणास झोंबल्यासारखें झालें. पृथ्वीराजानें एवढा अचाट पराक्रम करून आपली सुवर्णप्रतिमा उचलून नेली, इतकेंच नव्हे तर तिच्याबरोबर राजकन्या संयोगिता हिचें अंतःकरणहि हिरावून नेलें! अंतःपुरांत पृथ्वीराजाच्या पराक्रमाची इत्थंभूत हकीगत दासींच्या मुखानें संयोगितेस कळली व त्या शूर आणि तरुण राजपुरुषास तिनें आपलें हृदय अर्पण केलें. यज्ञसमा-

रंभाच्या अखेरीस जेव्हां तिच्या विवाहाची गोष्ट निघाली, तेव्हां राजानें पसंत केलेला वर नाकारून आपलें प्रेम पृथ्वीराजास वाहिल्याचें तिनें जाहीर केलें.

आपल्या मुलीचा हा निर्धार ऐकून जयचंदास पराकाष्ठेचें दुःख झालें. ऐन समारंभांत, इतका बंदोबस्त असतां, पृथ्वीराजानें येऊन आपली प्रतिमा उचलून नेली, आणि या अपमानदुःखावर डाग देण्यासाठींच जणूं काय त्यानें आपल्याबरोबर आपल्या आवडत्या कन्येचें हृदयहि चोरून नेलें, असें जयचंदास वाटून तो फारच खजील झाला व त्याला अतिशय संताप चढला. त्यानें संयोगितेस पुष्कळ सांगून पाहिलें, आपण निवडलेला राजपुत्र पसंत करण्यासाठीं हरतऱ्हेनें तिची विनवणी केली, परंतु तिनें आपला निश्चय ढळविला नाहीं. " पृथ्वीराजास मीं मनानं वरलं आहे. आतां अन्य विचार मनांत आणणं शक्यच नाहीं !" असें तिनें स्पष्ट सांगितलें. तें तिचें निर्धाराचें भाषण ऐकतांच राजाचा क्रोध अनावर झाला. आपली मुलगी पृथ्वीराजाची बायको झालेली पाहण्यापेक्षां तिला निरंतर बंदिखान्यांत कोंडून ठेवलेली बरी, असें त्याला वाटलें. राजाच्या हुकुमावरून तत्क्षणीं तिला बंदिखान्यांत टाकलें. तेथें कांहीं दिवस प्रतिबंधांत राहिल्यावर संयोगितेला आपोआप चांगली समजूत येईल, असें त्याला वाटलें होतें; परंतु जयचंदास बायकांच्या स्वभावाचें पुरें ज्ञान नव्हतें, असेंच ह्मणावें लागतें. संयोगितेचें मन फिरावें ह्मणून त्यानें जी तजवीज केली, तिनें तिचा निश्चय न ढळतां तो अधिकच बळकट झाला. बंदिखान्यांतून तिनें आपल्या मनाची स्थिति पृथ्वीराजास कळविली व आपली होत असलेली जाचणूक किती असह्य आहे हेंहि त्याला समजविलें. या दुःसह स्थितींतून आपणास सोडवावें असें जरी

तिनें त्याला विनविलें नव्हतें, तरी त्याच्यासारख्या शूर, उमद्या राजपुत्रास एवढी हकीगत कळल्यावर स्वस्थ राहवणार नाहीं, हें पक्कें माहीत होतें, आणि तिच्या समजाप्रमाणें पुढील हकीगत घडून आली.

सुवर्णप्रतिमा घेऊन शहरच्या बाहेर पडल्यावर पृथ्वीराजाच्या पाठोपाठ जयचंदाचे स्वार त्वेषानें दौडत गेले व दिल्लीच्या प्रांतांत जाऊन पोहोंचेपर्यंत पृथ्वीराजास एकसारखें शत्रूशीं लढत आपला मार्ग काढावा लागला. इतक्या निकराच्या प्रयासानें तेथें जाऊन पोहोंचल्यावर कांहीं वेळ स्वस्थ बसावें असें त्याला वाटणें स्वाभाविक होतें. तथापि आपल्याला अंतःकरण अर्पण केल्यामुळेंच तुरुंगवास भोगीत असलेल्या तरुणीस न सोडवितां स्वस्थ बसेल असा शूर मर्द कोण आहे ? पृथ्वीराजाच्या मनांत तर इतका आवेश आला, कीं, कनोजचेच नव्हेत तर साऱ्या हिंदुस्तानचे सर्व योद्धे एकत्र होऊन जरी तिचें रक्षण करीत असले, तरी तिला सोडवून आणावी, अशी त्यानें हिंमत धरिली.

ज्यांचें शौर्य रणस्तंभासारखें अढळ असे, असे अनेक योद्धे पृथ्वीराजाजवळ होते. त्यांतून त्यानें या धाडसाच्या कामासाठीं जे निवडले ते तर केवळ वीररसाचे पुतळेच होते ! पांच पांडव अत्यंत शूर आणि मोठे पराक्रमी, परंतु जरासंधाच्या वधासारख्या धाडशी कामास भीम आणि अर्जुन यांस जसें श्रीकृष्णानें निवडलें, त्याप्रमाणेंच ही निवड होती. ज्यांनीं उत्तरेकडून हिंदभूमीवर वरचेवर येत असलेले हल्ले आपल्या समशेरीनें अनेक वेळां पिटाळून लावले, रणांत पराक्रम करणें हेंच ज्यांचें जीवितसार्थक्य, व शौर्य हाच ज्यांचा आत्मा, अशांपैकीं हे वीर होते. या आपल्या रणबंधूंस एकत्र बोलावून पृथ्वीराजानें त्यांनां संयोगितेसंबंधीं आपलें मनोगत सांगितलें. "जिनें माझ्या गुणांवर लुब्ध होऊन आपलें सर्वस्व मला अर्पण केलें, ती कारागृहांत

खितपत पडली असतां येथें स्वस्थ राहण्याचा नीचपणा माझ्या कल्पनेसहि स्पर्श करूं शकत नाहीं; सबब मी तेथें जाणार आणि तिला सोडवून आणून तिचें पाणिग्रहण करणार," असा आपला निश्चय झाल्याचें त्यानें त्यांस सांगितलें.

त्यावर "महाराज, चलावें. महाराजांचा आनंद तो अमचा आनंद! आपण बरोबर असाल तर आह्मी काळाचे काळ आहों! आतां उशीर कशाला?" असें सर्वांचें उत्तर एकदम आलें.

त्या सर्वांनीं बराच वेळ विचार करून एक युक्ति काढली. महाप्रख्यात चंदभाटास कनोजच्या दरबारीं पाठवावें व त्यानें पृथ्वीराजाच्या पराक्रमाचें वर्णन करावें. चंदभाटासारख्या पवित्र कीर्तीच्या पुरुषाचा अपमान करण्यास जयचंदाचें मन कधींहि धजणार नाहीं. शिवाय, त्या वेळीं भाटांच्या पवित्र देहास दुष्टबुद्धीनें स्पर्श करावयाचें तर राहोच, पण नुसता अपमानकारक शब्दहि उच्चारण्याची कोणाची मति होत नसे. भाटांचा मान सर्व लोकांत त्या वेळीं इतका होता.

चंदभाटाबरोबर पृथ्वीराजानें नोकराच्या वेषानें जावें व त्याच्याबरोबरच्या शंभर वीरांनींहि तशाच वेषानें आपलें स्वरूप झांकून बरोबर असावें, असा बेत ठरला. युक्ति पायाशुद्ध असून तिचा प्रयोगहि चांगला करण्यांत आला. आपला पक्का हाडवैरी जो जयचंद, त्याच्या खुद्द राजवाड्यांत त्यांनीं प्रवेश केला. किती अचाट साहस आणि केवढें भयंकर संकट! जयचंदास नुसता थोडा सुगावा लागता तर या सर्वांचीं शंभर वर्षे तेथल्यातेथें भरलीं असतीं!

कोठें उथळपणानें आलेला खळखळाट, तर कोठें उंचावरून एकदम खालीं पडणाऱ्या पाण्याचा धोधो आवाज हीं जर नसतील, तर नदीच्या प्रवाहाचा मंदपणा कंटाळवाणा वाटतो. प्रेमसरितेची गोष्टहि

अशीच आहे. अति सुरम्य गुलाबाचें फूल, पण त्याच्या सभोंवतीं कांटे असतात ह्मणून तें सोडून देणारा रसज्ञ कोण असेल ? संयोगितेसभोंवती इतकीं दारुण संकटें होतीं, म्हणून पृथ्वीराजासारख्या बाणेदार वीरास ती विशेषच प्रिय वाटली व तिच्या प्राप्तीसाठीं जीव धोक्यांत घालणें ह्मणजे एक मोठ्या हौशीनें पराक्रम करणें, असेंच त्याला वाटलें.

दगडाच्या भिंती आणि लोखंडाचे पिंजरे खऱ्या प्रेमापुढें किती टिकणार ? जीव धोक्यांत घालून एकमेकांस भेटण्याची जेथें तीव्र इच्छा, तेथें हे प्रतिबंध कितीकसे आड येणार ? आधीं जयचंद ह्मणजे पृथ्वीराजाचा कट्टा शत्रु व तोहि अत्यंत प्रबळ. त्यांतहि, त्यानें केलेल्या अपमानाचें सुरेख उसनें फेडून पृथ्वीराजानें सुवर्णप्रतिमा उठवून नेली व त्याचा मान पुरता धुळीस मिळविला. ही गोष्ट जयचंदाच्या मनांत सारखी डंवचत होतीच. अशा खवळलेल्या बलाढ्य शत्रूच्या राजधानींत, नव्हे खुद्द त्याच्या राहत्या राजवाड्यांत, अगदीं बंदोबस्तानें रक्षिलेल्या बंदिखान्यापर्यंत या बहाद्दरानें मजल पोहोंचविली. तेथें सक्त पहाऱ्यावर असलेल्या दासीस वश करून पृथ्वीराजानें संयोगितेची मुलाखत तर करून घेतलीच. नंतर तिला तेथून उचलून आपल्या साथीदारांसहवर्तमान पृथ्वीराज नगराच्या बाहेर पडला; परंतु या वेळीं दैव पूर्वींइतकें त्याला अनुकूळ नव्हतें. लगेच त्याच्यामागें शत्रूचें मातबर सैन्य धावलें. पृथ्वीराज आणि त्याचे साथीदार योद्ध यांनीं मागल्या पायानें शत्रूशीं तोंड देत व खूब चलाखीनें तरवार चालवीत दिल्लीचा मार्ग धरला. असा घोर संग्राम करीत-करीत संयोगितेसह पृथ्वीराज दिल्लीस जाऊन पोहोंचला; परंतु या प्रसंगांत त्याच्याबरोबरचे बहुतेक सर्व लोक ठार झाले. चंदभाटानें ह्मटल्याप्रमाणें संयोगिता आणि सदैव अमर अशी कीर्ति दिल्लीपतीनें

मिळविली खरी, परंतु त्यांच्या प्राप्तीसाठीं दिल्लीचे हातपाय तुटून ती पंगू झाली !

पृथ्वीराजाचा हा अक्षम्य अपराध जयचंद थोडाच सहन करणार ! परंतु नाइलाजानें त्याला आपला सूड लांबणीवर टाकणें भाग पडलें. तथापि तो स्वस्थ राहिला नाहीं. आपल्या शत्रूचा निःपात करण्यासाठीं त्यानें आपल्या, देशाकडे आणि धर्माकडेहि पाहिलें नाहीं ! खासगी द्वेषानें अंध झालेल्या जयचंदास देशद्रोह दिसला नाहीं. क्रोधाच्या आधीन झालेल्या मनास धर्मद्रोहासारखें दारुण पातकहि उमजेना. त्यानें पृथ्वीराजाच्या शासनासाठीं गिझनीचा सुलतान जो शहाबुद्दीन त्याला विनंतिपूर्वक आमंत्रण केलें. "आपण साहाय्य करून हिंदुस्तानांतील मोठाले प्रांत तुमच्या हस्तगत करीन," असें आश्वासन जयचंदाकडून त्याला मिळालें. शहाबुदिनानें पूर्वी दोन वेळ हिंदुस्तानांत कायम ठाणें ठेवण्याचे प्रयत्न केले होते; परंतु त्यांत त्याचा पराजय होऊन त्याला मागें परत जावें लागलें होतें. आतां या खासगी द्वेषानें झालेल्या अंतर्भेदानें व जयचंदाच्या आश्वासनानें त्याला नवी उमेद आली व परस्परांच्या द्वेषाग्नींत सर्वांचीच आहुति घालून साऱ्या हिंदुस्तानांत मुसलमानी सत्ता स्थापन करण्याची बुद्धि त्याला झाली.

एका उकाड्याच्या दिवशीं संध्याकाळीं पृथ्वीराज अंतःपुरानजीकच्या बागेंत गार अशा ठिकाणीं आपल्या नवपरिणीत वधूसहवर्तमान बसून आराम घेत होता. सभोंवतीं संयोगितेच्या दासी उभ्या होत्या. त्या पृथ्वीराजाच्या शौर्यादि गुणांनीं वीररसोत्फुल्ल अशीं गाणीं एकमेकांच्या चढाओढीनें ह्मणत होत्या. तीं गाणीं त्यांच्याकडून मोठ्या प्रेमानें संयोगिता पुनःपुनः ह्मणवून घेत होती. तीं गाणीं जरी चंदभाटानें रचलेलीं होतीं असें लोक ह्मणत, तरी त्यांपैकीं बरींच संयोगितेनें स्वतः रचलेलीं

होतीं, असा पुष्कळांचा समज आहे. संयोगितेची पतीवर निस्सीम भक्ति असल्यामुळें आपलें आराध्यदैवत जो पृथ्वीराज त्याची स्तुति ऐकावी तितकी थोडी, असें तिला वाटे. पृथ्वीराजानें किती वेळ तरी "पुरे करा' ह्मणून तिच्या दासींची विनवणी करावी, परंतु आपल्या यजमानणीस त्या गाण्यांपासून आनंद होतो असें पाहून त्यांनीं त्याच्या विनवणी-कडे लक्ष्य दिलें नाहीं. उलट अत्यंत आल्हादानें मंजुळ सुरावर त्या दासी गाणीं ह्मणतच राहिल्या. याप्रमाणें आनंदांत संध्याकाळ होऊन रोहिणीपतिहि आपल्या आनंदरश्मींनीं त्यांचा उल्हास वाढवूं लागला. अशा आनंदभरांत असतांना पूर्वोक्त घातसंघाची बातमी पृथ्वीराजा-समोर दत्त ह्मणून उभी राहिली.

कोणत्याहि वीराचें अंतःकरण थरारून टाकणारी ही वार्ता होती! परंतु पृथ्वीराजाचें हृदय रणसंग्रामानें जसें प्रफुल्लित होई, तसें तें दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीनें होत नसल्यामुळें त्याला या वार्तेनें उलट दुप्पट उमेद आली. जितकें शत्रूचें बळ जास्ती, तितका पृथ्वीराजास हुरूप जास्ती येत असे व तितकें त्याचें अंतःकरण पराक्रमाविषयीं अधिक आतुर होत असे. ही वार्ता कानांवर पडतांच संयोगितेच्या शेजारीं बसलेल्या पृथ्वीराजानें उड्डाण करून भिंतीवर लटकत अस-लेल्या समशेरीस हात घातला. याप्रमाणें आपली समरपत्नी जी सम-शेर ती घट्ट हातीं धरून पृथ्वीराज मोठ्यानें गर्जून ह्मणाला " आतां गाणें बस करा! आमच्या पूर्वजांच्या पराक्रमवर्णनानें व त्यांच्या वीर-श्रीनें झणझणलेले पोवाडे आमच्या भाटांस ह्मणू द्या. म्लेच्छ रणांगणीं माझी वाट पाहत उभा आहे. शत्रूनें दाढीस हात घातल्यावर आतां प्रणय कसला? जिनें मला तुझी प्राप्ति करून दिली, ती ही माझी

समरपत्नी समशेर आणि मी उभयतां शत्रूचा नाश करण्यास आतांच निघालों पहा !"

गाणें तर बंद झालेंच; पण त्या दासीहि तेथून नाहींशा झाल्या. संयोगितेच्या तोंडांतून ब्रहि निघेना. वीरश्रीनें प्रफुल्लित झालेलें आपल्या पतीचें मुख न्याहाळून अत्यंत प्रेमानें आणि उल्हासानें तिनें आपले दोनहि हात पृथ्वीराजाच्या कंठासभोंवतीं ठेवून त्याला आलिंगन दिलें. तिच्या गालांवर अपूर्व टवटवी आली.नेत्र आनंदोत्साहानें चमकूं लागले.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं शहरदरवाज्यासमोरच्या पटांगणांत पृथ्वीराजाचें सर्व सैन्य लढाईच्या सर्व तयारीनें उभें राहिलें. राजाचा मित्र जो चितोरचा राणा समरसिंह, त्याची पृथ्वीराजाचे लोक उत्कंटेनें वाट पाहत होते. राजाचें थोरलें बादशाही निशाण हवेंत मोठ्या उल्हासान फडकूं लागलें. पृथ्वीराजास मात्र बाहेर पडण्यास उशीर लागला.

कां बरें राजास उशीर लागला ? अंतःपुरांत संयोगिता राणीचा निरोप घेण्यास पृथ्वीराज गेला असतां तिनें डोळ्यांत आसवें आणून राजास युद्धास जाऊं नये ह्मणून विनविलें. गेल्या रात्रीं राणी झोंपेंत असतां तिला भीतिकारक दृष्टांत झाला होता. तीन वेळ एक योगी पुरुष तिला स्वप्नांत गोचर होऊन तीन वेळ त्यानें भयंकर भविष्य कथन केलें. "मुसलमानांच्या तरवारीनें तुझ्या पतीला मृत्यु येईल," असें त्यानें प्रथम सांगितलें. दुसऱ्या वेळेस राजाला तिनें जेव्हां स्वप्नांत पाहिलें, तेव्हां तो रणांतून परत आला आहे व त्याचें सर्व चिलखत शत्रूच्या रक्तानें भरलेलें आहे, असा देखावा तिच्या दृष्टीस पडला व तो योगी पुनः प्रादुर्भूत होऊन "पहा, तुझा पति कसा विजयवैभवानें येत आहे!" असें ह्मणाला. तिसऱ्या वेळीं जो देखावा दिसला त्याच्या नुसत्या आठवणीनें तिला कांपरें भरलें. आपल्या प्राणपतीचे पाय

लोहशृंखलांनीं बद्ध केलेले आहेत व तो दूर देशीं कारागृहांत जखमांच्या द्वारें वाहत असलेल्या अशा आपल्याच रक्तांत लोळत पडला आहे. तितक्यांत एक काळस्वरूपी पुरुष येऊन "पहा, आतां याचें मरण अगदीं नजीक आलें," असें बोलून गुप्त झाला.

हीं तीन वेळ तीन प्रकारचीं स्वप्नें तिच्या स्मृतींत ताजीं असल्यामुळें तिनें थोडा वेळ आपल्या पतीस अडवून धरलें व त्याला लढाईस जाऊं नका ह्मणून सांगितलें, तरी तें क्षम्य आहे; "परंतु तूं शिपाई बहाद्दराची बायको आहेस!" असें सांगून पथ्वीराजानें जेव्हां तिला शुद्धीवर आणिलें, तेव्हां तिला आपल्या शीलाचें स्मरण झालें. "युद्धांत मी कांहीं हजार वेळ मरणार नाहीं! ईश्वरी योजना असेल त्याप्रमाणें मी एकदांच मरणार आहें. मग दुःख तें कशासाठीं करावें?" असें त्यानें सांगतांच तिनें आपले डोळे पुशिले.

"प्राणनाथ! आपण मला वीरपत्नीच्या कर्तव्याची आठवण करून दिलीत व मला चांगला बोध केलात. मी चुकत होतें, पण आतां समज आला. चला, जा आणि विजयी होऊन परत या आणि या दासीची सेवा घ्या!" असें ह्मणून तिनें त्याला निरोप दिला. तथापि जातेवेळीं ती आणखी ह्मणाली "जपा बरं! शत्रूवर तुटून पडतांना माझी आठवण होईल. मी नाहीं असंच समजा. रणांगणीं अनिष्ट तें काय होणार? देह पतन पावेल इतकंच. तुमच्या आत्म्याची व माझी ताटातूट होणं शक्य नाहीं. मीं आपणास ताबडतोब येऊन गांठीन. परत याल तर विजय आणि कीर्ति हीं घेऊन या; रिकामे येऊंच नका! आह्मां उभयतांचा जीव जर एक आहे, तर कोणाच्याहि मरणानं आह्मां दोघांचा वियोग होणार नाहीं!"

आपल्या प्रिय पत्नीचा तो सौन्दर्यसुरम्य आणि आवेशपूर्ण चेहरा पाहून पृथ्वीराजास मोठा अभिमान वाटला. "आतां बोलली ती वीरपत्नी खास ! या तुझ्या शब्दांनीं माझी रणश्री एकसारखी वृद्धिंगत होत जाईल. माझ्या मार्गांत जो कोणी येईल त्याची कशी धडगत लागते पाहीन ! " असें बोलून तो तसाच निघाला.

तिरोरीच्या मैदानावर दोनहि सैन्यें समोरासमोर आलीं. जयचंद आपल्या सैन्यानिशीं शहाबुद्दिनास मिळाला होता. अर्थात् एका बाजूस शहाबुद्दिन आणि जयचंद व दुसऱ्या बाजूस जयचंदाचा जांवई पृथ्वीराज, अशा या लढाईच्या रूपानें आमच्या हतभागी देशाचें दुर्दैव उभें राहिलें. लढाईस सुरुवात होतांच विशेष विलंब न लागतां जयचंदाची आणि पृथ्वीराजाची गांठ पडली. अनेक वेळ झालेल्या मानहानीच्या स्मृतीनें भयंकर त्वेष चढून जयचंदानें वाघासारखी पृथ्वीराजावर उडी घातली; परंतु सर्वस्वी क्रोधाच्या आधीन झाल्यामुळें जयचंदाचें युद्ध-चातुर्य या वेळीं त्याच्याजवळ राहिलें नाहीं. पहिल्याच झटापटींत तो घोड्यावरून खालीं आला. हातांतली तरवार खालीं पडली व शत्रूच्या हातांत त्याचें मरण अगदीं बिनतोड आलें; परंतु आपल्या प्रियपत्नीची आठवण होऊन पृथ्वीराजास दया आली व "राजा, ऊठ. तूं माझा दुष्मन खरा, पण माझ्या प्रियपत्नीचा तूं पिता असल्यामुळें तुला जीवदान देणें भाग पडत आहे," असें तो ह्मणाला.

याप्रमाणें जयचंदास उठवून पुढील समरांगण आक्रमण करतांना पृथ्वीराजाची दृष्टि शहाबुद्दिनाकडे वळली. आपल्या देशाचा आणि धर्माचा शत्रु समोर पाहतांच भारतीयुद्धांतील भीमाच्या भयंकर आवेशानें तो त्याच्यावर धावला. शहाबुद्दीनहि युद्धकलेंत त्याच्याच इतका निपुण असल्यामुळें दोघांचें युद्ध अत्यंत निकरानें चाललें होतें. शहा-

बुद्दिनाचें शारीरिक बळ जरा अधिकच होतें. तथापि अखेरीस पृथ्वीराजाच्या निर्वाणींच्या आघातानें तो जमिनीवर निश्चेष्ट पडला व आतां पृथ्वीराजाची पवित्र समशेर त्याला मोक्ष देणार, इतक्यांत शहाबुद्दिनाच्या सरदारांनीं आपल्या बादशहाच्या बचावासाठीं उड्या घालून ते त्याला तशा स्थितींत घेऊन गेले व पृथ्वीराजास जयश्रीची माळ पडली. शत्रूच्या सैन्याचा पुरा मोड झाला. दिल्लीपतीच्या सैन्यानें यवनांस अगदीं सीमेच्या पलीकडे खेंचीत नेलें; इकडे जयचंद तर नामोहरम होऊन कीर्ति आणि यश या दोहोंस अंतरला, व आपल्या देशांत पळून गेला.

पृथ्वीराज युद्धास गेल्यापासून संयोगिता जी बिछाना धरून राहिली होती, ती आपल्या पतीच्या जयाचें वर्तमान एकतांच तत्काल उठून उभी राहिली. तिनें मंगलस्नान केलें व वस्त्रेंभूषणें लेवून ती अगदीं नववधूप्रमाणें नटली. लगेच तिनें आपल्या दासींस आणि अंत:पुरांतल्या इतर स्त्रियांस बोलाविलें व त्यांच्यासहवर्तमान आपल्या विजयी पतीस समारंभानें नगरांत आणण्यासाठीं ती दिल्लीच्या बाहेर सामोरी गेली. तिला पाहतांच पृथ्वीराज आपल्या घोड्यावरून खालीं उतरला व तिला प्रेमानें आलिंगून " कां प्रिये, तुझ्या दृष्टांताचा शुभ असा जो भाग तो तर घडून आलाच ! " असें ह्मणाला.

" दैवानं खैर केली, त्याच्याच कृपेनं पुढील अनिष्ट भाग टळो ह्मणजे झाल ! " असें तिनें उत्तर दिलें.

परंतु जें भाळीं लिहिलेलें असतें तें चुकणार कसें ? शुभ दृष्टांताची प्रतीति आली, तशी अशुभाचीहि प्रतीति येण्यास विलंब लागला नाहीं. विजयोत्साहानें पृथ्वीराज लौकरच बेफाम झाला, जी चूक करूं नये ती त्यानें केली. आपल्या मानी शत्रूस क:पदार्थ असें

समजण्याइतका त्याचा मूर्खपणा झाला. आपले शत्रु सूड घेण्याच्या संधीची वाट पाहिल्याशिवाय राहाणार नाहींत, ही गोष्ट मनांत वागवून त्यानें जो बंदोबस्त ठेवावयाचा, तो ठेविला नाहीं. संयोगितेसह तो विलासांत पूर्णपणें निमग्न झाला. इकडे जयचंद आणि शहाबुद्दीन यांनीं दिल्लींतील नाचरंगाची बातमी ठेवून आपले लोक गोळा केले. समोर युद्धांत पृथ्वीराजावर आपणास जय मिळत नाहीं, तर तो व त्याचे लोक ऐषआरामांत बेसावध असतांना त्यांच्यावर हल्ला करावा व यश मिळवावें, असा त्यांनीं बेत केला. त्या दोघांनीं दोन बाजूंनीं हळुहळू चाल केली व एकेक ठाणें मोठ्या शिताफीनें हस्तगत करीत ते पुढे येऊं लागले. इकडे पृथ्वीराज सुखसागरांत निमग्न असल्यामुळें त्याच्या सरदारांपैकीं कोणासहि राजाला ही बातमी सांगण्याचें धाडस होईना. अखेरीस आतां धडगत नाहीं, राजाला ही वार्ता कळविलीच पाहिजे, असें चंदभाटास वाटून त्यानें राजास जागें करण्याचा निश्चय केला. चंदभाटाचा अधिकार मोठा असल्यामुळें त्याला हें काम करतां आलें. शत्रूची सरशी कशी होत आहे हें सांगून आश्चर्यचकित झालेल्या पृथ्वीराजास "राजा, तुझी पूर्वीची वीरश्री जर पुनः परत आली नाहीं, तर तुझा व तुझ्या राज्याचा अंतकाळ समीप आला आहे असें समज," असें त्यानें स्पष्ट सांगितलें.

त्या रात्रीं राजा झोंपेंत असतां त्याला अत्यंत भयसूचक असा एक दृष्टांत झाला. त्यानें दुसऱ्या दिवशीं सकाळींच ती हकीगत राणीस सांगितली. तो ह्मणाला "मी निद्रावश झालों असतां माझ्यासमोर रंभेप्रमाणें एक रूपवती स्त्री उभी असलेली मीं पाहिली. तिनें एकाएकीं माझा हात धरला. नंतर ती तुझ्या अंगावर धावली, व तिची आणि तुझी झटापट चालत असतां एक मोठा मत्त हत्ती आह्मां दोघांवर

चालून आला. मग काय? झोंप तर तेव्हांच नाहींशी झाली. इकडे-तिकडे पाहातों, तर रंभा नाहीं व हत्तीहि नाहीं. माझें काळीज धडधडूं लागलें व माझ्या मुखांतून हरहर असा ध्वनि आला."

'हर हर' या शब्दांनीं रजपूत लोकांत वीरश्रीची गर्जना होत असे, हें आमच्या वाचकांस सांगावयास नकोच.

हा स्वप्नवृत्तांत सांगत असतांना पृथ्वीराज मनांत खचल्यासारखा दिसला. राजाचें खिन्न वदन असें हें राणीनें आज प्रथमच पाहिल्यामुळें तिचें हृदय भीतीनें थरारलें. राजाची वीरश्री अशा प्रकारें गलित होण्यास आपणच कारण झालों, असें तिच्या मनांत येतांच तिनें स्वत:ला धिक्कारून घेतलें आणि पुढें येऊन ठाकलेल्या रणसंग्रामास त्याला उत्साह यावा म्हणून पृथ्वीराजास ती मोठ्या प्रेमानें म्हणाली "महाराज, स्वप्नामुळं आपलं मन इतकं उदास कां व्हावं बरं? मला तर या स्वप्नांत महाराजांचा विजय आणि वैभव यांशिवाय दुसरं कांहींच दिसत नाहीं. चव्हाण कुळांत आपण म्हणजे केवळ सूर्य आहां. आपल्या इतकं वैभव आणि सौख्य कोणाला तरी प्राप्त झालं आहे काय? जो जन्मास आला तो निश्चयेंकरून मरणारच. नवं वस्त्र जीर्ण होतं व जें जीर्ण झालं तें टाकून आपण नवं घेतों, त्यांतलाच प्रकार या नश्वर देहाचा आहे. आपलं कर्तव्य करून मरणं हें मुळीं मरणच नव्हे, तर मरणाला जिंकून अमर होणं होय. ज्यानं आपलं कर्तव्य उत्तम रीतीनं करून आपल्या इहलोकच्या यात्रेची सांगता केली, त्याला अमरत्व प्राप्त झालं, असं समजलं पाहिजे. तर मग या देहाचा विचार कशाला? समरांगणीं पराक्रम करण्यांतच या देहाचा खरा उपयोग असतो. तर खऱ्या अमरत्वाचा लोभ धरून

शत्रूंचा जूट आपण आपल्या समशेरीनं फोडावा. मी तर आपली जन्मोजन्मींची अर्धांगी आहें."

या अमृतासारख्या मधुर परंतु खऱ्या हितोपदेशानें भरलेल्या बाणेदार भाषणानें पृथ्वीराजाचा रणोत्साह वृद्धिंगत झाला. त्याच्या अंगांत नवी उमेद संचरली. आपल्या सरदारांचा विचार घेऊन सेनाधिपत्य त्यानें स्वतः पतकरलें. राणीचा निरोप घेण्यासाठीं जेव्हां तो राजमहालांत गेला, तेव्हां पुढील प्रसंगाविषयीं बोलतांना संयोगिता ह्मणाली "आह्मां स्त्रियांच्या विचारांस कोण विचारतो ? स्त्रिया ह्मणजे अर्ध्या अकलेच्या, हा समज सर्वांचा आहे. स्त्रियांच्या भाषणांत सत्य असलं तरी कोणी लक्ष्य देत नाहीं; परंतु स्त्रियांशिवाय जग तें काय आहे ? आह्मी शक्तिस्वरूपी असून साक्षात् रुद्राच्या आवेशानं भरलेल्या आहों. स्त्रिया जशा चोर तशा त्या चोरांनां वांचविणाऱ्याहि आहेत. आह्मी सर्व सद्गुणांचं माहेरघर तर दुर्गुणांलाहि आमचा चांगला आश्रय आहे. आह्मी ज्ञानी आहों तशा अज्ञानीहि आहों. आह्मी पापी आहों आणि शुद्धहि आहों. मोठा शहाणा ज्योतिर्विद असला तर त्याला ग्रहांच्या गति समजतील व त्यांच्यासंबंधाचें सर्व गणित त्याला पुस्तकांतरून करतां येईल; परंतु स्त्रीस्वभावाच्या पुस्तकांत त्याला काय समजणार आहे ? ही स्थिति आजचीच नव्हे, तर जगाच्या आरंभापासून ही अशीच आहे. तथापि आपलं अज्ञान झांकण्यासाठीं बायकांनां ज्ञान नसतं, असं पुरुष आजपर्यंत मोठ्या दिमाखानं सांगत आले आहेत. असं असेल तर केवढी आश्चर्याची गोष्ट पहा! तुमचे आनंद व तुमचीं दुःखं यांत आह्मांला सहभागीदार होतां येतं. एवढंच नव्हे, तर इहलोक सोडून परलोकास तुह्मीं प्रयाण केलंत तरी तुमचा व आमचा वियोग होत नाहीं. क्षुधा आणि तृष्णा यांच्यापासून होत

असलेले हाल तुमच्याबरोबर आह्मी मोठ्या आनंदानं काढतों. आह्मी बायका ह्मणजे सरोवर, व त्यांतले राजहंस ह्मटले ह्मणजे तुह्मी पुरुष. आमच्या हृदयांत जर तुह्मांला स्थान नसेल तर तुमची काय बरं स्थिति होईल !"

परंतु दुसऱ्या दिवशीं पहावें, तों जिच्या मुखांतून वरील अर्थपूर्ण वाणी निघाली ती संयोगिता अगदीं निराळी दिसली. तिचें आधल्या दिवसाचें तत्त्वज्ञान तिच्या मनांतून मागमुसासुद्धां साफ नाहींसें झाल्यासारखें झालें. पतिनिष्ठ स्त्रीचें प्रेम व चिंता तिच्या वर्तनांत पूर्ववत् दिसूं लागलीं. सैन्याची निघण्याची सर्व तयारी झाल्यावर "माझ्या प्राणेश्वरास आज युद्धार्थ शस्त्रांनीं सज्ज करण्याचं काम मी स्वतः करणार," असें तिनें सांगितलें; परंतु काय ! पृथ्वीराजाच्या अंगावर चिलखत चढवितांना संयोगितेचे हात लटलट कांपूं लागले. तिचे डोळे जे त्याच्या मुखाकडे लागले ते तेथून हालेनात. दारिद्र्यानें पिडलेल्या माणसास सोन्याचा तुकडा सांपडला असतां त्याच्याकडे जसें त्याचें सर्व लक्ष्य वेधून जातें, तसें तिला होऊन गेलें. ओकसाबोकशीं रडत व अश्रु ढाळीत तिनें तें काम कसेंबसें पुरें केलें. इतक्यांत बाहेर पडण्याची नौबत झाली. तिनें पृथ्वीराजास आपल्या हृदयाशीं घट्ट धरलें व कांहीं वेळानें प्रेम आणि शोक यांनीं भरून आलेल्या अंतःकरणानें तिनें त्याला निरोप दिला. रडतरडत ती ह्मणाली "महाराज, चला बरं ! आतां देव करो आणि जयश्रीची माळ आपल्या कंठीं पडो !" हे शब्द तिनें उच्चारले व पृथ्वीराज बाहेर जातांच ती आपल्या खोलींत धाडकन् निश्चेष्ट खालीं पडली.

कांहीं वेळानें सावध झाल्यावर "काय, महाराज गेले ? हो, गेलेच ते ! आतां त्यांची गांठ स्वर्गांतच ! या दिल्लीशहरांत कांहीं ते परत

माझ्या दृष्टीस पडणार नाहींत !" असें ती ह्मणाली, आणि तिचे हे शब्द ह्मणजे पुढें होणाऱ्या गोष्टीचें भविष्यकथनच होतें.

पृथ्वीराजानें रणांत अतर्क्य पराक्रम केला, त्याच्या बरोबरच्या सैन्यानें आपली शिकस्त केली; परंतु शत्रूचें सैन्य शंभरपट जास्त असल्यामुळें त्याचा सर्व पराक्रम वायां गेला. त्याच्या सैन्याचा पराजय झाला व तो स्वतः शत्रूच्या हातीं सांपडला. शहाबुद्दिनानें त्याला गिझनीस रवाना केलें. त्या ठिकाणीं अंधारकोठडींत मोठमोठ्या बिड्या त्याच्या पायांत ठोकून त्याला ठेवून दिलें होतें. तेथेंच लढाईंतील जखमांनीं खितपत पडला असतां त्याचा प्राण स्वर्गीं निघून गेला. याप्रमाणें इहलोकच्या सौख्यगिरीवर विहार करीत असतां राणीस जें दुष्ट स्वप्न पडलें तें अगदीं शब्दशः खरें झालें.

आपल्या वीर्यशाली प्रिय पतीवरच्या प्रसंगाची वार्ता कानीं पडतांच राजाच्या मृत्यूनें आपला वियोग होणार नाहीं असें ह्मणून संयोगितेनें अग्निकाष्ठें रचण्यास आज्ञा केली व आपला देह अग्नीला अर्पण करून तिनें पतिसंनिध स्वर्गलोकीं प्रयाण केलें.

शहाबुद्दिनाचा विजयी सरदार कुतुबुद्दिन यानें दिल्लींत प्रवेश करून त्या ठिकाणीं आपलें ठाणें कायम बसविलें. पुढें देशद्रोही जो जयचंद त्यानें आपणास केलेल्या मदतीचा विचार न करतां मुसलमानांनीं त्याच्यावरहि शस्त्र धरलें व थोडक्याच काळांत पृथ्वीराजासारखी त्याचीहि दशा करून टाकली. याप्रमाणें जयचंदाला कृतकर्माचें योग्य प्रायश्चित्त मिळालें !

# अर्गळची राणी.

हल्लीं जेथें अलाहाबाद शहर आहे त्याच्या नजीक अर्गळ हें पूर्वी एक प्रसिद्ध राजधानीचें शहर होतें. इसवी सन १२५० च्या सुमारास या अर्गळ शहरांत एक हिंदु राजा राज्य करीत होता. या राजानें दिल्लीच्या मुसलमान बादशहास खंडणी देण्याचें साफ नाकारलें. या धैर्यशील राजाचें नांव गौतम असून आजच्या चरित्राचा विषय ही त्याची राणी होय. या राणीच्या पूर्व वृत्तांताची माहिती उपलब्ध नाहीं. ज्या गोष्टीमुळें या पुण्यशील राणीची कीर्ति झाली, ती गोष्ट तिच्या विवाहानंतर घडून आली.

त्या वेळीं दिल्लीच्या तख्तावर सौंदर्यसंपन्न परंतु भाग्यहीन जी रझिया बेगम तिचा भाचा नासिरुद्दीन हा होता. या बादशहाच्या अंगांत बरीच योग्यता होती, तथापि त्याचा स्वभाव लहरी होता. तो नेहमीं दरवेशाच्या वृत्तीनें राहत असे. स्वतः हातानें ग्रंथ उतरून तो आपला खासगी खर्च बाहेर पाडी. त्याचें खाणेंपिणें अगदीं साधें असून तें त्याची राणीच स्वतः तयार करीत असे. राणीला चाकरमाणसांची मुळींच मदत नसे. हा पौर्वात्य बादशहा, परंतु याला राणी हीच एक स्त्री होती. तिच्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीच्या सहवासांत तो राहत नसे.

अर्गळचा राजा जो गौतम, त्याच्या उर्मटपणाची खबर बादशहास लागतांच त्यानें अयोध्येच्या सुभेदारास त्याच्यावर स्वारी करून राजाला चांगलीच शिक्षा करण्याचा हुकूम केला. सुभेदारानें बादशहाच्या हुकुमाप्रमाणें स्वारी केली, परंतु राजा गौतमापुढें त्याचा टिकाव

लागेना. युद्धांत दहा हजार बादशाही सैन्य मरून पडलें. उरलेल्या लोकांची दाणादाण उडाली. शत्रूचा याप्रमाणें पुरा मोड करून राजा गौतम आपल्या राजधानीस परत आला व मिळालेल्या जयानें आनंदित होऊन त्यानें मोठा उत्सव सुरू केला. या उत्सवांत जो मोठा भोजनसमारंभ झाला, त्याला सर्व सैन्य आणि नगरांतील इतर सर्व लोक यांस आमंत्रण केलें होतें.

प्राचीन काळीं ज्याच्या मनगटांत जोर असेल, त्याला आपले कोणतेहि हक्कसंबंध आपल्या ताब्यांत आणतां येत असत. कोणत्याहि राज्यावर आपल्या अंगांत सामर्थ्य असल्यास स्वारी करणें पूर्वींच्या काळीं शक्य होतें. बळजबरीनें मिळविलेलीं राज्यें तशाच बळजबरीनें, लुच्चेगिरीनें, अगर विषप्रयोगादि घातसाधनांनीं रक्षण केलीं जात होतीं. या काळीं चव्हाण, राठोड वगैरे रजपुतांच्या जाती एकमेकांशीं निकरानें झगडत, अगर दुसऱ्या जवळच्या राजांशीं तंटे उपस्थित करून त्यांचे प्रांत सर करीत. राजा गौतमाच्या पूर्वजांनीं या कडव्या लोकांशीं अनेक वेळां लढाया मारून त्यांनां पराजित केलें होतें. आपल्या घराण्याच्या या विमल यशास मुसलमानांशीं लढतांना अखेर परिणामीं डाग लागला नाहीं, इतकेंच नव्हे, तर आपली कीर्ति विशेष झाली, असें गौतम राजास वाटून त्याला फार आनंद झाला. आपले सरदार आणि आपलें सैन्य यांनीं तरवार चांगली गाजविलेली पाहून त्याला विशेष अभिमान वाटला.

नगरांतील उत्साह कित्येक दिवस चालूच होता. राणी आणि तिच्या दासी यांनां तर विशेषच आनंद झाला. राजाबरोबर युद्धांत विजय संपादून आलेल्या योद्ध्यांचा मानमरातब राखण्यांत स्वतः राणी पुष्कळ दक्षता ठेवीत होती. अशा रीतीनें हा विजयोत्साह पुरा झाला;

परंतु सुखदु:खाची परंपरा अगदीं निकट असते. रात्र संपून अरुणोदय झाला ह्मणजे उल्हास वाटतो, तथापि दिवस संपला कीं पुनः रात्र आहेच ! मधमाशांच्या पोळ्यांत मध असतो, परंतु माशीची तीक्ष्ण नांगीहि तेथेंच असते. गुलाबाचा सौरभ आणि सौंदर्य यांच्यासारखें आल्हादकारक काय बरें आहे ? परंतु तेथें कांटे असतातच.

एके दिवशीं आपल्या परिचारिकामंडळाच्या मध्यभागीं राणी बसली असतां तिची दृष्टि आकाशाकडे गेली. तेव्हां संध्याकाळची वेळ होऊन क्षितिजावर अमावास्येच्या दुसऱ्या दिवसाची बारीक चंद्रकळा सौभाग्यसुवासिनीच्या भालपट्टावरील कुंकुमरेषेसारखी भासमान झाली. या दिवशीं झालेल्या चंद्रदर्शनाचा परिणाम दुसऱ्या दिवशीं मध्यान्हकाळपर्यंत श्रीगंगेचें स्नान न केल्यास श्रेयस्कर होत नाहीं; स्नानविधि न उरकल्यास मुलेंबाळें, गुरेंढोरें इत्यादि गृहलक्ष्मीवर अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं, असा त्या वेळीं दृढ समज होता.

आजसुद्धां आमच्या लोकांत धर्मभोळेपणा फार आहे. ज्या वेळचा वृत्तांत आम्ही लिहीत आहों, त्या काळीं तर या धर्मभोळेपणाचा अंमल फारच होता. चंद्रकलेचें दर्शन होतांच राणी आणि तिच्या दासी यांच्या हृदयांत भीतीचा संचार झाला. या वेळीं जर आपणास गंगेचें स्नान घडलें नाहीं तर राज्यावर कोणतें अरिष्ट ओढवेल कोण जाणे, असें त्यांना वाटलें. दुर्दैवानें गंगेच्या कांठचा प्रदेश त्या वेळीं शत्रूच्या ताब्यांत असल्यामुळें मार्गांत घोर संकटें दिसूं लागलीं.

उत्सवाच्या गडबडींत ही गोष्ट राजाजवळ काढणें शक्यच नव्हतें. कदाचित् त्याला ही अडचण सांगितल्यास गंगेच्या कांठचा प्रदेश शत्रूच्या ताब्यांतून मोकळा होईपर्यंत स्नानादि हव्यकव्याचा बेत महिनाभर तरी तहकूब ठेवण्याची आज्ञा होईल, असा संभव होता. त्या धर्मनिष्ठ

राणीनें हा सर्व विचार मनांत आणून गुप्तपणें गंगास्नानास जाण्याचा आपला बेत ठरविला. भोजनसमारंभाची गडबड रात्रीं होईल, त्या गडबडींत दासीसहवर्तमान राजवाड्यांतून आपण बाहेर निसटावें; थोड्या मैलांच्या अंतरावर बक्सारचा घांट होता तेथें सख्यांसह पहांटेपर्यंत पोंचून स्नान उरकून घ्यावें आणि पाठच्या पावलीं परत येऊन सकाळीं दोन घटका दिवसाच्या आंत परत नगरांत येऊन दाखल व्हावें, असा तिनें मनाशीं निश्चय केला.

चंद्राचा अस्त झाला. विरही स्त्रियांप्रमाणें आकाशांतील तारका क्षीणतेज दिसूं लागल्या, अशा वेळीं पूर्वसंकेताप्रमाणें, अगळची राणी आपल्या दासींसह राजवाड्यांतून गुप्त दरवाज्यानें बाहेर पडली. त्यांच्याबरोबर लष्करी लवाजमा बिलकूल नव्हता. आपलें कडकडीत व्रत यांतच त्यांचें सर्व सामर्थ्य एकवटलें होतें. त्यांच्या मनास भीतिच वाटली नव्हती. राजवाड्यांत भोजनाचा समारंभ मोठ्या उत्साहानें चालला असतां राणीसुद्धां सर्वजणी एकेकट्या बाहेरच्या पटांगणांत एकमेकींस मिळाल्या. जवळच सूर्यनारायणाचें देऊळ होतें. त्याच्या पलीकडे तलाव व त्याच्या जवळ हिरवेंगार क्रीडाभुवन होतें. अगदीं गुपचूप, यत्किंचित्‌हि आवाज न होऊं देतां, त्या सर्वजणी तडक पार झाल्या. रानांतून, दऱ्यांतून, घरांच्या बाजूनें आणि मार्गांतील खेड्यांतून त्या तशा रात्रीच्या काळोखांतून चालत्या होत्या. पहाट होऊन सूर्यप्रकाशानें सृष्टिसुंदरीवरचें तिमिरावगुंठन एकीकडे सारून पुण्यसलिला भागीरथीचें सुरम्य पात्र त्यांच्या दृष्टिपथांत आणून सोडलें. गंगेच्या पुण्यदर्शनानें त्यांच्या मनास कितीतरी आल्हाद वाटला.

बालार्काच्या आरक्त किरणांनीं बनलेल्या सूक्ष्म रक्त वस्त्रांतून चकाकणारा तो जान्हवीचा श्वेत प्रवाह फारच मनोहर दिसूं लागला

त्या वेळचें तें गंगेचें दिव्य स्वरूप पाहून त्यांचें प्रेम आणि भक्ति हीं शतपट वृद्धिंगत झालीं. युगींयुगीं जिचें यश सर्व साधुसंतांनीं गाइलें, हालाहलासारखा अत्यंत दाहकारी असा साऱ्या जगाचा पापसंचय नित्यशः आपल्या उदरांत ठेवून कोट्यवधि पापी लोकांस जी स्वर्गमार्ग सोपा करून देते अशी सर्व सरितांची आदिमाता पुण्यसलिला जी गंगा तिचें माहात्म्य किती वर्णावें ? प्रातःकाळीं नियमानें स्नान करणाराच्या मुखांतून चाललेल्या स्तुतिपाठाचा पुण्यघोष त्यांच्या कानांवर येऊन त्या सर्वांचें औत्सुक्य जास्तच वाढलें आणि त्वरेनें पावलें टाकीत बक्सार घाटावर अगदीं तटासमीप येऊन त्या सर्वजणी उभ्या राहिल्या. पाहतात तों घाटाची शोभा केवळ अतर्क्य अशी त्यांस वाटली.

तो विस्तृत घाट लांबच लांब गेलेला होता. पोळ्यांत ज्याप्रमाणें मधमाशांचा जमाव दिसून येतो, त्याप्रमाणें घाटावर गंगाभक्तांची गर्दी दिसत होती. कोणांचीं स्नानें आणि संध्यावंदनादि विधि आटपून ते पायऱ्या चढत वर येत होते; कोणी स्नान करण्यासाठीं त्वरेनें पायऱ्या उतरत गर्दीतून पुढें जात होते; कोणी अक्षमालेतील मणि ओढित जप करीत बसले आहेत; कोणी सूर्यास अर्घ्यें देत आहेत; कोणी डोळे मिटून जप करीत आहेत; कोणी प्रवाहांत उभे राहून गंगेचें स्तवन करीत आहेत; कोणी आकाशमंडळाकडे दृष्टि लावून प्रार्थना करीत आहेत तर कोणी आपल्या कोमल करांनीं आपली जननी जी पूर्वदिशा तिच्या कंठास आलिंगन देणाऱ्या बालसूर्याला वंदन करीत आहेत. अशा त्या घांटाची अपूर्व शोभा कांहीं वेळ पाहून राणीनें आपले जोडे आणि अंगावरचे अलंकार दासींच्या स्वाधीन केले आणि स्नानासाठीं ती पायऱ्या उतरली. पापांचें क्षालन करण्या-

साठीं आणि अनिष्ट निवारण्यासाठीं शुद्ध भक्तीनें तिनें गंगेंत बुडी मारली. आपल्या दासींसहवर्तमान सर्व पूजाअर्चा विधिपूर्वक झाल्यावर तिचें हृदय आनंदानें भरून गेलें.

येथपर्यंत सर्व कांहीं यथास्थित घडून आलें, परंतु अर्गळच्या राणीसारखी सौंदर्यसंपन्न स्त्री आपल्या साहजिक तेजानें कोणाच्या तरी लक्ष्यांत आल्याशिवाय राहणें मुळीं शक्यच नव्हतें. तिच्यासंबधानें यात्रेकरू लोकांत चाललेली विचारपूस जातांजातां जवळच तळ देऊन असलेल्या सुभेदाराच्या कानांवर गेली. खानानें गंगेवरून आलेल्या लोकांस तिच्या खाणाखुणा विचारल्या. परंतु तपास लागेना असें जेव्हां त्यानें पाहिलें, तेव्हां त्यानें आपल्या मुलींस घाटावर पाठविलें. त्या तरुणींनीं राणीजवळ सहज रीतीनें विचारपूस करून ही अर्गळची राणी आहे, दुसरी कोणी नव्हे, अशी आपली खातरी केली आणि त्या आपल्या बापाच्या गोटांत त्वरेनें चालत्या झाल्या.

आतां आपणास सूड घेण्याची चांगली संधि आली, असें पाहून सुभेदारास फार आनंद झाला. त्याच्या सूड घेण्याच्या इच्छेंत आणखी कामेच्छेचीहि भर पडल्यामुळें त्यानें मुळींच विलंब न करतां, घाट सोडून बाहेर येतांच राणीला वेढून कैद करण्याचा आपल्या लोकांस हुकूम केला.

पुढें येऊन वाट पहात असलेल्या प्रसंगाचें भान मुळींच नसल्यामुळें राणी राजधानीच्या रस्त्याला त्वरेनें लागली. थोडासा मार्ग आक्रमिल्यावर पुढचा रस्ता अडविला गेल्याचें व त्या ठिकाणीं शत्रूचे लोक गोळा होत असल्याचें तिनें पाहिलें. ती सभोंवार पाहूं लागली तों शत्रूचे लोक जिकडेतिकडे दिसले. इतक्यांत अंमलदाराच्यासारख्या आवाजानें उच्चारलेले पुढील शब्द तिच्या कानीं पडले. "पकडा,

अर्गळच्या राणीला पकडा. ती आतां आमची बंदिवान आहे. आपली हिरावलेली अब्रू परत मिळवावयाची असेल, तर राणीला पकडा. मानी अर्गळाधिपतीनें आपले शेंकडों तरुण मुलगे ठार केले आहेत, सबब त्याच्या राणीस कैद करून आपण चांगला वचपा काढून घेऊं."

हे शब्द ऐकतांच राणी बिकट प्रसंगांत पडल्यासारखी झाली, परंतु तिनें धैर्य सोडलें नाहीं. आपल्या वर्तनानें खरी वीरपत्नी कशी असते तें तिनें दाखविलें. तिचें हृदय भीतीनें कंपित झालें, तरी तिनें डोळ्यांतून एकहि अश्रुबिंदु टाकिला नाहीं. शत्रु जवळ येत आहे असें पहातांच ती त्याच्यावर आपल्या नेत्रांतून केवळ अग्नीचा वर्षाव करूं लागली. जणूं काय धैर्यगिरीवरच ती उभी राहिली आहे, अशा स्थिरपणानें बाजूस आपल्या दासींस घेऊन, महिषासुरावर जशी कात्यायनीनें हृदयभेद करणारी क्रुद्ध दृष्टि केली, तशा क्रोध आणि तिरस्कार यांनीं उग्र झालेल्या मुद्रेनें तिनें अयोध्येच्या मुसलमान सुभेदाराकडे पाहिलें. हृदय फोडून जाणाऱ्या बाणासारखें एकेक धिक्कारवचन तिच्या मुखांतून बाहेर पडलें. राणी आवेशानें ह्मणाली "शौर्यसागर अर्गलाधिप जो माझा पति, त्याच्यापुढून पळ काढून इथं आम्हां बायकांशीं लढण्याइतका नीचपणा आचरणारे तुह्मी नामर्द आणि बेशरम लोक माझ्यासमोर आलां आहां काय ? धिक्कार—धिक्कार असो तुमच्या पौरुषाला आणि शिपाईबाण्याला !!! "

असें ह्मणून तत्काळ जवळच असलेल्या उंच खडकावर ती उभी राहिली. तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसणरा निश्चय, अभिमान आणि आवेश हीं पाहून शत्रूचे लोक कचरले. राणी पुढें ह्मणाली "माझा पति रजपूत राजकुळांतला महाप्रतापी गौतम आणि मी त्याची राणी आहें.

तिच्या भोळ्या अंतःकरणांत ऐहिक वैभवाच्या लोभाचें बीज पेरलें. या बीजापासून उत्पन्न झालेल्या वृक्षास वृथा प्रौढीचीं कडू फळें येऊन प्रीतलेला आपल्या शेतकरीवर्गाची स्थिति अत्यंत तुच्छ वाटूं लागली. आपलें सर्व आयुष्य अशा कंगाल स्थितींत काढणें तिला इष्ट वाटेना. आपली सौन्दर्यलतिका अशा प्रकारच्या दारिद्र्यकर्दमांत राहूं दिल्यानें आपणास सौख्याचा लेशहि मिळणार नाहीं, असें तिला वाटूं लागलें.

हा ब्राह्मण जवळच असलेल्या एका देवळाचा पुजारी होता. हा नुकतीच काशीयात्रा करून आल्यामुळें उत्तर हिंदुस्तानांतील हिंदु राजेरजवाड्यांविषयींच्या पुष्कळ गोष्टी त्यानें ऐकिल्याहि होत्या व पाहिल्याहि होत्या मोठमोठे राजे, राण्या, राजपुत्र आणि राजकन्या यांच्या सुखोपभोगांचें आणि वैभवाचें हुबेहुब चित्र त्यानें प्रीतलेसमोर वठवून दिलें. राजवाडे, महाल, क्रीडाभुवनें, उद्यानभूमिका, दासदासी, हत्तीघोडे इत्यादिकांच्या वर्णनानें त्या भोळ्या मुलीचें डोकें अगदीं फिरून गेलें, विचारास जागाच राहिली नाहीं. "अशा एखाद्या राजपुत्राची तुझ्या या रंभेसारख्या सौन्दर्यावर एकदा नजर पडली पुरे, मग उशीर तो काय? एका क्षणांत या तुझ्या खेडवळ हीन स्थितीचा लोप होऊन तूं श्रेष्ठ वैभवाच्या प्रकाशांत नुसती चकाकत राहशील! तुझ्यासारख्या सौन्दर्याच्या तरुणीस कोणतें वैभव अशक्य आहे?" ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून प्रीतला आपली स्थिति पुरतेपणीं विसरली.

त्या ब्राह्मणानें प्रीतलेला नृत्यगायनाचेंहि थोडेंबहुत शिक्षण दिलें. तो आधीं देवाचा पुजारी; त्यांत काशीयात्रेस जाऊन अनेक वेळां गंगेंत स्नान करून शरीर शुद्ध करून आला होता. परंतु बिचाऱ्याचें मन पूर्वीसारखेंच कोरडें ठणठणीत राहिल्यामुळें त्याचा लोभ व

वार लागून तो ठार झाला; परंतु अभयचंदानें आपल्या शिल्लक राहिलेल्या थोडक्या लोकांचा जूट पूर्वीसारखाच अभेद्य राखला व राणीच्या सुरक्षितपणाकडे आपलें सर्व लक्ष्य ठेविलें. इतक्यांत या प्रसंगाची राजाला बातमी पोहोंचून तोहि कांहीं स्वार बरोबर घेऊन अभयचंदाच्या मदतीस धावून आला. ही मदत अगदीं वेळीं झाली. राजाला पाहातांच शत्रूच्या लोकांनीं पळ काढला. राणीला सुखरूप पाहून राजास इतका आनंद झाला, कीं, पुरता मोड झालेल्या शत्रूचा पुढें आणखी पाठलाग करण्याचें त्यानें मनावर घेतलें नाहीं.

रस्त्यावर राजाची आणि राणीची गांठ पडली तेव्हांचा प्रसंग तर खरोखरच अपूर्व होता!!! सर्व गोष्टींचा उलगडा होऊन सर्वांनीं शूर अभयचंदाचे पुष्कळ आभार मानिले. निर्भयचंदाच्या मरणानें सर्वांस जरी दुःख झालें होतें, तरी राणीच्या रक्षणामुळें जिकडेतिकडे आनंदच झाला. एक परीनें आनंद आणि दुसऱ्या परीनें शोक, अशा मनाच्या स्थितींत सर्व मंडळी राजधानींत येऊन पोहोंचली. त्यांच्या भेटीनें सर्वांनां आनंद झाला. राणीच्या शौर्याबद्दल आणि सुटकेबद्दल एका डोळ्यांतून आनंदाश्रु तर निर्भयचंदाविषयींच्या शोकानें दुसऱ्या डोळ्यांतून दुःखाश्रु अशी स्थिति सर्व नागरिकांची झाली. ज्या राणीच्या निःस्सीम भक्तीनें आणि जाज्वल्य तेजानें एवढ्या थोड्या रजपूत शिपायांच्या अंगांत सर्व जगास दिपवून टाकण्यासारखी रणश्रीची ज्योत प्रदीप्त केली, तिचा महिमा मनांत आणिला, ह्मणजे तशा स्त्रिया आमच्या देशांत उरल्या नाहींत असें ह्मणावें, किंवा ज्यांच्या अंगांत प्रखर पौरुष वास करतें असे पुरुषच उरले नाहींत असें ह्मणावें? काय ह्मणावें तें कळत नाहीं, एवढें खरें!

या गोष्टीस कांहीं दिवस लोटल्यावर, नुसती शाबासकी आणि स्तुति यांच्यापेक्षां विशेष रीतीनें अभयचंदाचा गौरव करणें योग्य आहे, असें राजास वाटून अभयचंद जरी जातीनें कमी दर्ज्याचा होता तरीहि राजानें त्याला आपली मुलगी विवाहविधिपूर्वक दिली. लग्नाच्या वेळीं गंगेच्या कांठचा आपल्या राज्यांतील सर्व प्रदेश राजानें अभयचंदास आंदण ह्मणून दिला. शिवाय, त्याला राव ही थोर पदवी देऊन राजानें आपणास अंशत: अनृणी करून घेतलें.

अभयचंद आणि निर्भयचंद या दोघां वीरांचे पराक्रम तेथील भाटांचे काव्यविषय झाले आहेत. तथापि राणीचें धैर्य आणि बाणेदार स्वभाव, यांची कीर्ति ज्याच्यात्याच्या मुखीं होऊन बसली आहे. आजहि अर्गळच्या राणीचें शौर्य खेड्यापाड्यांत लोक गात असतात. तिच्या गोष्टींनीं केव्हांहि झालें तरी लोकांच्या डोळ्यांतून अश्रु वाहतात व त्यांनां मोठा अभिमान वाटतो.

अयोध्येच्या मुसलमान सुभेदाराची तर दुर्दशा झाली. राणीवर आणलेल्या प्रसंगाची बातमी जेव्हां दिल्ली येथें बादशहास मिळाली, तेव्हां त्याला फार राग आला व सुभेदाराच्या या नामर्दपणाच्या वर्तनाबद्दल त्यानें त्याचा धिक्कार केला. पुढें हा सुभेदार बरींच वर्षे जगला, परंतु एवढ्या मोठ्या कुळांतील थोर स्त्रीवर त्यानें शस्त्र धरल्याबद्दल तो अगदीं मरावयास टेंकेपर्यंत सर्व लोक त्याची निर्भर्त्सना करीत होते.

---

## चितोरची पद्मिनी.

मेवाडच्या हिंदु राज्याचा अधिकार इसवी सन १२७५ त लखमसिंगाकडे आला. या मेवाड प्रांताची राजधानी चितोर शहर असून

हिंदुस्तानच्या सर्व कलाकौशल्याविषयीं त्याची त्या वेळीं फार ख्याति होती.

लखमसिंग लहान असल्यामुळें राज्याचा सर्व कारभार त्याचा चुलता भीमसिंग हा पाहत असे. भीमसिंग मोठा कर्ता पुरुष असून शूरहि तसाच होता. तो फार इमानी असल्यामुळें आपल्या पुतण्याच्या हितास तत्परतेनें नेहमीं जपत असे. राजा अज्ञान असतां राज्यांत अंदाधुंदी होऊन परक्यांचा हात आंत शिरणें हा बहुतेक नेहमींचाच अनुभव आमच्या देशाच्या इतिहासांत नमूद केलेला आढळतो. तथापि भीमसिंगाची कारकीर्द ही त्यांत अपवादादाखल होती, असें ह्मटल्यास चालेल.

प्रस्तुत चरित्राचा विषय, जिचें जीवनवृत्त अत्यंत आश्चर्यमय असून अत्यंत शोकपरिणामी झालें, अशी चितोरची पद्मिनी होय. पद्मिनी ही राणा भीमसिंग याची पत्नी होती. सिलोन ऊर्फ लंका या द्वीपांतील हमीरसंक हा तिचा पिता असल्यामुळें तिचें बालपण तेथील रम्य प्रदेशांत गेलें. पद्मिनीचें बालपण आणि पूर्व यौवन यांविषयींची हकीगत इतिहासांत मिळत नाहीं. लग्नानंतरच्या काळाचा इतिहासाशीं संबंध असल्यामुळें त्यापुढची हकीगत बरीच उपलब्ध आहे. पद्मिनीच्या नुसत्या नांवावरूनच तिच्या सौंदर्याची कल्पना होते. जी स्त्री सुंदरांत सुंदर असेल, तिलाच पद्मिनी ही थोर पदवी मिळत असे. जसें बाह्यसौंदर्य तसेंच या प्रख्यात स्त्रीचें अंतरंगहि अत्यंत रुचिर होतें. पिढ्यान्‌पिढ्या हिचें अनुपम लावण्य हिंदी भाटांच्या काव्यरसाचा परिपोष करीत आहे.

कित्येक वेळीं असें घडतें, कीं, चांगल्या गुणांमुळें गुणी जनांवर मोठमोठे प्रसंग ओढवतात. पद्मिनीच्या सौंदर्याची हकीगत अशीच

झाली. तिच्या अनुपम लावण्याची कीर्ति सर्वांच्या मुखीं असल्यामुळें ती त्या वेळचा दिल्लीपति अल्लाउद्दीन याच्याहि कानांवर जाऊन त्याचा परिणाम तिला, तिचा पति राणा भीमसिंग याला व तिच्या इतर आप्तजनांला फारच भोंवला. या चितोरच्या सुंदरीचा महिमा ऐकून अल्लाउद्दिनाचें मन अस्वस्थ झालें व हें स्त्रीरत्न आपल्या हस्तगत केव्हां होईल, असें त्याला होऊन गेलें. त्याच्या जनानखान्यांत कमलादेवीसारखी रूपवती हिंदु स्त्री होतीच; परंतु अशा एका रत्नानें त्याची तृप्ति न होतां दुसरी हिंदु स्त्री मिळविण्याची त्याला अनिवार इच्छा झाली व त्यांत पद्मिनीची कीर्ति ऐकून तर त्याला वाटलें, कीं, ही कमलादेवीपेक्षांहि सरस निघेल. मग काय विचारावें? तो अहर्निश तिच्या प्राप्तीच्या उद्योगास लागला.

एकदा मनाचा निश्चय झाल्यावर तत्वाचें कारण शोधण्यास फार वेळ लागला नाहीं. अल्लाउद्दिनासारख्याची इच्छा असली ह्मणजे मुख्य कारण तेंच. त्या वेळीं रजपूत राजे आणि मुसलमान बादशहा यांच्यामध्यें चुरशीस नेहमींच हवी तितकी जागा असे. त्यांत आणखी पद्मिनीविषयींचा लोभ असल्यामुळें तर रजपुतांशीं लढाई सुरू करण्यास बादशहा तेव्हांच तयार झाला. चितोर शहरावर त्यानें एकदम सैन्य पाठविलें. थोडक्याच दिवसांत मजल दर मजल करीत चितोर शहराचा तट आणि भक्कम किल्ला यांच्या समीप बादशाही फौज येऊन थडकली व एकदम शहरास वेढा पडला; परंतु भीमसिंग आणि त्याचे शूर योद्धे यांनीं तें शहर बाहेरून तसेंच आंतून अगदीं अभेद्य केलें होतें. अल्लाउद्दीन यानें पुष्कळ वेळ शिकस्तीचे हल्ले चढविले, परंतु शहरावर कांहींच परिणाम होईना. हें पाहून इतक्या उत्सुकतेनें आरंभिलेलें कार्य शेवटीं सोडून देण्याचें त्याच्या मनांत आलें; परंतु त्याच्या सरदारांनीं निराळा बेत सुचविला. हल्ला

करून शहर हातांत येत नाहीं तर कांहीं तरी लबाडीची युक्ति योजून आपलें कार्य करून घ्यावें, असें त्यांचें मत पडलें. हा विचार बादशहासहि पसंत पडल्यावर त्यांनीं एक युक्ति योजिली. या सर्व खटपटीचें कारण जी पद्मिनी, तिला नुसतें पाहण्याची संधि जुळवून आणल्यास बादशहा वेढा उठवून सैन्यानिशीं दिल्लीस परत जाईल, असा आशय निरोपाच्या द्वारें त्यांनीं भीमसिंगास कळविला. भीमसिंगानें ही बादशहाची विनंति मान्य केली; परंतु दोन अटी ठेविल्या. एक तर बादशहानें शहरांत येतांना आपल्या बरोबर अगदीं थोडे लोक आणावे; दुसरें, पद्मिनीचें रूप आरशांतच तेवढें पाहावयास मिळेल, तिचें प्रत्यक्ष दर्शन होणार नाहीं. परंतु बादशहाचा मनांतील उद्देश हा होता, कीं, पाहण्याची संधि मिळतांच पद्मिनीला ताबडतोब तशीच आपल्या गोटांत उचलून न्यावी; परंतु भीमसिंगाच्या या दोन अटींमुळें अर्थात्च तो उद्देश साधण्यासारखा नव्हता. तथापि त्या अटी मान्य करतांना त्याला दुसरीच एक युक्ति सुचली, व ती पहिलीच्याहिपेक्षां अधिक नीचपणाची होती !

अखेरीस हा योग जमून आला. एप्रिल महिन्यांत निरभ्र अशा एका दिवशीं सर्व शहर सूर्यप्रकाशानें चकाकित झालें असतां बादशहानें नगरप्रवेश केला, आणि तो भीमसिंगाच्या महालांत गेला. तेथें पूर्वींच व्यवस्थेनें रचना केलेल्या आरशांत पद्मिनी राणीच्या दिव्य रूपसंपत्तीचें प्रतिबिंब त्यानें दोन घटका चांगलें न्याहाळून पाहिलें. अर्थात्, मुसलमान बादशहास या सर्व प्रकारानें जरी पुष्कळ आनंद झाला, तरी मानी हिंदु सरदारांस व इतर लोकांस आपली अब्रू गेल्यासारखें वाटलें. त्यांनां आपल्या स्त्रियांच्या अब्रूपलीकडे कोणत्याहि ऐहिक गोष्टींचें महत्त्व वाटत नव्हतें. आपल्या राण्याच्या पत्नीचें विमल

स्वरूप, मग तें प्रतिबिंबद्वारें कां होईना, म्लेंच्छानें न्याहाळून पहावें, या गोष्टीची रजपूत वीरांस अतिशय चीड आली. क्रोधानें ते सर्व संतप्त झाले. परंतु एवढ्यानें बादशाही सैन्य वेढा उठवून जाईल व नागरिक लोकांचे हाल चुकतील, या भरंवशानें ते तेवढ्यापुरते स्तब्ध राहिले.

ही भेट झाल्यावर बादशहा परत जाण्यास निघाला. थोडक्याशा लोकांनिशीं चितोर शहरांत अल्लाउद्दिनासारख्या शत्रूनें प्रवेश करणें ह्मणजे क्रुद्ध झालेल्या सिंहाच्या जबड्यांत जाणूनबुजून शिरण्यासारखें होतें. तथापि रजपूत लोक आपलें सत्यवचन कधींहि मोडणारे नाहींत, हा भरंवसा बादशहास असल्यामुळें त्याला त्याविषयीं यत्किंचित्‌हि दिक्कत वाटली नाहीं. रजपूतांच्या खऱ्या स्वभावाची जशी अल्ला-उद्दिनास पारख होती, तशी आपला खरेपणा त्यांच्या अनुभवास येईल असें वर्तन ठेवण्याची मात्र त्याची इच्छा नव्हती. भीमसिंगाच्या खऱ्या स्वभावाचा आणि उमद्या बाण्याचा फायदा घेऊन त्याची फेड अत्यंत नीचपणानें करतांना त्याला यत्किंचित्‌हि भीति वाटली नाहीं. जातांना भीमसिंगाकडे वळून "राणासाहेब, माझ्याबरोबर किल्ल्याच्या खालीं या, मग तेथें स्नेहभावानें एकमेकांचा निरोप घेऊन आपण आपा-पल्या ठिकाणीं जाऊं," असें अल्लाउद्दीन म्हणाला.

भरंवसा ठेवण्यास मागें पहाण्याइतका आपण अनुदारपणा करणें बरें नव्हे, असें दिलदार भीमसिंगास वाटून त्यानें ती गोष्ट मान्य केली. अल्लाउद्दिनानें मात्र अत्यंत नीचपणाचा विश्वासघात केला. शहरांत जाण्याच्या पूर्वीं त्यानें आपल्या लोकांस किल्ल्याखालीं दबा धरून राहण्यास सांगितलें होतें. भीमसिंग बादशहाचा निरोप घेत असतांना

पूर्वसंकेतानुरूप त्यांनीं अकस्मात् छापा घातला व त्याला पकडून अल्ला-उद्दीन आपल्या छावणींत निघून गेला.

राणा पकडला गेल्याची बातमी शहरांत पसरली, तेव्हां सर्व शहर शोकाकुल झालें. त्यांतच बादशहाचा अपमानकारक निरोप जेव्हां समजला, तेव्हां तर त्याच्या सुटकेची कोणाला आशाच राहिली नाहीं! “ आपल्या ताब्यांत पद्मिनी आल्याशिवाय राण्याची सुटका होणार नाहीं !” असें बादशहानें चितोरच्या लोकांस कळविलें. या सर्व अनर्थास आपण कारण झालों, असें पद्मिनीस वाटून तिचें हृदय चिंतेनें करपून गेलें. तिच्या डोळ्यांतलें पाणी पार नाहींसें झालें. गालांवरची टवटवी साफ जाऊन ते सुकून गेले. चितोरशहरामध्यें आणि राजवाड्यांत एक आंठवडा मोठ्या दुःखांत आणि चिंतेंत गेला. आतां करावें काय, हा प्रश्न प्रत्येकापुढें उभा राहिला. पद्मिनीसारखी थोर, सुंदर स्त्री आपण होऊन बादशहास अर्पण करावी, हा विचार रजपूत ब्रीदाच्या पुरुषांच्या मनांत येणें संभवनीय नव्हतें. बरें, भीमसिंगास तसाच बादशहाच्या कैदेंत राहूं द्यावें तर तेंहि कठिण. त्याच्या अभावीं चितोरशहर, बालराजा लखमसिंग, फार काय, मेवाडचें सर्व राज्य सुरक्षित राहण्याचें लक्षण दिसत नव्हतें.

कडेलोटाच्या वेळीं पतिव्रता स्त्रियांची बुद्धि शाबूत असते. त्यांचें प्रेम आणि निर्धार यांच्यापुढें ऐहिक अडचणींचें सामर्थ्य फिकें पडतें, हा अनुभव वारंवार येतो. चितोरशहरावरचा प्रसंग आज तसाच होता. त्यांतून पार पडण्याची युक्ति पद्मिनीला सुचली. कपट कपटानेंच हाणून पाडण्याचा तिनें निर्धार केला. बादशहाचा इच्छाविषय जी पद्मिनी, ती त्याच्या स्वाधीन करण्याचा आपला निश्चय झालेला

आहे, असें सरदारांनीं त्याला सांगून पाठवावें, असें ठरलें; परंतु तिच्या थोर पदवीस साजेल अशा इतमामानें ती छावणींत येईल; यासाठीं तिच्याबरोबर जाणाऱ्या इतमामास मज्जाव होऊन तिचा अपमान होऊं नये अशी त्यांनीं बादशहास विनंती केली. राणीचा चुलता सरदार गोरासिंग यास हा निरोप बादशहास कळविण्यास व पुढची व्यवस्था करण्यास पाठविलें. त्यानें बादशहाची मुलाखत घेतली, तेव्हां बादशहा आनंदित होऊन ह्मणाला "तुह्मी त्वरेनें परत जा, व दिल्लीच्या भावी बादशाहिणीस शोभेइतक्या इतमामासह पद्मिनीस आमच्याकडे घेऊन या!"

"थोडेसे हत्यारबंद शिपाई तिच्याबरोबर असतील," असें गोरासिंगानें सुचविलें. यावर बादशहा ह्मणाला "छे, बिलकूल नको! शत्रूचे हत्यारबंद लोक आमच्या छावणींत येतां नयेत. हत्यारबंद लोक बरोबर आणण्यास आमची मनाई आहे. राणीची पडदपोशी आमच्या छावणींत उत्तम रीतीनें राखिली जाईल याविषयीं तुमची पक्की खातरी असूं दे. आमची अवज्ञा किंवा अपमान साऱ्या सैन्यांत कोणाकडूनहि होणार नाहीं हें पक्कें समजा."

नेमलेल्या दिवशीं पद्मिनीची दरबारी पालखी शहरांतून बाहेर पडली. गुप्त मसलतीबाहेरच्या लोकांस पद्मिनी बादशहाच्या छावणींत जात असल्याचें खरें वाटून अतिशय दुःख झालें. त्या पालखींत बिडलसिंग नांवाचा महा पराक्रमी तरुण सरदार शस्त्रांनिशीं तयारीनें बसविला होता. पद्मिनी आपल्या महालांतच होती. त्या पालखी बरोबर पुढें व मागें अशा दासींच्या ह्मणून सातशें पालख्या निघाल्या. दरएक पालखीस सहा शूर रजपूत शिपाई शस्त्रें लपवून भोयांच्या

वेषानें उचलण्यास लागले होते. याप्रमाणें पांच हजारांवर रजपूत योद्धे बादशहाच्या छावणीच्या अगदीं मध्यभागीं जाऊन पोहोंचले.

पालख्या जाऊन पोहोंचल्यावर गोरासिंग पुढें झाला व ठरावाप्रमाणें भीमसिंगाची सुटका करण्याविषयीं बादशहास सांगूं लागला; परंतु जरा हंसल्यासारखें करून अल्लाउद्दीन त्याला ह्मणाला " पद्मिनीचें माझ्याशीं लग्न होऊन ती माझी बायको झाली, ह्मणजे भीमसिंगास सोडून देऊं. तेथपर्यंत मी आपणास सोनें आणि जवाहीर देतों त्यानें आपली समजूत करून घ्या. "

हें भाषण ऐकतांच गोरासिंग यास फार राग आला; परंतु तो बाहेर न दाखवितां तो आर्जवानें ह्मणाला " शहा, आपल्या भावी यजमानाकडे पद्मिनीचा एक अर्ज आहे. आपल्या पतीची शेवटची मुलाखत होऊं द्यावी, अशी आमची विनंति आहे, तिचा अव्हेर होऊं नये." आणि त्याची ही विनंती बादशहानें मान्य केली.

बादशहाच्या खास तंबूजवळच एक तंबू पद्मिनीसाठीं तयार ठेवला होता, त्यांत पद्मिनीची पालखी उतरली. तेथें बादशहाच्या हुकुमावरून भीमसिंगास आणलें व भेटीस केवळ अर्ध्या तासाची मुदत दिली. तंबूच्या दरवाज्याजवळ अल्लाउद्दीन आतुर होऊन उभा होता. तो वरचेवर संतापानें पाय आपटीत होता. मुदत भरून गेली तरी भीमसिंग बाहेर येत नाहीं असें पाहून क्रोधानें त्याच्या अंगाची लाही झाली. त्याला पुढें दम निघेनासें होऊन तो एकदम आंत घुसला. पहातो, तों त्या ठिकाणीं पद्मिनी नसून भीमसिंग एका धिप्पाड योद्धयाबरोबर भाषण करीत आहे ! त्याबरोबर आश्चर्यानें आणि भीतीनें त्याची गाळण उडाली.

" अरे ! दगा दगा !" असें बादशहा ओरडतांच त्याचे शिपाई धाईनें आंत शिरले. लगेच " दुस्मान म्लेंच्छास ठार करा !" असा हुकूम भीमसिंगानें आपल्या लोकांस केला. हा हुकूम कानीं पडतांच तयारींत असलेल्या पांच हजार रजपूत वीरांनीं एकदम बादशहाच्या लोकांवर उड्या घातल्या. बिडलसिंगानें तर वाघासारखें उड्डाण करून बादशहाची गचांडी धरली व तरवारीनें त्याला मोक्ष देणार, इतक्यांत त्याचे विश्वासू शिपाई मध्यें पडून त्यांनीं आपले जीव खर्ची घातले व बादशहास मृत्यूच्या तोंडांतून शिकस्तीनें ओढून काढला. लगेच ही गडबड बाहेर पसरून मुसलमान हांहां ह्मणतां जमले व त्यांनीं रजपुतांवर जोराचा हल्ला केला. आपल्या राण्यासह परत जाणें इतकाच हेतु रजपूत लोकांचा असल्यामुळें त्यांनीं पाठच्या पायानें मुसलमानांचा हल्ला अंगावर घेतला. एक अति चपळ घोडा भीमसिंगासाठीं तयार ठेविला होता. त्याच्यावर स्वार होऊन त्यानें तत्क्षणीं चितोरची वाट धरिली व मागून शत्रूंचा हल्ला अंगावर घेतघेत मोठ्या धैर्यानें त्याचे लोक निघाले. ही निकराची लढाई थेट किल्ल्यानजीक पोहोंचेपर्यंत चालू होती. भीमसिंग शहरांत पोहोंचला व त्याच्या मागून पांच हजारांपैकीं फारच थोडे लोक परत गेले. चितोरच्या निवडक योद्ध्यांची याप्रमाणें हकीगत झाली. या लढाईंत गोरासिंगहि पडला.

गोरासिंगाच्या मृत्यूनें चितोरची पुष्कळ हानि झाली; परंतु राजाच्या संरक्षणासाठीं धारातीर्थीं त्यानें आपला देह अर्पण केल्यामुळें त्याचें जीवित सार्थकीं लागलें व त्याच्या योगानें त्याची अजरामर कीर्ति झाली. त्याच्या पत्नीनें पतिमरणाची वार्ता कानीं पडतांच चिता तयार केली. गोरासिंगाबरोबर अखेरपर्यंत बिडलसिंग होता. सतीसमारंभाच्या वेळीं तिच्याजवळ तो उभा होता.

" मुला, माझ्या नाथानं लढाइत कसं वर्तन केलं तें मला सांग बरं, " गोरासिंगाची पत्नी ह्मणाली.

त्या शूर कुमारानें उत्तर दिलें "माईसाहेब, मी त्यांच्या पावलास पाऊल टेंकून मागें एकसारखा रणांत फिरत होतों. त्यांच्या हातीं तरवारीच्या रूपानें साक्षात् रणदेवता आनंदानें नाचत होती. तिनें शत्रूचे किती बळी घेतले त्यांची संख्या मला करतां येत नाहीं. सर्व रणभूमीस शत्रूंच्या रक्तानें चिंब भिजवून एका धिप्पाड म्लेंच्छाचें कलेवर उशास घेऊन सभोंवार मारून पाडलेल्या असंख्य शत्रूंच्या मध्यभागीं ते सुखनिद्रेंत आराम घेत आहेत. "

" त्यांनीं कसा पराक्रम केला तो मला पुनः सांग व माझं कर्णद्वय आणखी एकदा पुनीत कर पाहूं !" तिनें आनंदभरांत बिडलसिंगाला पुनः प्रश्न केला.

"माई, आणखी काय सांगूं? मीच काय तो एकटा त्यांच्याबरोबर होतों. त्यांच्या शौर्याच्या आवेशानें जे भ्याले व त्यांचा तो आवेश पाहून ज्यांनां सानंदाश्चर्य वाटलें ते सारे हा लोक सोडून गेले. राहिलों काय तो मीच एकटा ! "

हें त्याचें उत्तर ऐकतांच गोरासिंगाच्या पत्नीच्या मुखावर सानंद स्मिताचा रम्य प्रकाश दिसला. "महाराज, मला निघण्यास वेळ लागतो, नव्हे ? आपणास राग आला असेल, नाहीं ? ही पहा मी आल्यें !" असें ह्मणत अग्निमुखांत तिनें तत्काळ उडी टाकिली.

इतके योद्धे मरण पावले, त्यांतहि आपला शूर चुलता गोरासिंग मृत्युमुखीं पडला, ह्या गोष्टीनें पद्मिनीस फार दुःख झालें. तथापि नगराचा प्राणरक्षक आणि आपला प्राणपति जो भीमसिंग तो सुखरूप परत आलेला पाहून तिला त्या दुःखांतहि विशेष आनंद वाटला.

परंतु शत्रु नगराच्या बाहेर असल्यामुळें एकमेकांचे मनापासून आभार मानण्यासहि अवधि नव्हता. नगरांतील सर्व रजपूत वीर शत्रूवर तुटून पडले. आपल्या राण्याचे प्राण हरण करण्यासाठीं टपलेला आणि आपली मातेसमान जी पद्मिनी राणी तिच्या पातिव्रत्यावर दरवडा घालूं पाहणारा हा नीच म्लेंच्छ आहे असें मनांत येऊन प्रत्येक रजपूत सिंहासारख्या शौर्यानें आणि पराक्रमानें लढला. शत्रूचे लोक पुष्कळ होते, तरी त्यांनीं मोठी कत्तल करून त्यांस मागें पिटाळून लाविलें.

याप्रमाणें अल्लाउद्दीन पराभूत आणि गलितशक्ति झाला, तरी त्यानें आपला निश्चय सोडिला नाहीं. उलट, पद्मिनी प्राप्त करून घेण्याची त्याची इच्छा जास्तच अनिवार झाली. त्यानें आपलें बादशाही वैभव चालवून पूर्वींपेक्षां पुष्कळ मोठें सैन्य जमा केलें. हें सैन्य घेऊन तो पुनः चितोरशहरावर स्वारी करण्यास निघाला. पद्मिनी मिळाल्याशिवाय अथवा ती न मिळाल्यास साऱ्या चितोरची राखरांगोळी केल्याशिवाय, परत यावयाचें नाहीं, अशी घोर प्रतिज्ञा त्यानें या वेळीं केली होती.

पुढें येणाऱ्या संकटानें आपली बातमी ताबडतोब भीमसिंगास पोहोंचविली. लखमसिंग मृत्यु पावल्यामुळें भीमसिंग आतां सर्व राज्याचा अधिकारी झाला होता. पूर्वींच्या हल्ल्यांनीं किल्ला पुष्कळ जेरीस आला होता. त्याचें रक्षण करण्यासहि भीमसिंगाजवळ आतां पुरेसे लोक उरले नव्हते. अशी स्थिति झाल्यामुळें अल्लाउद्दिनाच्या नव्या सैन्याशीं टक्कर देण्याचें त्याला सामर्थ्य नव्हतें; परंतु हिंमतवान् राणीच्या प्रोत्साहनानें भीमसिंगास दुप्पट धैर्य आलें. त्या उभयतांनीं शहरासाठीं आपले प्राण खर्चीं घालण्याचा निश्चय केला. कसाहि प्रसंग येवो,

जीवंतपणीं शत्रूच्या हातीं ह्मणून सांपडावयाचें नाहीं, असा त्यांनीं निर्धारच केला.

कांहीं वेळपर्यंत किल्ल्याचें संरक्षण चांगल्या रीतीनें चाललें; परंतु एकसारखे हल्ले चालवून दक्षिण टोंकाकडील टेकडी अल्लाउद्दिनानें सर केली. ही टेकडी ह्मणजे किल्ल्याचें मर्मस्थान, इतकें तिचें महत्त्व होतें. ही टेकडी अल्लाउद्दीन बळकट धरून बसल्यामुळें किल्ला सर होण्यास आतां वेळ लागणार नाहीं, असें भीमसिंग आणि पद्मिनी यांस वाटून तीं मोठ्या चिंतेंत पडलीं. किल्ला हातीं गेल्यावर बादशहा आपल्या घराण्याचीं पाळेंमुळें खणून काढील व मेवाडचें सर्व राज्य धुळीस मिळवील, यांत कांहींच संशय नव्हता.

एके दिवशीं रात्रीं; साऱ्या दिवसाच्या श्रमानें थकून भीमसिंग आपल्या बिछान्यावर विश्रांति घेत पडला असतां आतां पुढें शहराच्या बचावाची काय तजवीज करावी, या विचारानें त्याचें मन व्यापून गेलें. आपल्या बारा पुत्रांपैकीं एक तरी सुरक्षित रहावा अशी कांहीं युक्ति योजिण्याच्या विचारांत असतां एकाएकीं कांहीं आवाज ऐकूं आल्यासारखा त्याला भास झाला. "राजा, मला भूक लागली आहे रे !" असे स्पष्ट शब्द त्याच्या कानीं पडले. डोळे वर करून पाहतो तों नगरदेवतेची साक्षात् मूर्ति आपल्या पुढें उभी असलेली त्याला दिसली. "हे देवी, अझून अंत कां पाहतेस ? माझ्या कुळांतले आठ हजार लोक बळी पडले, तितके पुरे नाहीं का झाले ?" असें राजा ह्मणतांच देवीनें उत्तर दिलें "राजा, मी तृप्त कशी होईन ? मला हे बळी नकोत. मला राजवंशांतील राजपुत्र पाहिजेत. राजचिन्हांनीं युक्त असे बारा पुरुष जर बळी न पडतील तर राजा, तुझ्या घराण्याकडून हें राज्य जाईल, हें पक्कें समज ! "

रात्र संपून सकाळ झाली तेव्हां या चमत्कारिक दृष्टांताची हकीगत राजानें राणीस सांगितली. सर्व सरदारांस एकत्र बोलावून त्यांनां ही हकीगत कळवावी, असा राणीनें सल्ला दिला. त्याप्रमाणें सरदारलोक जमल्यावर त्यांनां ही गोष्ट भीमसिंगानें सांगितली. ती ऐकतांच त्यांनां हसूं आलें. राजाचें डोकें चिंतेनें ठिकाणावर नसल्यामुळें हे कांहींतरी कल्पनेचे तरंग असतील, असेंच त्यांनां वाटलें; परंतु राजानें पुढील रात्रीं मध्यरात्र होईपर्यंत त्यांनां आपल्याजवळ राहण्यास सांगितलें. सरदारांसहवर्तमान राजा जागत बसला असतां देवी पुनः प्राप्त झाली व आपण शहरांत राहावें अशी त्यांची इच्छा असल्यास त्यांनीं काय करावें तें तिनें सांगितलें. " हजारों रानटी लोक धरणीवर मरून पडले तरी त्यांचें मला काय ? दर दिवशीं एक, याप्रमाणें राजपुत्र गादीवर बसवा; तीन दिवस त्यानें राज्याचे सर्व अधिकार चालवावे, आणि चवथ्या दिवशीं शत्रूवर चाल करून धारातीर्थीं त्यानें आपला देह अर्पण करावा; असें सतत बारा वेळ झालें पाहिजे; तरच मी येथें राहीन !" असें सांगून नगरदेवता गुप्त झाली. पुढें काय केलें पाहिजे, हें देवीच्या मुखांतून मुख्य सरदारांसमक्ष स्पष्ट झाल्यावर आतां प्रथम आपला देह कोणीं अर्पण करावा, याविषयीं राजपुत्रांत चढाओढ सुरू झाली. भीमसिंग आणि पद्मिनी यांच्या शूर पुत्रांमध्यें जो तो हा मान आपल्यास हवा, असें ह्मणूं लागला. सर्वांत मोठ्या कुमारानें वडीलपणाच्या नात्यानें हा मान आपणाकडे येतो, सबब तो दुसऱ्याकडे जाऊं नये ह्मणून आग्रहच धरिला व त्याचा अधिकार जाणून इतरांनीं आपला आग्रह मागें घेतला. वडील पुत्राच्या इच्छेप्रमाणें त्याला राजपदावर आरूढ करून त्याच्या नांवाची सर्वत्र द्वाही फिरविली. तीन दिवस राज्याचा सर्व अधिकार त्यानें चालविला.

नंतर शहराचे दरवाजे उघडले व राजा सैन्यानिशीं शत्रूवर मोठ्या आवेशानें चालून गेला. अतुल वीरश्रीनें प्रताप गाजवून धारातीर्थावर देहाचें सार्थक्य करून त्यानें उत्तम गति मिळविली. याप्रमाणें एकामागून एक असे भीमसिंगाचे अकरा पुत्र रणांगणीं पतन पावले.

अखेर सर्वांत लहान, ह्मणजे बारावा मुलगा, मागें राहिला. हा मुलगा जाऊं दिला तर पुढें वंशास आधार नाहीं, असें धाटून भीमसिंगानें त्याला सिंहासनावर बसविण्याची मनाई केली. आपल्या पूर्वजांच्या नगरासाठीं अखेर आपले प्राण अर्पण करण्याचा त्यानें निश्चय केला; परंतु भीमसिंग आपला हा निश्चय अमलांत आणण्याच्या पूर्वीं दुसरा एक भयंकर विधि व्हावयाचा होता. हा विधि ह्मटला ह्मणजे रजपूतांमध्यें जी जोहरची चाल आहे ती होय. शहरांतील सर्व रजपूत स्त्रियांनीं आपला देह अग्नीस अर्पण करण्याचा निश्चय केला. पतिनिधनानंतर आपला देह मागें ठेविल्यास त्याला यवनाच्या दास्यवृत्तीचा विटाळ होईल, तो होऊं नये ह्मणून अग्निनारायणाकडून तो अगोदरच पावन करून घेण्याचें पद्मिनीनें ठरविलें. राणीच्या हुकुमाप्रमाणें या विधीची सर्व तयारी झाली. एका मोठ्या भुयारांत काष्ठसंचय करून ठेविला. एकामागून एक याप्रमाणें हजारों रजपूत स्त्रिया त्या भुयारांत शिरल्या. सरतेशेवटीं, आपल्या श्रेष्ठ सौन्दर्यानें केवळ एका दुष्ट दैवाशिवाय इतरांस जी अत्यंत प्रिय असून सर्व प्रजेस जी मातेसमान पूज्य व आपल्या पतीवर जिची निस्सीम निष्ठा अशा राणी पद्मिनीनें आंत प्रवेश करून इशारा देतांच भुयाराचें द्वार बंद केलें व अग्नि प्रदीप्त केला. अग्नि पेट घेत असतां भुयारांतील एकाहि स्त्रीच्या मुखांतून दुःखाचा उद्गार बाहेर आला नाहीं. सर्वांनांच हा

विधि शुभपरिणामी आहे असें वाटून कोणीं यत्किंचित्‌हि नाखुषी दर्शविली नाहीं

दुसऱ्या दिवशीं भीमसिंगानें आपला सर्वांत धाकटा मुलगा कांहीं निवडक लोक बरोबर देऊन शत्रूच्या वेढ्यांतून पलीकडे सुरक्षित ठिकाणीं पार केला. पुढें तेथून त्याच्या वंशजांनीं चितोरचें राज्य आणि शहर परत काबीज केलें. याप्रमाणें भीमसिंगानें सर्व व्यवस्था करून आपल्या अंगावर निर्वाणीचा केशरी पोषाख चढविला. मागें जीव गुंतण्याचें कांहींच कारण न राहिल्यामुळें आपल्या इमानी व शूर अशा रजपुतांनिशीं तो शहराच्या बाहेर पडला. प्रत्येकानें आपली रणपत्नी जी समशेर तिला शत्रूच्या रुधिरानें यथेच्छ स्नान घालून धारातीर्थी आपला देह पावन करून घेतला.

इतक्या साहसानें आणि भयंकर रक्तपातानें सर केलेल्या शहरांत अल्लाउद्दिनानें जेव्हां प्रवेश केला, तेव्हां त्याच्या हातीं आलेलें शहर ह्मणजे एक निवळ गतप्राण असें कलेवरच ह्मटलें तरी चालेल. जिकडेतिकडे प्रेतेंच प्रेतें पडलेलीं होतीं. पद्मिनीसह सर्व रजपूत स्त्रियांनीं अग्निमुखांत जेथें प्रवेश केला होता त्या भुयारांतून धुराचे लोट बाहेर जात होते.

त्या हृदयभेदक प्रसंगाच्या दिवसापासून आजपर्यंत हें भुयार रजपूत लोक अत्यंत पवित्र मानीत आले आहेत. आजपर्यंत कोणाच्याहि पादस्पर्शानें या भुयारांतील जागा विटाळलेली नाहीं. येथें अग्नीस देह अर्पण करून ज्या पतिपरायण रजपूत स्त्रिया स्वर्गलोकीं गेल्या, त्यांच्या रक्षेचें संरक्षण करीत एक महासर्प असतो, असा लोकांचा समज आहे.

## प्रीतला.

पंधराव्या शतकाच्या आरंभीं दक्षिण हिंदुस्तानांत मुडकोळ नांवाच्या गांवीं एका शेतकऱ्यास एक कन्या झाली, तिचें नांव प्रीतला. ही हिंदु शेतकऱ्याची मुलगी असल्यामुळें तिचें शिक्षणहि तशाच स्थितींतील दुसऱ्या एखाद्या मुलीप्रमाणें झालें होतें. अर्थात्, तिच्या परिस्थितीप्रमाणें जवळच्या एखाद्या शेतकऱ्याची सून होण्यापलीकडे साधारणपणें पाहिलें असतां तिच्या दैवाची उडी जाण्यासारखी नव्हती; परंतु दैवाची करणी नेहमीं विचित्र असते. कोणाचें दैव त्याला कोणत्या स्थितीस नेऊन पोहोंचवील याविषयीं परिस्थितीवरून कधींहि बरोबर अनुमान करतां येत नाहीं. प्रीतला ही शेतकरी वर्गांतल्या इतर मुलींसारखी रूपानें असती, तर ती कोणातरी शेतकऱ्याचीच बायको होऊन राहिली असती. रानांतलें फूल, परंतु त्याला गुलाबाचें सौन्दर्य आणि सुगंध यांची जोड लाभल्यामुळें दैवानुसार त्याला जसें एखाद्या राणीच्या केशकलापांत अग्रस्थान मिळावें, अथवा त्यानें जसें एखाद्या सार्वभौम राजाच्या वक्षःस्थलाचें भूषण व्हावें, तसा प्रकार या सौन्दर्यशाली कृषिककन्येचा झाला. हिच्या अप्रतिम सौंदर्याच्या आकर्षणांत मोठमोठे राजे सांपडून त्यांच्यामध्यें तुमुल युद्धें झालीं व अखेरीस एका प्रबल नृपतीच्या अंतःपुरांत प्रीतलेला अधिष्ठान मिळालें.

बाळपणाचीं कांहीं वर्षें प्रीतलेनें आपल्या बापाच्या घरीं मोठ्या आनंदांत घालविलीं. तिचें नांवहि मुडकोळच्या बाहेर कोणास फारसें माहीत नव्हतें; परंतु कौमार्यावस्था संपते न संपते इतक्यांत एका ब्राह्मणाच्या रूपानें तिच्या आयुष्यक्रमाच्या मार्गावर कलि उभा राहिला. या ब्राह्मणानें प्रीतलेच्या रूपसंपत्तीचें महत्त्व तिच्या मनांत भरवून

तिच्या भोळ्या अंतःकरणांत ऐहिक वैभवाच्या लोभाचें बीज पेरलें. या बीजापासून उत्पन्न झालेल्या वृक्षास वृथा प्रौढीचीं कडू फळें येऊन प्रीतलेला आपल्या शेतकरीवर्गाची स्थिति अत्यंत तुच्छ वाटूं लागली. आपलें सर्व आयुष्य अशा कंगाल स्थितींत काढणें तिला इष्ट वाटेना. आपली सौन्दर्यलतिका अशा प्रकारच्या दारिद्र्यकर्दमांत राहूं दिल्यानें आपणास सौख्याचा लेशहि मिळणार नाहीं, असें तिला वाटूं लागलें.

हा ब्राह्मण जवळच असलेल्या एका देवळाचा पुजारी होता. हा नुकतीच काशीयात्रा करून आल्यामुळें उत्तर हिंदुस्तानांतील हिंदु राजेरजवाड्यांविषयींच्या पुष्कळ गोष्टी त्यानें ऐकिल्याहि होत्या व पाहिल्याहि होत्या. मोठमोठे राजे, राण्या, राजपुत्र आणि राजकन्या यांच्या सुखोपभोगांचें आणि वैभवाचें हुबेहुब चित्र त्यानें प्रीतलेसमोर वठवून दिलें. राजवाडे, महाल, क्रीडाभुवनें, उद्यानभूमिका, दासदासी, हत्तीघोडे इत्यादिकांच्या वर्णनानें त्या भोळ्या मुलीचें डोकें अगदीं फिरून गेलें. विचारास जागाच राहिली नाहीं. "अशा एखाद्या राजपुत्राची तुझ्या या रंभेसारख्या सौन्दर्यावर एकदा नजर पडली पुरे, मग उशीर तो काय? एका क्षणांत या तुझ्या खेडवळ हीन स्थितीचा लोप होऊन तूं श्रेष्ठ वैभवाच्या प्रकाशांत नुसती चकाकत राहशील! तुझ्यासारख्या सौन्दर्याच्या तरुणीस कोणतें वैभव अशक्य आहे?" ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून प्रीतला आपली स्थिति पुरतेपणीं विसरली.

त्या ब्राह्मणानें प्रीतलेला नृत्यगायनाचेंहि थोडेंबहुत शिक्षण दिलें. तो आधीं देवाचा पुजारी; त्यांत काशीयात्रेस जाऊन अनेक वेळां गंगेंत स्नान करून शरीर शुद्ध करून आला होता. परंतु बिचाऱ्याचें मन पूर्वीसारखेंच कोरडें ठणठणीत राहिल्यामुळें त्याचा लोभ व

ऐहिक इच्छा या तशाच राहिल्या होत्या; इतकेंच नव्हे, तर परत आल्यावर त्यांचें सामर्थ्य विशेषच वाढलें होतें. या द्रव्यलोभाची पूर्तता करण्यासाठीं तो पुनः यात्रेस बाहेर पडला. या यात्रेचा हेतु अर्थात् निराळाच होता. प्रीतलेच्या सौन्दर्याचें तो जागोजाग वर्णन करीत चालला. ही ब्राह्मणाची स्वारी फिरतफिरत विजयानगरच्या दरबारीं पोहोंचली. विजयानगर येथील राजा या वेळीं दक्षिण हिंदुस्तानांत फार बलाढ्य आणि संपत्तिमान् होता. ब्राह्मणानें दरबारांत जाऊन प्रीतलेच्या सौंदर्याची प्रशंसा केली. तो ह्मणाला " माझ्याजवळ असें एक स्त्रीरत्न आहे, कीं, त्याला साऱ्या दुनियेचेंहि मोल उणें पडेल ! श्रीकृष्णाच्या अष्टनायिकांपैकीं कोणाहि एकीचें सौन्दर्य तिच्या सौन्दर्याच्या तोडीस येणार नाहीं. फार काय, मुसलमान लोकांच्या ग्रंथांतरीं वर्णन केलेल्या रंभाहि तिच्यापुढें फिक्या पडतील !" राजाचें लक्ष्य ब्राह्मणाच्या भाषणाकडे पूर्णपणें वेधलें व त्यानें त्याला प्रीतलेसंबंधानें सर्व हकीगत विचारली. ब्राह्मणानें या वेळीं अधिकच खुलवून सांगितलेली प्रीतलेची ती हकीगत ऐकतांच, जास्त कांहीं विचार न करतां व विलंब न लावितां तिला आपली पत्नी करावी, असें राजाच्या मनानें घेतलें.

ही राजाची इच्छा प्रीतलेस कळविण्यासाठीं तो ब्राह्मण तावडतोब मुडकोळ येथें परत आला. विजयानगरच्या राजाची राणी होण्याचा योग इतका जमून आला, असें पाहतांच प्रीतलेस फार आनंद होईल अशी त्याची खातरी होती; परंतु प्रीतलेनें ती गोष्ट जेव्हां साफ नाकारिली, तेव्हां त्याला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें. आपण उत्पन्न केलेला मोह आपल्या कल्पनेच्या बाहेर गेला, असें त्याच्या प्रत्ययास आलें. आपणास सर्वांत श्रेष्ठ असें वैभव मिळणें शक्य असतां आपण त्याची वाट कां पाहूं नये, असें त्या महत्त्वाकांक्षी तरुणीस वाटलें. हिंदु राजाची

राणी हें उच्च पद मोठ्या वैभवाचें खरें, परंतु मुसलमान बादशहाची पट्टराणी झाल्यास तें वैभव याच्याहीपेक्षां थोर आहे, असें प्रीतलेस वाटून विजयानगरच्या राजाची मागणी तिनें झिडकारली.

येथपर्यंत या मुग्ध तरुणीच्या लहरी स्वभावाचा परिणाम विशेष असा हानिकारक झाला नाहीं हें खरें, परंतु यापुढील प्रकार मात्र फार भयंकर झाला. प्रीतलेचें सौन्दर्य आणि स्वभावचांचल्य हीं पुढें मोठ्या अनर्थास कारणीभूत झालीं. दक्षिणेंत मोठें युद्ध उद्भवलें, व त्याच्या ज्वाला जिकडेतिकडे पसरल्या. भयंकर रक्तपात आणि क्रूरता यांच्या योगानें हा युद्धसंग्राम इतिहासांत प्रसिद्ध झाला आहे.

आपली विनंती अमान्य झाली, हें जेव्हां विजयानगरच्या राजास समजलें, तेव्हां त्याला अनावर क्रोध आला. त्यांतहि आपण हिंदु राजे असून हिंदु तरुणीस आपणापेक्षां मुसलमान बादशहा श्रेष्ठ वाटला, या गोष्टीची तर त्याला विशेषच चीड आली. आपल्या शेजारच्या मुलुखावर छापा घालून, जी प्रीतला एरवीं आपणास मान्य होत नाहीं तिला बलात्कारानें राजी करावी, असा त्यानें निश्चय केला. ही कामगिरी त्यानें आपल्या एका बलाढ्य सरदाराकडे सोंपविली. राजानें त्याच्याजवळ पांच हजार निवडक सैन्य दिलें व त्यानें मुडकोळ येथें जाऊन बलात्कारानें त्या लहरी स्वभावाच्या सुंदरीस आणि तिच्या आईबापांस धरून आणावें, असा त्यानें हुकूम केला. हुकुमाप्रमाणें तो सरदार विजयानगराहून निघाला व मुडकोळ गांवीं जाऊन पोहोंचला; परंतु आपल्या मुलीमुळें चालून येत असलेल्या वैभवाची वार्ता त्या गरीब शेतकऱ्याला मुळींच नव्हती. त्यामुळें गांवावर सैन्याची धाड येत असें पाहून सर्व गांवकरी जंगलांत पळून गेले. अर्थात्,

त्या सरदाराचा इच्छित हेतु तडीस गेला नाहीं. सैन्यानें मात्र आपली निराशा झाली असें पाहून नेहमीच्या पद्धतीप्रमाणें आसपास लुटालूट आणि कत्तल आरंभिली. सैन्यानें पुष्कळ लूट जमा केली, व ती सर्व घेऊन तो सरदार विजयानगरास परत आला. राजाचा मुख्य हेतु मात्र साध्य झाला नाहीं.

हा प्रकार येथेंच थांबला नाहीं. या अनर्थानें पुढें होणाऱ्या वादळाची सुरुवात केली, इतकेंच. सर्व दक्षिणेंत हें वादळ प्रचंड वेगानें पसरलें. पुष्कळ गांवें व शहरें धुळीस मिळालीं व प्राणहानि तर बेसुमार होऊन गेली.

त्या काळीं दक्षिण हिंदुस्तानांत एकमेकांशीं प्रतिस्पर्धा करणारीं अशीं दोन मोठीं राज्यें होतीं. एक विजयनागरचें व दुसरें कलबुर्ग्याचें. विजयानगर हें हिंदुराज्य असून तेथें हिंदु राजा राज्य करीत होता, हें पूर्वी सांगितलेंच आहे. कलबुर्गा येथें या वेळीं फिरोजशहा नामें मुसलमान बादशहा राज्य करीत होता. या वेळीं मुसलमानांची चढती कळा होती. सर्व हिंदुस्तानांत फिरोजशहासारखा कर्ता पुरुष दुसऱ्या कोणत्याहि सिंहासनावर त्यावेळीं विद्यमान नव्हता. फिरोजशहा जसा युद्धकलेंत निष्णात होता तसाच तो राज्यकारभारांतहि दक्ष होता. लहानपणांत सर्व कलाशास्त्रांचें पूर्ण शिक्षण त्याला मिळालें होतें. तो गादीवर बसला, तेव्हां काव्य, तत्वज्ञान आणि विद्या यांस त्यानें मोठा आश्रय दिला. दर आठवड्यास तीन वेळ तो वनस्पतिशास्त्र, भूमिति आणि तर्कशास्त्र या विषयांवर आपल्या दरबारच्या लोकांस व्याख्यानाच्या द्वारें शिक्षण देत असे; परंतु हे जरी सर्व गुण बादशहाच्या ठिकाणीं होते, तरी त्यांच्या सहवासांत कांहीं दुर्गुणहि होतेच. त्याला दारू आणि स्त्रिया

यांचा अतोनात नाद होता. त्याचें अंतःपुर सुंदर स्त्रियांनीं नेहमीं भरलेलें असे. एके दिवशीं तीनशें बायका त्यानें अंतःपुरांत आणून ठेविल्या! देशांतील सर्व भागांत त्यानें लोक पाठविले होते. मरणानें अथवा बादशहाची तबियत फिरल्यामुळें जनानखान्यांत ज्या जागा रिकाम्या पडतील, त्या तो बाहेरून आणलेल्या दासींकडून भरून काढीत असे. भीमा नदीच्या कांठीं त्यानें एक अंतःपुर बांधलें होतें. तें एका शहरासारखें वसवून त्यानें त्याला फिरोजपूर असें नांव दिलें होतें. जगांत कोठेंहि सुंदर स्त्री सांपडली, कीं, ती येथें आणून ठेवावी, असा क्रम त्यानें ठेविला होता. अरेबिया, सिरकाशिया, जिऑरजिया, तुर्कस्तान, रशिया, यूरोप आणि चीन या दूरदूरच्या देशच्या सुंदर स्त्रिया, तशाच हिंदुस्तानांतील उच्च वर्णांच्या स्त्रिया, त्यानें येथें आणून ठेविल्या होत्या. प्रत्येक भाषा शिकून त्या त्या भाषेनें तो प्रत्येकीशीं संभाषण करीत असे, व त्यानें त्या सर्वांस इतक्या ममतेनें वागविलें होतें, कीं, प्रत्येकीस आपणच शहाची आवडती आहों, असें वाटे.

अशा स्वभावाच्या बादशहास विजयानगरच्या राजाचें वर्तन किती अक्षम्य वाटावें, याची कल्पना सहज होण्यासारखी आहे. आपल्या खास बादशहातीच्या मुलुखांत कोणत्याहि मुलीस, मग ती हिंदु असो किंवा मुसलमान असो, लग्नाची मागणी घालणें, हा आधीं विजयानगरच्या हिंदु राजाचा पहिला अपराध, असें त्याला वाटलें. त्यांत पुनः मुसलमान मुलुखावर हल्ला करून तेथील एका सुंदर तरुणीस कैद करून नेण्याचा प्रयत्न करणें, हें तर अगदींच अक्षम्य पातक, असा त्याचा ग्रह होऊन त्यानें आपल्या सैन्याची तयारी करून विजयानगरच्या राजास शिक्षा लावण्यासाठीं त्याच्या शहराकडे

एकदम मोर्चा वळविला. राजा गैरसावध असल्यामुळें एकाएकीं आलेल्या या संकटास तोंड देणें त्याला अवघड गेलें. तथापि त्यानें मोठ्या शौर्यानें लढून शहराचा बचाव केला, आणि आंत शिरलेलें सैन्य बाहेर हांकून लाविलें. फिरोजशहाचें सैन्य शहर सोडून गेलें खरें, परंतु तें सर्व प्रांतावर पसरलें. फिरोजशहानें विजयानगरचें सर्व राज्य उध्वस्त केलें. साठ हजार पुरुष आणि स्त्रिया यांस त्यानें गुलाम करून ठेविलें.

विजयानगरच्या राजाचा जोर जरी अद्यापि नाहींसा झाला नव्हता, तरी या लढाईचा त्याला फार त्रास आला होता. त्यानें तहाचें बोलणें लाविलें. राजानें आपली सर्वांत सुंदर असेल ती मुलगी बादशहास विवाह करून द्यावी, तिच्याबरोबर हुंड्यादाखल पुष्कळ संपत्ति देऊन पन्नास उत्तम हत्ती, व दोन हजार दास आणि दासी असा इतमाम द्यावा, अशा अटी त्या मानी हिंदु राजास कबूल करण्यास भाग पाडून फिरोजशहा स्वस्थानीं परत गेला.

कलबुर्गा येथें फिरोजशहा परत आल्यावर जिच्यामुळें एवढा रक्तपात व एवढ्या बलाढ्य राजाची मानहानि झाली, त्या प्रीतलेस आणण्याचा त्यानें हुकूम केला. फिरोजशहानें जेव्हां तिला पाहिलें, तेव्हां तिच्या सौंदर्यानें तो अगदीं गुंग होऊन गेला. त्याच्या बारीक दृष्टीस तिच्या सौंदर्यांत कोठेंच कांहीं उणें दिसेना. त्याच्या कल्पनासृष्टींतहि इतकें अप्रतिम लावण्य त्यानें कधीं पाहिलें नव्हतें. तिला पाहून बादशहास फारच आनंद झाला व त्यानें तिला प्रशंसापूर्वक गौरविलें. इतकें त्याला वाटलें खरें, तरी आपल्या अंतःपुरांत तिला पाठविणें त्याच्या मनास बरें वाटेना. अर्थात् ही आश्चर्याचीच गोष्ट झाली, यांत संशय नाहीं. आपलें उतारवय झाल्यामुळें ही अल्पवयस्क

तरुणी आपल्या पत्नीपदास साजणार नाहीं, असें वाटून बादशहानें आपला ज्येष्ठ पुत्र हुसेन याच्याशीं तिचें लग्न लावून देण्याचा बेत केला.

हा बेत ठरल्यावर हुसेन यास त्यानें बोलावून आणिलें आणि प्रीतलेशीं त्याची मुलाखत करवून त्याची मर्जी कशी काय आहे तें त्याला विचारिलें. त्याला ती गोष्ट पसंत पडल्यावर लग्नाच्या तयारीचा त्यानें हुकूम केला. मोठ्या थाटानें विवाहविधिपूर्वक खुद्द बादशहानें प्रीतलेस शहाजाद्यास अर्पण केली. अशा प्रकारें दैवाच्या विचित्र रचनेनें, जी प्रीतला एका यःकश्चित् कृषीवलाची कन्या होती ती सर्व भरतखंडांत सामर्थ्यानें आणि वैभवानें श्रेष्ठ अशा कलबुर्ग्याच्या बादशहाची सून झाली. अर्थात्, बादशहाच्या मृत्यूनंतर या सर्व राज्याची मालकीण व पट्टाभिषिक्त राणी तीच होणार होती.

प्रीतलेची सर्व महत्त्वाकांक्षा कल्पनेच्या बाहेर पूर्ण झाली खरी, परंतु जें सौंदर्य तिला एवढ्या पदास पोहोंचविण्यास कारणीभूत झालें त्यानेंच तिला तें वैभव फार वेळ उपभोगूं दिलें नाहीं. तिनें केलेल्या अपमानाचें शल्य विजयानगरच्या राजाच्या हृदयांत तसेंच रुतून राहिलें होतें. त्यांतहि बादशहानें केलेल्या मानहानीनें तर त्याच्या अंतःकरणास जास्तच पीडा होऊं लागली. आपणास जिनें झिडकारलें, ती आपल्या शत्रूच्या पुत्राची पत्नी झाली, ही गोष्ट त्याला एकसारखी डांचूं लागली. या अपमानाचा सूड घ्यावा म्हणून त्यानें गुप्त रीतीनें तयारी चालविली व तशी वेळहि लौकरच आली.

फिरोजशहाहि युद्ध पुनः सुरू करण्यास उत्सुकच होता. प्रीतलेसंबंधानें झालेला अपमान विजयानगरचा राजा विसरला नाहीं. हें

पाहून त्याला वाईट न वाटतां उलट आनंदच झाला. जेव्हां दोन राजे लढाईसाठीं आतुर असतात तेव्हां कारणहि फारसें लागत नाहीं, अर्थात्, दक्षिणेंतील हिंदु आणि मुसलमान यांच्यामध्यें पुनः लवकरच रणसंग्राम सुरू झाला; परंतु या वेळीं या युद्धाचा परिणाम मात्र उलट झाला. फिरोजशहानें बिलकोंड्याच्या मजबूत किल्ल्यास वेढा दिला. किल्ल्यावरच्या लोकांनीं आपली शिकस्त करून मुसलमानांचें कांहीं-एक चालूं दिलें नाहीं. बादशहाच्या सैन्यांत रोग सुरू झाला. आंतून रोगराई, आणि बाहेरून शत्रूचा मारा, अशा कैचींत सांपडल्यामुळें मुसलमानांचें सैन्य हैराण झालें. इतक्यांत राजाच्या सैन्यानें दुसऱ्या बाजूनें येऊन निकराचा हल्ला केल्यामुळें बादशहाचा पूर्णपणें पराजय होऊन सैन्याची वाताहात झाली. याप्रमाणें हिंदुलोकांस मोठा जय मिळाला व त्यांनीं आपला सूडहि चांगलाच उगवून घेतला. त्यांनीं पुष्कळ खेडीं आणि शहरें जाळून टाकिलीं, मशिदी व इतर पवित्र ठिकाणें उध्वस्त केलीं, लोकांनां कत्तल करून मारलें, व मुसलमानांची पुरी नासाडी आणि मानहानि केली.

फिरोजशहा आपल्या राजधानीच्या शहरीं परत गेला, परंतु पराजयांचें दुःख त्याला इतकें झालें, कीं, त्यानें बिछाना धरिला. इतके एकसारखे जय मिळवून अखेरीस झालेली फजिती त्याच्या मनास एकसारखी डंवचत राहिली. त्या दुखण्यांतून तो वर उठला नाहीं. थोड्याच दिवसांनीं तो मृत्यु पावला.

फिरोजशहाच्या मृत्यूनंतर तख्तनशीन सुलतानाची पत्नी होऊन तें महाभाग्याचें स्थान प्रीतलेला मिळण्याचा संभव सहाजिकच प्राप्त झाला; परंतु दैवानें तिची ही महत्त्वाकांक्षा पुरी होऊं दिली नाहीं. तिचा पति

शहाजादा हुसेनखान हा अत्यंत क्रूर स्वभावाचा व अनिश्चित मनाचा राजपुत्र होता. प्रजेला तो आवडत नव्हता. त्याचा चुलता खानखानन हा धाडसी आणि नेटदार असा उमराव होता. लोकांस शहाजादा आवडत नव्हता, ही गोष्ट त्याला फायदेशीर होऊन त्याची बादशहात बळकाविण्याचा त्यानें निश्चय केला, व ताबतोब तो अमलांतहि आणिला. हुसेनखानास. कांहीं करतां आलें नाहीं. त्या वेळच्या सर्वसाधारण चालीप्रमाणें हक्कदार राजपुत्राचे डोळे काढून अगर अन्य रीतीनें त्याचा घात करून आपली सत्ता निष्कंटक करण्याऐवजीं खानखानच्या अंतःकरणांत दया उत्पन्न होऊन हुसेनखानाची तशी वाट न लावितां त्यानें त्याला फिरोजपूर येथें नेऊन ठेविलें. त्याच्याबरोबर इतमाम चांगला दिला, त्याला चांगल्या स्थितीनें राहतां येईल अशी नेमणूक करून दिली, आणि फिरोजपूरच्या सभोंवार आठ मैलपर्यंत मृगया वगैरे करमणुकीच्या साधनांनीं त्यानें आपला काळ सुखांत घालवावा, अशी व्यवस्था करून ठेविली. अर्थात्, प्रीतलेसहि आपल्या पतीच्या बरोबर जावें लागलें. प्राप्त झालेली दैवगति मान्य करून आपल्या पतीच्या सहवासांत पुष्कळ वर्षें तिनें अढळ पातिव्रत्यानें घालविलीं. तिचें आपल्या पतीवर शुद्ध प्रेम होतें. तिनें मरेपर्यंत त्याला तशा स्थितींतहि पुष्कळ सुख दिलें. परंतु लहानपणचे विचार जेव्हां कधींकधीं तिच्या मनांत येत तेव्हां विफल झालेल्या महत्वाकांक्षेबद्दल तिला वाईट वाटल्याशिवाय रहात नसे.

## करमदेवी.

रजपुतांत मोहिल ह्मणून एक जात आहे. या मोहिल जातीचा नाईक माणिकराव ह्मणून होता. करमदेवी ही त्याची कन्या होय.

आसपासच्या सुमारें पंधराशें गांवांवर माणिकरावाचा ताबा होता. ओरीन्थ या गांवीं करमदेवीचा जन्म झाला. तेथें तिचीं लहानपणचीं बरींच वर्षे गेलीं होतीं. तिच्या बाळपणांत विशेष महत्त्वाची अशी कोणतीहि गोष्ट घडून आलेली नव्हती; परंतु इसवी सन १४०७ या वर्षी ही अत्यंत सौख्यमय स्थिति पालटली. तिच्या आयुष्यक्रमास निराळी दिशा लावण्यासारखी व तिच्या अंतःकरणाच्या कौमार्यावस्थेंत बदल करण्यासारखी एक गोष्ट घडून आली. तिच्या बापाच्या दरबारीं एक परकी तरुण पाहुणा ह्मणून आला. त्याचा सुंदर व सशक्त बांधा आणि शौर्याची कीर्ति यांनीं करमदेवीच्या मनावर निराळाच परिणाम उत्पन्न केला.

हा परकी तरुण त्या प्रांताजवळील अरण्यांत वास करणाऱ्या लोकांचा सरदार होता. याची शक्ति द्वितीय पांडव जो भीम त्याच्यासारखी असून धैर्य मेरुपर्वतासारखें अढळ होतें. अरण्यप्रदेशांत याच्या नांवाचा सर्वत्र दरारा असे. हा आपल्या लोकांच्या टोळ्या करून पश्चिमेस सिंधु नदापर्यंत आणि पूर्वेस थेट नागोरपर्यंत छापे घालून लूट करीत असे. या योद्ध्याचे पराक्रम अनेक वेळ माणिकरावाच्या कानीं आले होते; परंतु प्रत्यक्ष मुलाखतीचा हा पहिलाच प्रसंग होता. हाहि योग माणिकरावानें स्वतःच जमवून आणिला होता. लुटीच्या मालावर घातलेल्या दरवड्यांत सांपडलेलीं उंटें, घोडे व मालमत्ता स्वस्थानीं घेऊन जात असल्याची बातमी ठेऊन या सरदारास माणिकरावानें आपल्या दरबारीं आदरपूर्वक बोलावून आणलें. या सरदाराचें नांव साधूसिंग असें होतें. माणिकरावाचें आदरयुक्त आमंत्रण आपल्या नेहमीच्या उमद्या आणि आनंदी वृत्तीनें स्वीकारून साधूसिंग त्याच्या दरबारीं आला.

करमदेवी ही माणिकरावाची एकुलती एक मुलगी होती. तिचे तो पुष्कळ लाड करीत असे. ती वाड्यांत मोकळेपणानें आणि स्वतंत्रपणें राही. कोणी पाहुणा आला तर त्याच्या आदरसत्काराचा बंदोबस्त ती स्वतः ठेवी. आपल्या बापाजवळ त्याचें संभाषण होई तेव्हां लहानपणाच्या जिज्ञासेनें ती जवळ रहात असे. साधूसिंग माणिकरावाच्या वाड्यांत असतांना करमदेवीचें मन त्याच्याकडे वेधलें. तेजःपुंज कांति, विशाल सामर्थ्य, शौर्याची कीर्ति, त्यानें वर्णिलेले अनेक जित्रावरचे प्रसंग, आणि त्याचीं धाडशी कृत्यें हीं तिच्या हृदयावर पूर्णपणें प्रतिबिंबत झालीं. ज्या मर्दानी गुणांमुळें साधूसिंगानें एवढी कीर्ति संपादन केली, आणि इतक्या आणीबाणीच्या प्रसंगांतून तो पार पडला, त्याच गुणांच्या पाशांत करमदेवी सांपडली. अर्थात्, तिनें आपलें अंतःकरण त्याला वाहिलें.

साधूसिंग माणिकरावाच्या वरीं येण्यापूर्वींच जी एक विशेष गोष्ट घडून आली होती ती घडली नसती, तर करमदेवीचा हा हेतु पूर्ण होण्यास मोठीशी अडचण आली नसती. शिवाय, या प्रकारांत कांहीं वावगेंहि नव्हतें; परंतु एका राजपुत्रास करमदेवी देण्याविषयीं पूर्वींच वाङ्निश्चय झाला होता. साधूसिंगाच्या सहवासांत करमदेवीच्या अंतःकरणाची ही स्थिति झाली. अर्थात्, साधूसिंगाच्या विवाहविधीच्या अगोदर किंवा नंतर, रजपुतांच्या मानी स्वभावाचा विचार केला असतां, रणदेवतेची आराधना झालीच पाहिजे, हें अगदीं उघड होतें. मंदोराच्या ऱ्हाठोरानें करमदेवीबद्दल मागणी घातली होती आणि त्याची ती मागणी माणिकराव व त्याची उपवर कन्या या उभयतांनीं मान्य करून वाङ्निश्चयहि झाला होता. हा ऱ्हाठोर दिसण्यांत सुंदर, स्वभावानें उमदा व श्रीमंत राजघराण्यांतील असल्यामुळें, करमदेवीनें त्या वेळीं

आपली पसंती दर्शविलेली होती; परंतु हा केवळ तिच्या बालपणच्या अल्लडपणाचा परिणाम होता. अंतःकरणपूर्वक प्रेम ह्मणजे काय असतें, त्याचा अनुभव साधूसिंगाच्या सहवासानें तिला आला. हा सरदार इतक्यांत तेथें गेला नसता, तर नेहमींच्या पद्धतीस अनुसरून करमदेवीचा विवाह झाला असता व तिचा आयुष्यक्रम विशेष कांहीं न होतां तसाच अखेरपर्यंत चालू राहिला असता. अर्थात्, मंदोरच्या राज्ञीपदाच्या वैभवांत तिचें सर्व आयुष्य गेलें असतें. आतां अर्थात् तिच्या आयुष्यक्रमास निराळा मार्ग लागला. या मार्गावर अनेक संकटें, हाल आणि दुःखें हींच तिला अनुभवावीं लागणार, हें ठरल्यासारखें झालें. तिच्या आप्तवर्गाच्या वांछ्यासहि हेंच ठरलें होतें; परंतु खऱ्या प्रीतीचा ओघ या अडचणींस मुळींच जुमानीत नाहीं. उंच पर्वतांतून पाषाणभेद करून वर आलेला जलप्रवाह जसा कड्याखडकांस न जुमानतां उड्या टाकीत खालीं येतो, व एखाद्या नदीच्या अथवा समुद्राच्या उदरांत प्रवेश करतो, तशी खऱ्या प्रेमाची गति असते. जशीं संकटें जास्त, तसें हें प्रेम जास्त अनिवार होत जातें. साधूसिंग आल्यानंतर एकदोन दिवस करमदेवीनें आपलें मन कसेंबसें ताब्यांत ठेविलें, परंतु या प्रयत्नांनींच त्याचा जोर विशेष वाढला, व करमदेवीचा पुढें कांहींच इलाज चालेना. तिची आनंदवृत्ति मावळली. तिच्या चेहऱ्यावर चिंतेची दाट छाया पसरली. एखाद्या निर्जीव यंत्राप्रमाणें नेहमीचीं कामें तिच्या हातून होऊं लागलीं.

ही तिची बदललेली वृत्ति माणिकरावानें तेव्हांच ताडली. आपल्या चित्तवृत्तींत अंतर पडण्याचें कारण करमदेवीनें स्वतः जरी बोलून दाखविलें नाहीं, तरी तें उघड करून दाखविण्याचें काम तिचे खोल गेलेले डोळे, सुकलेले गाल, निस्तेज चेहरा आणि निरुत्साही वृत्ति यांनीं

केलें. आपण दिलेलें वचन मोडलें तर आपली केवढी बेअब्रू होईल व किती अनर्थ ओढवेल, हें तिच्या वृद्ध पित्यानें तिला समजावून सांगितलें; परंतु या सांगण्याचा परिणाम उलटच झाला. तिनें मोठ्या प्रयत्नानें आपल्या हृदयावर चेपून ठेवलेलें दडपण उडवून दिल्यासारखें झालें. तिच्या शुद्ध प्रेमास वाचा फुटून ती म्हणाली " बाबा, माझं हृदय माझ्यापाशीं नाहीं. तें साधू घेऊन गेला. दुसरा पति मी कसा करूं? आतां साधूसिंगच माझे पति. मी दुसऱ्या कोणाशींच विवाह करून घेणार नाहीं !"

दुसऱ्या दिवशीं साधूसिंगास माणिकरावानें ही हकीगत कळविली. तसें कांहीं होणार, हें त्यालाहि कळून चुकलें होतें. जशी करमदेवीची, तशी त्याचीहि स्थिति झाली होती. तथापि " तिचें मन पूर्ववत् स्थिर होत असल्यास आपण आलों तसे परत जाऊं, " असें त्यानें सांगितलें. " तसें होण्याचा संभव नसेल, तर मात्र करमदेवीशीं आपण मोठ्या आनंदानें विवाह करूं; मग पुढें काय होईल तें होवो; तें सर्व आपण पाहून घेऊं, " असें त्यानें पुन्हा निश्चयानें सांगितलें.

अखेरीस, साधूसिंगानें आपल्याबरोबर आणिलेल्या सर्व लुटीसह परत आपल्या ठिकाणीं जावें, व जो कांहीं निश्चय ठरेल त्याची वाट पाहत तेथें राहावें, असें ठरलें. परंतु तेथें त्याला थोडक्याच दिवसांनीं हा निश्चय समजला. करमदेवीचा निर्धार कायम राहिला. तिच्या प्रेमापुढें दुसरा कोणताच विचार टिकाव काढीना. वृद्ध पित्यानें तिची पुष्कळ विनवणी केली, तरी तिचा उपयोग कांहीं न होतां तिनें आपला पूर्वीचा वाङ्निश्चय रद्द केला. याप्रमाणें राज्य सोडून रानाचाच तिनें अंगीकार केला. राजकुमार टाकून साधूसिंगासारख्या जंगलांत

राहणाऱ्या लुटारूंच्या सरदारासच तिनें आपला देह आणि हृदय हीं अर्पण केलीं.

कांहीं दिवस गेल्यावर वृद्ध माणिकरावहि या गोष्टीस कबूल झाला. लग्नाचा दिवस ठरला. साधूसिंगाबरोबर करमदेवीचें मोठ्या थाटानें लग्न झालें. मोलवान् जवाहीर, सोन्यारुप्याचीं भांडीं, सबंध सोन्याचा भला मोठा नंदी आणि चांगल्या चतुर पंधरा दासी, इतकें स्त्रीधन तिच्या बापानें तिला दिलें.

हें लग्नाचें वर्तमान मंदोरच्या ऱ्हाटोरास समजलें तेव्हां तो फार क्षुब्ध झाला. विचारी माणसास यांत कांहीं विशेष वाटलें नसतें. करमदेवीनें आपल्या मनानें ज्याला वरलें होतें त्याची ती पत्नी झाली. यांत कोणीं कोणाचा विशेष असा अपराध केला नाहीं हें उघड आहे; परंतु त्या ऱ्हाटोरास तसें वाटलें नाहीं. बळजबरीनें लग्न मोडतां आलें असतें तर त्यानें तसें केलें असतें; परंतु माणिकरावानें बंदोबस्त चांगला केला होता, त्यामुळें त्याचें कांहीं चाललें नाहीं. तथापि साधूसिंग आणि करमदेवी आपल्या अरण्यांतील वसतिस्थानास परत जातील तेव्हां त्यांनां मार्गांत गांठून तेथें आपला सूड उगवावा अशा बेतानें तो वाट पहात राहिला.

लग्नसोहळा संपल्याची बातमी त्याला समजतांच अगदीं निवडक चार हजार वीर त्यानें बरोबर घेतले, आणि तीं वधूवरें परत जाण्याच्या मार्गांवर तो आपलें ठाणें देऊन बसला. परत जातांना माणिकरावानें दोनचार हजार मोहिललोक बरोबर घेण्याविषयीं साधूसिंगास आग्रह केला होता; परंतु आपले सातशें शूर लोक बरोबर असल्यामुळें मार्गांत कसाहि शत्रु आड आला तरी आपण त्याचा समाचार घेऊं, असें सांगून ती मदत त्यानें नाकारली.

साधूसिंग, करमदेवी आणि त्यांच्याबरोबरचें हें छोटें सैन्य मोठ्या आनंदानें मार्ग क्रमूं लागलें. मार्गांत कांहींतरी अनर्थ गुदरेल, याची त्यांनां कल्पनाहि नव्हती. हा लवाजमा चौदन येथें आल्यावर त्यांचा पुढील मार्ग ऱ्हाठोराच्या सैन्यानें अडविला. आतां स्वस्थानीं जावयाचेंच तर या सैन्यांतून मार्ग काढिला पाहिजे, त्याशिवाय दुसरी तोड नाहीं, असें होऊन गेलें. युद्ध करणें ह्मणजे श्वासोच्छ्वासासारखी सहज होणारी क्रिया, अशी रजपुतांची स्थिति असल्यामुळें, लढाईचें तोंड लागण्यास उशीर लागला नाहीं. आपलें सैन्य संख्येनें मोठें आहे असें पाहून त्या शूर ऱ्हाठोरास अशा लढाईंत जय मिळविणें हलकेपणाचें काम वाटलें. धर्मयुद्धाप्रमाणें जोडीजोडीनें युद्ध करण्याचा त्यानें हुकूम केला. हा हुकूम होतांच साधूसिंगाचा आप्त जैतंग पुढें झाला. चिलखत घातलेला, भाला आणि तरवार यांनीं सज्ज, अशा त्या योद्धयानें ऱ्हाठोराचा एक धिप्पाड सरदार पहिल्या सपाट्यास खालीं लोळविला. याप्रमाणें सैन्यांत जिकडेतिकडे द्वन्द्वयुद्ध चालू असतां आपल्या लोकांचा पराक्रम दोन्हि राजपुत्र पाहत उभे राहिले. अखेरीस या लढाईंत ज्यांचा साक्षात् महत्त्वाचा संबंध, अशांनींच पुढें सरून आपापल्या जयापजयानें लढाईचा निकाल लवकर लावावा, असें उभयतांस वाटलें. शूर साधूनें कमर खेंचून भाला हातीं घेतला आणि घोड्यावर स्वार होऊन तो ऱ्हाठोरच्या सैन्यांत शिरला. प्रत्येक सपाट्यांत बऱ्याच लोकांस त्यानें धारातीर्थीं मुक्ति दिली. करमदेवी आपल्या रथामध्यें हा युद्धचमत्कार पहात उभी होती. आपल्या पतीचा पराक्रम पाहून प्रत्येक वेळेस ती अत्यंत आनंदित होई. याप्रमाणें ऱ्हाठोराचे सहाशें लोक पडले व साधूसिंगाचेहि जवळजवळ निमे लोक निकामी झाले.

आपले लोक मरूं देणें चांगलें नाहीं, असें वाटून आपला शत्रु जो ऱ्हाठोर त्यालाच गांठावा व एकदा काय तो सोक्षमोक्ष झाल्यावर लढाई तत्काळ थांबेल व पुढें प्राणहानि होणार नाहीं, हा विचार मनांत येतांच साधूसिंगानें आपल्या प्रिय पत्नीचा निरोप घेतला. पुनः लढाईंत घुसतांना "आपला पराक्रम आनंदानं चालूं द्या. मी आपलं युद्धसामर्थ्य पाहत ही येथें उभी आहें. देह पतन पावला ह्मणून काय झालं? नंतरहि मी आपल्याजवळ आहेंच आहें!" असें करमदेवी ह्मणाली. थोड्याच वेळानें त्या दोनहि सरदारांची गांठ पडली. आरंभीं वार कोणीं कोणावर करावा, यासंबंधानें थोडासा वेळ उदात्त अंतःकरणपूर्वक त्या दोघांचा वादविवाद होऊन अखेरीस साधूसिंगानें आपल्या समशेरीचा वार ऱ्हाठोर सरदाराच्या मानेवर केला. विद्युद्वेगानें ऱ्हाठोराची तरवारहि साधूसिंगाच्या मस्तकावर येऊन आदळली व दोघेहि खालीं पडले. ऱ्हाठोर सरदार रक्तस्त्रावानें चेतनाशून्य होऊन पडला. साधूसिंगास शत्रूच्या तरवारीनें मृत्यूच्याच स्वाधीन केलें. हें सर्व करमदेवीनें आपल्या रथांतून पाहिलें.

उभयतां सरदार पडल्यावर युद्ध बंद झालें व मृत्यु पावलेल्या योद्धयांबद्दल जो तो शोक करूं लागला. इतक्यांत या अनर्थाचें कारण जी करमदेवी तीहि समीप येऊन उभी राहिली. तिनें आपल्या प्राणपतीकडे शोकपूर्ण दृष्टीनें पाहिलें. आपला पति जिकडे गेला असेल तिकडे आपणहि जाणार, असें ह्मणून तिनें एक तरवार मागितली. उजव्या हातांत तरवार घेऊन तिनें आपला डावा हात साफ मुळांतून उतरला. तो हात शाबूत असलेल्या हातांत घेऊन तिनें आपल्या लोकांस हुकूम केला "जा, जंगलांतल्या पहाडांत माझे श्वशुर आहेत त्यांच्याकडे हात घेऊन जा आणि त्यांची सून कशी होती तें त्यांना सांगा."

लगेच आपल्याबरोबर असलेल्या रजपूत शिपायास तिनें आपला राहिलेला उजवा हात तोडण्यास फर्माविलें. हुकुमाप्रमाणें तोहि हात तोडल्यावर बापाकडून आणलेली सर्व संपत्ति आणि तो हात तिनें आपला पिता माणिकराव याच्याकडे पाठविली.

इतकें झाल्यावर तिनें चिता तयार करण्यास हुकूम केला. जेथें साधूसिंग पडला होता तेथेंच चिता रचली व पेट घेत असलेल्या अग्नीच्या तोंडांत तिनें उडी टाकिली. याप्रमाणें ऐन तारुण्यांत करमदेवीचा अंत झाला. त्या वेळेपासून आजपर्यंत तिच्या गुणांवरील गाणीं रजपूत शिपाई पेटल्या परश्याजवळ बसून ह्मणत असतात. मंदोरचा म्हाठोरहि पुढें फार दिवस जगला नाहीं. या लढाईंत झालेल्या जखमा जडावून त्याला बरेच दिवस ज्वर येत होता; त्यामुळें अत्यंत क्षीण होऊन तो सहा महिन्यांच्या आंतच मरण पावला.

## राजकन्या सुजाबाई.

इसवी सन १३४२ सालीं बुंदी शहर वसविण्यांत आलें. या शहराचा संस्थापक राणा रावदेव हा होता. त्यानें बंदूखोरें काबीज करून त्या प्रांतास हरवती ही संज्ञा दिली. प्रस्तुत चरित्रांत वर्णिलेली हकीगत सोळाव्या शतकाच्या आरंभीं घडली. त्या वेळीं बुंदीच्या राजांनीं आपली सत्ता चांगलीच बळकट करून आपलें शौर्य आणि कर्तबगारी गाजविली होती.

बुंदीचा राजा नारायणदास याला एक कन्या झाली, तीच आमची चरित्रनायिका सुजाबाई होय. नारायणदास हा मोठा शूर आणि निधड्या छातीचा रजपूत वीर होता. भीति ह्मणून त्याच्या मनास कधींच शिवली

नव्हती. संकटें व धाडसी प्रसंग हीं त्याच्या पांचवीस पुजलेलीं होतीं. तीं नसतीं, तर त्याला एक क्षणभरहि चैन पडलें नसतें. हे एवढे शौर्यवीर्यादि गुण त्याच्या अंगीं असून अफूच्या व्यसनानें तो घेरला असल्यामुळें त्याच्या ठायीं वास करीत असलेल्या या गुणांस बराच स्तिमितपणा आलेला होता. राजा नारायणदास हा प्रत्यहीं इतकी अफू खात असे, कीं, तेवढ्या अफूच्या सेवनानें दुसऱ्या कोणासहि वर उठतां आलें नसतें. चांगल्या कसलेल्या अफीणबाजास एका वेळीं एक पैसाभार अफू ह्मणजे फार झाली. एखाद्या अनभ्यस्तास इतकी अफू गेली तर त्याला अखेरचीच झोंप लागावयाची. परंतु नारायणदासास अफूचें इतकें वेड लागलें होतें, कीं, सात पैसेभार अफू तो सहज खात असे, व त्यामुळें त्याच्या वृत्तींत यत्किंचित्‌हि फरक पडल्याचें दिसून येत नसे.

सुजाबाईची आई ही चितोरच्या घराण्यांतली होती. नारायणदासास या चितोरच्या राजकन्येची प्राप्ति मोठ्या चमत्कारिक प्रकारानें झाली. बुंदी आणि चितोर या दोन राजघराण्यांत पूर्वीपासून स्नेहसंबंध होता. एका घराण्यावर प्रसंग आल्यास त्याला दुसऱ्या घराण्यानें मदत करावी, असा क्रम बरींच वर्षें ठरून गेला होता. चितोरचा राणा रायमल्ल याच्यावर पठाणांची स्वारी झाली असतां वरील ठरावाप्रमाणें नारायणदास पांच हजार निवडक सैन्य बरोबर घेऊन रायमल्लाच्या मदतीसाठीं निघाला. वाटेंत नेहमीप्रमाणें अफूचें सेवन करून तज्जन्य तंद्रेंत एका विहिरीजवळ झाडाखालीं नारायणदास आराम घेत घोरत पडला होता. याप्रमाणें झाडाखालीं तोंड उघडें टाकून तो घोरत पडला असतां विहिरीचें पाणी नेण्यासाठीं त्या ठिकाणीं एका तेल्याची तरुण बायको आली. हा घोरत पडलेला रजपूत आपल्या चितोरच्या राजाच्या मदतीस जात आहे असें तिला जेव्हां समजलें, तेव्हां ती सहज

ह्मणाली " यांची एवढीच जर कुमक आपल्या राजास जात असली, तर आमची कांहीं धडगत दिसत नाहीं. कोणता प्रसंग आपणावर येत आहे देव जाणे ! "

अफूच्या गुंगींत असलेल्या माणसाचे डोळे जरी मिटलेले असले तरी कान चांगले उघडे असतात, असा साधारण अनुभव आहे. त्याप्रमाणें नारायणदास निजला होता तरी त्याला त्या तेलिणीचे शब्द ऐकूं आले. " तूं आतां काय ह्मटलेंस? " असें तो ओरडून ह्मणाला व तत्क्षणीं उभा राहिला. बिचारी तेलीण घाबरून गेली. तिच्या तोंडांतून शब्द निघेना. नारायणदासास तिचें ह्मणणें ऐकून चीड आलीच होती. जवळ पडलेली पहार त्यानें एकदम उचलली. त्यानें हातांत पहार घेतलेली पहातांच आतां आपला मृत्यु समीप आला असेंच तिला वाटून ती स्त्री फारच भ्याली; परंतु नारायणदासाच्या मनांत तिला शिक्षा करण्याचा उद्देश मुळींच नव्हता. त्यानें ती पहार तिच्या मानेवर धरून वांकविली व दोन्ही टोकें एकत्र मिळवून सरीसारखीं तिच्या गळ्यांत अडकवून ठेविलीं. आपल्या सामर्थ्याचा असा हा अल्पसा दाखला तिला पटवून तो ह्मणाला " राण्यास मदत करून मी परत येईपर्यंत ही अशीच तुझ्या गळ्यांत असूंदे. तेथपर्यंत दुसऱ्या कोणास ही काढतां आली तर घे काढून ! "

नारायणदास तसाच पुढें चितोर येथें आपल्या स्वारांनिशीं निघून गेला. त्या शहरांत वेढा देऊन बसलेल्या पठाणाच्या तंबूपर्यंत थेट जाऊन त्या सर्व सैन्याचा त्यानें धुव्वा उडविला. शत्रूचें सैन्य वाट फुटेल तिकडे पळून गेलें. सकाळ झाली तेव्हां शत्रूचें सैन्य शहराबाहेर असलेलें पार निघून गेलें व त्या ठिकाणीं बुंदीचा राणा, नारायणदास व त्याचे लोक एवढेच काय ते आहेत, असें पाहून चितोर-

करांस मोठा आनंद झाला. अर्थात्, राण्यानें आणि शहरच्या सर्व लोकांनीं नारायणदासाचें उत्तम प्रकारें स्वागत केलें. मिळालेल्या जयाबद्दल बरेच दिवसपर्यंत मोठा उत्सव करण्यांत आला. नारायणदासाच्या या अचाट पराक्रमाची वार्ता अंत:पुरांत जातांच राण्याची पुतणी या शूर योद्धयाच्या गुणांवर भाळून गेली व "विवाह करीन तर याच वीर्यशाली पुरुषाबरोबर करीन, नाहींपेक्षां आमरण कुमारी राहीन!" असा तिनें निर्धार केला. राजकन्येचा हा निश्चय नारायणदासास समजला तेव्हां तिचा स्वीकार करण्यास तो आनंदानें तयार झाला. राण्याची अनुमति मिळाल्यावर त्या दोघांचा मोठ्या थाटानें विवाह करण्यांत आला. याच राजकन्येच्या पोटीं जिचें अल्प आणि शोकजनक चरित्र आह्मी आमच्या प्रिय वाचकांस आज कथन करीत आहों ती सुजाबाई जन्मास आली.

इसवी सन १५३४ या वर्षी नारायणदास मृत्यु पावला. त्याचा पुत्र राजा सुजा त्याच्या पश्चात् गादीवर बसला. हा राजपुत्र बापासारखा धाडशी आणि सामर्थ्यवान् असून वीर्यशाली पुरुषासारखे गुडघ्यापर्यंत पोंचणारे त्याचे दीर्घ बाहू होते. चितोरच्या घराण्याशीं आपला पूर्वापार चालत आलेला संबंध तसाच कायम ठेवण्याच्या इच्छेनें राजा सुजा यानें चितोरच्या राजकन्येस आपली पत्नी केली, व आपली बहीण सुजाबाई हिचा विवाह चितोरचा राणा रतनसिंह याच्याशीं करून दिला. सुजाबाई सौंदर्यसंपन्न असून आनंदी स्वभावाची असल्यामुळें ती आपल्या पतीस फार प्रिय झाली. परंतु हें तिचें सौख्य थोडक्या काळांत लयास गेलें. सहज अल्लड वृत्तीनें तिच्या हातून अल्पशी चूक झाली व तिचा परिणाम फार भयंकर होऊन मेहुण्यामेहुण्यामध्यें बितुष्ट वाढलें व या वितुष्टाच्या परिणामीं दोघेहि प्राणांस मुकले.

एकदां राजा सुजा चितोर येथें आला असतां सुजाबाईनें मेजवानीचा बेत करून आपल्या पतीस व बंधूस अत्यंत प्रेमानें भोजनास बोलाविलें. स्वतः सुजाबाईनें जेवणाची सर्व तयारी केली, इतकेंच नव्हे, तर हे दोघ मेहुणे भोजन करीत असतां त्यांनां कांहीं हवें नको असेल त्याची व्यवस्था करण्यासाठीं ती त्यांच्याजवळ उभी राहिली. भोजन उरकल्यावर ताटें नेतांना तिनें सहज थट्टेनें ह्मटलें "आमच्या दादानें तर आपल्यापुढचे सारे पदार्थ एखाद्या वाघासारखे बकाबक खाऊन टाकले, परंतु आमच्याकडून मात्र एखाद्या लहान मुलासारखं खेळणंच चाललं होत!"

हे सहज थट्टेनें उच्चारलेले शब्द, परंतु तिच्या दुर्दैवानें यांचा परिणाम भलताच करून सोडला. तिचा पति राणा रतनसिंह याला या शब्दांनीं अतिशय चीड येऊन त्याला आपली मोठी मानहानि झाल्यासारखी वाटली. रजपुतांचा स्वाभिमान ह्मणजे इतकी नाजुक वस्तु असते, कीं, तिला केव्हां कसा धक्का लागेल, हें सांगणें फार कठीण आहे. सहजगत्या घडून आलेल्या गोष्टी विकोपास जाऊन राष्ट्राराष्ट्रांत मोठें रणकंदन कैक वर्षें माजून राहिल्याचीं उदाहरणें इतिहासांत थोडींथोडकीं नाहींत.

आपल्या पत्नीचे हे शब्द ऐकतांच रतनसिंहानें तिच्याकडे अत्यंत क्रोधयुक्त मुद्रेनें पाहिलें. तिच्या भावाकडेहि तो रागारागानें पाहूं लागला. राजा सुजानें त्या बहिणीच्या भाषणाकडे ऐकलें न ऐकल्यासारखें करून त्याला मुळींच महत्व दिलें नाहीं. आपल्या बहिणीनें सहज थट्टेनें उच्चारलेल्या शब्दांत कोणाचाच उपमर्द करण्याचा हेतु नव्हता; असें असल्यामुळें थट्टेइतकेंच तिच्या भाषणास महत्व देऊन जें आपण ऐकलें तें विसरून जावें, असें त्याला वाटलें, व आपल्या मेहुण्याचीहि त्यानें तशीच समजूत घातली. रतनसिंहानें आपली सम-

जूत झाल्यासारखें जरी दाखविलें, तरी त्याच्या मनांत जें वितुष्ट आलें तें आलेंच; तें त्यानें बाहेर दाखविलें नाहीं इतकेंच. आपल्या मेहुण्याचा आदरसत्कार, तो तेथें असल्या मुदतींत त्यानें यथास्थित केला. आपला पूर्वीचा स्नेह कमी झाला नाहीं, असें जरी त्यानें वरकरणी दाखविलें, तरी झालेल्या अपमानाबद्दल पुरा सूड उगवून घेण्याचा त्यानें पक्का निश्चय केला. राजा सुजा याला देहांतशिक्षा दिल्याशिवाय आपला अपमान भरून यावयाचा नाहीं, असें त्यानें ठरविलें.

पुढें आतां जें संकट ओढवणार त्याला आपण कारण झालों, असें सुजाबाईस वाटून तिला फार दुःख झालें. अत्यंत शोकाकुल चित्तानें ती आपल्या खोलींत निघून गेली. आपल्या नवऱ्याचा खुनशी स्वभाव तिला पुरा ठाऊक होता. कांहीं तरी अनर्थ ओढवणार, हें तिला समजून चुकलें. तथापि आपला भाऊ सुखरूप परत गेला व रतनसिंहहि पूर्वीसारखा प्रेमानें वागू लागला, असें पाहून तोंडांतून सहज थट्टेनें बाहेर गेलेल्या शब्दांनीं जें विष पेरलें, त्यापासून पुढें कांहीं भयंकर परिणाम होणार नाहीं, असें तिला वाटलें.

परंतु रतनसिंहाचा बेत झाला तो झालाच. त्याला फक्त अनुकूल वेळच पाहिजे होती. ती वेळ मिळाली ह्मणजे राजा सुजा याला ठार मारावें, असा त्यानें निश्चय केला. मग पुढें आपल्या स्वतःच्या घराण्याची किंवा राज्याची कोणतीहि स्थिति झाली तरी चालेल! त्या गोष्टीचा विचार त्याच्या मनांत मुळींच आला नाहीं. आणि त्यानें मोठ्या हिकमतीनें परंतु अत्यंत निंद्य प्रकारानें आपला डाव साधला.

राजा सुजा आपल्या राज्यांत निघून गेल्यावर थोडक्याच महिन्यांनीं वसंतऋतु प्राप्त झाला. जिकडे तिकडे आनंद आणि उत्सव सुरू झाले. अशा उत्तम समयीं "आपण तुह्मांला भेटावयास येत

आहों," असा निरोप रतनसिंहानें आपल्या मेहुण्यास पाठविला व "वसंतोत्सवाचे चार दिवस आपल्याकडे घालवावे व जमल्यास बुंदीच्या रानांत शिकार करावी," अशी आपली इच्छा त्यानें प्रदर्शित केली. हा निरोप ऐकतांच अर्थातच राजा सुजा याला फार आनंद झाला व "आपल्या येण्यानें आपण फार खुषी होऊं," असा उलट निरोप त्यानें पाठविला. चंबळ नदीच्या पश्चिम तीरापासून थोड्या अंतरावर उंच उंच डोंगर आणि दऱ्या यांनीं युक्त असें रान होतें, तेथें सिंहापासून सशापर्यंत सर्व जातीची शिकार मुबलक होती. तें ठिकाण शिकारीस नेमून टेविलें, व आपल्या मेहुण्याची तो वाट पहात राहिला.

रतनसिंह बुंदी येथें आल्यावर एकदोन दिवसांतच हा शिकारीचा बेत झाला. राजानें आपले लोक रानांत सभोंवार उभे करून जिकडेतिकडे वाद्यांच्या गजरानें आणि इतर आवाजांच्या गर्दीनें रान अगदीं हालवून टाकिलें. या आवाजानें रानांतलीं सर्व जनावरें आपापलीं स्थानें सोडून भयानें जिकडून तिकडून अरण्याच्या मध्यभागीं येऊं लागलीं. सिंह, वाघ, तरस, अस्वल, नाना जातीचीं हरणें, कोल्हे, ससे वगैरे सर्व श्वापदांची एकच धांदल उडाली. अशा ठिकाणीं रजपूत आल्यास त्याला या मृगयेच्या आवेशानें अफूचाहि विसर पडावयाचा. या इतक्या उमद्या देखाव्यापेक्षां त्याला उत्तेजन आणण्यास दुसरें कांहीं नको. ही छोटीशी लढाई, तथापि जिवावरचे प्रसंग यांतहि कांहीं थोडे नसावयाचे.

या वेळीं जी गडबड उडून गेली, ती संधि साधून रतनसिंहानें आपला नीच उद्देश साधण्याचें मनांत आणलें. राजा सुजा याचा प्राणनाश करून आपल्या अंतःकरणांत धुमसत असलेला वैराग्नि शम-

बावा, असा विचार करून प्रत्येकाचें लक्ष्य मृगयेनें वेधून गेलें असतां हा आपल्या बाणास बुंदीच्या राण्याच्या मर्मस्थानाची वाट दाखविण्यास उद्युक्त झाला. रीतीप्रमाणें दोनचार विश्वासू शिकारी आपल्याजवळ घेऊन दोघे राजपुत्र थोड्या अंतरावर सोईच्या जागीं श्वापदांस मारण्यासाठीं धनुष्यास बाण लावून टपत राहिले. बाकीचे सर्व लोक रान काढण्यांत जिकडे तिकडे गुंतले होते. बहुतेक सर्व लोक दृष्टीच्या आड झाले, असें पाहून राणा रतनसिंह यानें "आतां हा डुकर ठार करण्यास चांगली संधि आहे," असा इशारा आपल्याजवळच्या एका इसमास केला.तत्क्षणीं त्याच्या धनुष्यापासून एक तीव्र बाण मोठ्या वेगानें सुजा राजाकडे गेला. बुंदीच्या राण्यानें तो बाण आपणाकडे येत आहे असें पाहिलें व आपल्या धनुष्याच्या तडाख्यानें त्यानें तो एकीकडे सारला. या कृत्यांत कांहीं दुष्ट हेतु असेल, असें त्याला मुळींच वाटलें नाहीं. सहज चुकून तो बाण निसटला असेल, असाच विचार त्याच्या मनांत त्या वेळीं आला. इतक्यांत दुसरा एक बाण तसाच आला, तेव्हां मात्र त्याचे डोळे उघडले. त्यानें तोहि बाण चुकविला.

हा दुसरा बाण चुकून जमिनीवर पडतो न पडतो इतक्यांत रतनसिंह घोडयावरून मोठ्या वेगानें त्याच्याजवळ आला, आणि त्यानें सुजा राजावर आपल्या तरवारीचा एक सज्जड वार करून त्याला जमिनीवर लोळविलें. बुंदीचा राणा भूमीवर थोडा वेळ त्या आघातानें निचेष्ट पडला. परंतु लगेच देहभानावर येऊन त्यानें तरवारीची जखम आपल्या शेल्यानें गच्च बांधिली. रतनसिंह आपलें काम झालें असें पाहून परत जात असतांना राजा सुजा यानें धिक्कारयुक्त शब्दांनीं त्याला हांक मारली. "काय, काम अर्धें राहिलें ?" असें ह्मणत रतनसिंह एकदम मागें फिरला व आपल्या जखमी झालेल्या मेहुण्यास

पुनः तरवारीनें भोसकण्यास उद्युक्त झाला. हें नीचपणाचें कृत्य करण्यासाठीं त्यानें उगारलेला हात राजा सुजानें मोठ्या आवेशानें धरून त्याला घोड्यावरून एकदम खालीं ओढलें. दोघेहि बरोबर जमिनीवर पडले. रतनसिंह सुजा राजाच्या अंगाखालीं सांपडला. होती नव्हती तेवढी शक्ति एकवट करून त्याच्या छातीवर आपला गुडघा खूब जोरानें दाबून सुजा राजानें आपल्या डाव्या हातानें त्याचें नरडें घट्ट आवळून धरलें. लगेच उजव्या हातानें कमरेची कट्यार काढून ती तत्क्षणीं त्यानें रतनसिंहाच्या उदरांत खुपसली. चितोरचा राणा तर तेव्हांच गतप्राण झाला. सुजा राजाहि लगेच खालीं पडला व त्याच्या मागोमाग तोहि मरण पावला.

ही शोकजनक बातमी तात्रडतोब बुंदी व चितोर या दोनहि ठिकाणीं जाऊन थडकली. या दोनहि घराण्यांत जो हाहाःकार उडाला, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. या भयंकर प्रसंगाचा हासभास पूर्वीं कोणालाच नसल्यामुळें ज्यालात्याला हें वर्तमान ऐकून फारच विस्मय वाटला. राण्या तर या वर्तमानानें शोकाकुल होऊन बेशुद्ध पडल्या. रतनसिंहाची पत्नी सुजाबाई इला आपल्या पतीचें आणि बंधूचें हें निधनवृत्त ऐकतांच पूर्व प्रसंगाचें स्मरण झालें व तिला जो शोक झाला, त्याला पारच राहिला नाहीं. सहज थट्टेनें उच्चारलेल्या शब्दांचा हा असा भयंकर परिणाम झालेला पाहून तिला या अत्यंत शोकजनक प्रसंगाचें सर्व कारण आपणच असें वाटून पश्चात्तापाच्या अत्यंत तीव्र अशा वेदना होऊं लागल्या. "कशी कर्मासारखी बुद्धि झाली आणि आपल्या तोंडून ते शब्द निघाले!!! नाहीं तर या दोन राजपुत्रांत वितुष्ट येण्यास दुसरें कोणतेंच कारण नव्हतें," असें वारंवार तिच्या मनांत येऊन तिला पुष्कळ दुःख झालें.

लगेच दुसऱ्या, परंतु तितक्याच हृदयद्रावक प्रसंगाची तयारी झाली. सुजाबाईनें आपणास आतां क्षणभरहि जिवंत राहावयाचें नाहीं, असा आपला निश्चय कळविला. तिची भावजई जी सुजा राजाची राणी तिचाहि हेतु तसाच होता. हे दोनहि मेहुणे ज्या ठिकाणीं मरून पडले होते, त्याच शिकारीच्या जागेवर दोन चिता तयार करण्यांत आल्या. त्या उभयतां तरुणींनीं भग्नहृदय होऊन त्या चितांवर आरोहण केलें आणि अग्निमुखानें आपापल्या पतिसन्निध सूर्यलोकीं प्रयाण केलें.

ज्या ठिकाणीं हे योद्धे पडले, तेथें एक दगडी स्मारक केलेलें आहे. तें पाहतांच या हृदयद्रावक प्रसंगाची आठवण होऊन अंगावर कांटा उभा राहतो. दुर्दैवी सुजाबाईचेंहि असेंच दुसरें स्मारक तेथें आहे; परंतु तें पहाडाच्या उंच भागीं आहे. या स्मारकापाशीं गेलें ह्मणजे त्या अरण्यभूमीची सर्व शोभा एकवटून प्रेक्षकाच्या दृष्टीसमोर आपल्या संपूर्ण वैभवानें उभी राहते. ती पाहून सृष्टिसौंदर्यानें मन तल्लीन होऊन जातें व त्यांतच सुजाबाईचा शोकजनक वृत्तांत ऐकिला ह्मणजे ऐहिक वैभवाचें क्षणभंगुरत्व आणि दैवाची विचित्र करणी हीं मनांत येऊन ऐहिक सौख्य आणि महत्त्वाकांक्षा केवळ जलबुद्बुदासारख्या अस्थिर आणि भ्रामक आहेत, अशी खातरी पटून मन परमार्थाच्या ठायीं त्या वेळेपुरतें तरी लीन होतें!

## कुमारी कृष्णा.

सुंदर आणि सुवासिक फुलें बागेस शोभा आणतात आणि बागवानाची रुचि आणि कौशल्य यांची साक्ष देतात. विधाताहि आपल्या

सृष्टीस शोभा आणण्यासाठीं सौन्दर्य आणि सौजन्य ह्यांनीं युक्त अशीं माणसें निर्माण करीत असतो. इतर सृष्टींतहि हाच प्रकार दृष्टीस पडतो. सृष्टीचें हें रमणीय स्वरूप जसें सात्विक गुणांचें आदिकारण आहे, तसेंच लोभ, मोह वगैरे तामसी वृत्तींसहि यांच्या योगानें उत्तेजन विशेष मिळतें. क्षीराब्धींतील महा तेजस्वी रत्नें बाहेर निघतांच देवदानवांतील सलोखा मोडला आणि युद्ध सुरू झालें. रत्नांचें संरक्षण करण्यासाठीं देव धावले, तर त्याचा उपभोग घेण्यासाठीं दैत्यांनीं शस्त्रें उचललीं. सृष्टींत जें कांहीं चांगलें असेल त्याच्या सभोंवार नेहमीं रणकंदन चाललेंच आहे. त्यांतल्या त्यांत स्त्रीमोह हा मानवजातींत निरंतरच्या कलहास विशेष कारणीभूत झालेला आपण पाहतों. स्त्रीमोहानें तामसी वृत्ति उच्छृंखळ होते, त्याप्रमाणें स्त्रीप्रेम आणि स्त्रीमहत्व शौर्यवीर्यादि गुणांचा परिपोष करितात. स्त्रियांचें महत्व, त्यांच्याविषयीं आदरबुद्धि आणि त्यांच्यासाठीं स्वार्थत्याग हीं गृहस्थी बाण्याचीं मुख्य लक्षणें होत. रजपुतांच्या स्वभावांत हा बाणा विशेष दिसून येतो. स्त्रियांची अब्रू संरक्षण करण्याच्या कामीं रजपुतांचें शौर्य आणि स्वाभिमान यांनीं आपलें जाज्वल्य स्वरूप राजपुतान्याच्या इतिहासांत जागोजाग प्रगट केलेलें आपण पाहतों. तथापि आजचा चरित्रविषय जी कुमारी कृष्णा, तिचा अत्यंत शोकजनक निधनवृत्तांत पाहिला, ह्मणजे त्या वेळीं रजपुतांचा हा बाणा बराच निस्तेज झाला असल्याचें दर्शनास येतें.

प्राचीन अन्हलवारच्या राजकुळांत व चामूरवंशांत कृष्णेच्या आईचा जन्म झाला होता. सर्व राजपुतान्यांत ज्याचा श्रेष्ठ दर्जा, अशा मेवाडच्या राण्याची कृष्णा ही कन्या होय. यावरून या राजकन्येचें कूळ ह्मणजे सर्व हिंदुस्तानांत उत्तमांतलें उत्तम होतें, हें कोणाच्याहि लक्ष्यांत येईल. जन्म, जात, कूळ, रूप आणि स्वभाव या सर्व बाबतींत उत्कृ-

ष्टतेनें विराजित अशी ही भारतसुंदरी शरज्ज्योत्स्नेप्रमाणें सर्व लोकांच्या नेत्रांस आनंदवीत यौवनाच्या आनंदवनांत लीलेनें प्रवेश करूं लागली.

इसवीसन १९०४ या वर्षीं इंग्रजांनीं शिंदे व होळकर यांच्यावर मोठमोठे जय मिळविले, परंतु या जयांबद्दल रजपूत लोकांस प्रायश्चित भोगावें लागलें. मराठ्यांस एकसारखे पराजय मिळत जाऊन त्यांचा पुरा मोड झाला. त्यांचें प्रतिकारसामर्थ्य सर्व नष्ट होऊन या पराजयांनीं त्यांची पुरी फजिती उडाली. आपला रिकामा झालेला खजिना पुनः भरून काढून इंग्रजांबरोबर फिरून टक्कर द्यावी, अशा हेतूनें होळकर राजपुतान्यांत शिरला. आपल्याबरोबर मोठें सैन्य घेऊन मेवाडचा राणा व इतर रजपूत राजे यांनां आपल्या मदतीस खेंचण्याचा त्यानें बेत केला.

मेवाडच्या राण्यापासून त्यानें चाळीस लाख रुपयांची मागणी केली. त्यापैकीं एकतृतीयांश ताबडतोब देण्याविषयीं होळकरानें त्याला सांगितलें. राजानें आपल्याजवळ होतें नव्हतें तें सर्व एकत्र करून व शहरांतील लोकांपासून निघेल तितकें काढून बारा लक्ष रुपये मोठ्या शिकस्तीनें उभे केले. हे बारा लक्ष रुपये व बाकीच्या रकमेबद्दल आपल्या घरण्यांतील ओलीस ह्मणून कांहीं इसम त्यानें नाइलाज होऊन होळकराच्या छावणींत पाठवून दिले. परंतु एवढ्यानें होळकराची तृप्ति झाली नाहीं. तो मेवाडप्रांतांत आठ महिने लुटालूट करीत राहिला व त्यानें सर्व प्रांत अगदीं उजाड करून टाकिला.

आतां याच्यापेक्षां अधिक बिकट आणि अधिक मानहानीचा असा प्रसंग येणें शक्य असेल असें कोणालाहि वाटलें नाहीं; परंतु दुःख अथवा सुख यांची इयत्ता ठरविणें नेहमीं कठीण असतें. दैव फिरलेलें

असलें ह्मणजे दुःख संपलें असें केव्हांहि मानतां येण्यासारखें नसतें. ही मराठ्यांची वावटळ होतें नव्हतें तें सर्व झाडून घेऊन गेली, तथापि याच्याहिपेक्षां अत्यंत दुःखद असा प्रसंग या बिचाऱ्या राण्यावर यावयाचा होता. आपलें अप्रतिम सौन्दर्य आणि निःसीम प्रेम यांच्या योगानें मेवाडची राजकन्या कृष्णा आपल्या पित्याचें आनंदस्थान होऊन राहिली होती, ही अत्यंत सुशील व निरपराधी बालिका असूनहि दुष्ट दैवानें हिला निमित्तमात्र पुढें केलें व तिच्या पित्यावर मोठ्या दारुण प्रसंगाची रवानगी केली.

कृष्णा कुमारीचें सौन्दर्य तिच्या बापावर प्रसंग आणण्यास कारण झालें. या लावण्यकुसुमाकडे पुष्कळांचे नेत्र वेधून गेले. आसपासच्या राजेरजवाड्यांपैकीं बऱ्याच राजतरुणांस कृष्णा आपणास प्राप्त व्हावी, अशी प्रबळ इच्छा उत्पन्न झाली. त्या सर्वांत जयपूरचा शूर जगत्सिंग हा मेवाडच्या राण्यास पसंत वाटला व त्याला आपली कृष्णा अर्पण करावी असें त्याच्या मनानें घेतलें. या राजपुत्रानें पुष्कळ नजराण्यानिशीं तीन हजार सैन्य कृष्णेच्या बापाकडे पाठविलें आणि रीतीप्रमाणें मागणी घातली.

तथापि या वेळीं एक निराळेंच संकट उभें राहिलें. मारवाडचा राजा मानसिंग याला या राजकन्येविषयीं अभिलाष उत्पन्न झाला होता. आपल्या पूर्वी गादीवर असलेल्या राजपुत्रास कृष्णेचें विधिपूर्वक वाग्दान झालेलें होतें, अर्थात् त्याच्या पश्चात् आपण गादीवर आल्यामुळें तिचा विवाह आपल्याशींच झाला पाहिजे, असें मानसिंगाचें ह्मणणें पडलें. या आपल्या हक्काच्या विरुद्ध मेवाडच्या राण्यानें आपल्या मुलीचा विवाह दुसऱ्या कोणाशीं करण्याचें मनांत आणल्यास आपण अवश्य प्रतिबंध करूं, असें त्यानें बजाविलें.

या तंट्याची हकीगत मराठ्यांचा सरदार शिंदे यास समजतांच त्यानें आपलें सर्व वजन मानसिंगाच्या तर्फेनें खर्ची घातलें. कारण इतकेंच, कीं, त्याची पैशासंबंधाची मागणी जयपूरच्या राण्यानें झिडकारली होती. जयपूरचें सैन्य मेवाडच्या राजधानीस जाऊन पोहोंचल्याची बातमी शिंद्यास समजतांच त्यानें ताबडतोब जासूद पाठवून जयपूरच्या राण्यास आपली कन्या देऊं नये ह्मणून मेवाडच्या राण्यास निरोप पाठविला. शिंद्याचा निरोप अशा प्रकारचा आल्यामुळें मेवाडच्या राण्यास अतिशय संताप आला व होईल तितकें करून विवाहविधि लौकर उरकून घेण्याचा त्यानें निश्चय केला.

शिंदे नुसता निरोप पाठवूनच स्वस्थ राहिला नाहीं तर त्यानें निरोपाच्या पाठोपाठ आठ हजार सैन्य रवाना केलें. हें सैन्य मेवाडच्या राजधानीच्या अगदीं जवळ येऊन तळ देऊन राहिलें. शिंद्याची अशी निकड लागल्यामुळें जयपूरच्या सैन्यास परत पाठवून शिंद्याच्या ह्मणण्याप्रमाणें करण्याशिवाय मेवाडच्या राण्यास गत्यंतर नव्हतें.

परंतु असा अपमान सोसून घेण्याइतकें जयपूरच्या राण्याच्या रजपूततेजास मंदत्व आलें नव्हतें. त्याला या गोष्टीची अतिशय चीड आली. झालेल्या अपमानाचा सूड उगविण्यासाठीं त्यानें प्रचंड सेना तयार केली. तशी तयारी रजपुतांच्या त्या -हासकाळांत कोणीं पाहिली नव्हती. इकडे मानसिंगानेंहि तशींच जय्यत तयारी केली. या दोनहि सैन्यांचा भयंकर युद्धसंग्राम होऊन त्यांस दोनहि बाजूंचे पुष्कळ लोक मरण पावले. परंतु अखेरीस कोणीहि हारीस येईना व आपला हट्ट सोडीना. कैक महिने उभय सैन्यांच्या लढाया चालूच होत्या.

उभय राजपुत्रांमध्यें हा तंटा अशा निकरानें चालला असतां अमीरखान नामक पठाणानें कृष्णा कुमारीच्या बापास एक अत्यंत नीच-

पणाची सूचना केली. ही त्या दुष्ट काळसर्पाची सूचना राण्यानें मान्य केल्यामुळें पुढें जो घात झाला, त्यामुळें या भाग्यहीन सुंदरीचें चरित्र अत्यंत शोकजनक झालें आहे. कृष्णाकुमारीच्या चरित्राइतकी हृदयद्रावक गोष्ट मानवजातीच्या इतिहासांत क्वचितच घडून आली असेल. या अमीरखानाइतका दुरात्मा साऱ्या देशांत त्या वेळीं दुसरा कोणी नव्हता, असें ह्मटलें असतां चालेल. या निरपराधी, निर्दोष अशा कुमारिकेस जगांतून नाहींशी करून तंट्याचें मूळच नष्ट करावें, असा कर्णमंत्र या अघोरकर्म्यानें तिच्या बापास सांगितला.

हा दुष्ट खान आपल्या स्वतःच्या इतकाच दुष्ट आणि नीच असा एक साथीदार बरोबर घेऊन मेवाडची राजधानी उदेपूर येथें आला, व राण्याची मुलाखत घेऊन त्यानें आपला दुष्ट बेत राण्यास कळविला. चाललेल्या कलहाग्नींत आपल्या लाडक्या मुलीच्या प्राणांची आहुति देऊन तो शमविण्याचा हा बेत ऐकून राणा अत्यंत क्रोधायमान झाला, परंतु "तुमच्या राज्यास जास्त शांतता आणि सुरक्षितपणा असावा असें तुह्मांला वाटत असेंल तर हीच एक तोड आहे," असें खानानें त्याला निकरानें सांगितल्यामुळें त्याच्या मनाला मोठा विचार पडला. अखेरीस मोठ्या दुःखानें त्याला ही गोष्ट मान्य करावी लागली. आपल्या पोटच्या गोळ्याचा अशा कामासाठीं घात करण्यास तयार होणें ह्मणजे नामर्दपणाची आणि अमानुषपणाची पराकाष्ठा होय ! केवढेंहि मोठें संकट येणार असलें तरी कृष्णा कुमारीसारख्या गुणसंपन्न व सुकुमार कन्येचा घात करण्याइतक्या नामर्दपणाच्या कामास तयार होऊन या राण्यानें आपल्या क्षात्रधर्मास आणि रजपूत बाण्यास कायमचा कलंक लावून घेतला.

कृष्णाकुमारीचा जवळचा नातलग महाराजा दौलतसिंग याला राण्यानें आपला हा अमानुष विचार अंमलांत आणण्याचें काम सांगितलें. हा हुकूम ऐकतांच त्या बिचाऱ्याच्या अंगावर तर शहारेच आले. "आग लागो तुमच्या त्या जिव्हेला ! अशा कृत्यानें स्वामिभक्ति दाखवावयाची असल्यास मला ती स्वामिभक्तिच नको ! " असें ह्मणून तो तेथून निघून गेला. नंतर जवानदास ह्मणून एक राण्याचा दासीपुत्र होता, त्याला राण्यानें आपणावर ओढवलेला प्रसंग निवेदन केला. हें काम पार पडलें तरच आलेल्या प्रसंगांतून निभावणें शक्य आहे; शिवाय, हें काम हलक्या माणसाच्या हातून करण्यासारखें नाहीं, वगैरे अनेक प्रकारांनीं त्याची समजूत घालून त्याला या कामास तयार केलें. त्यानें मोठ्या दुःखानें ती गोष्ट कबूल केली; परंतु यौवनचंद्रिकेनें सुप्रकाशित अशी ती लावण्यलतिका पाहतांच त्याचे हात गळल्यासारखे होऊन त्यांच्या हातांतला खंजीर खालीं पडला. धिप्पाड शत्रूच्या निधड्या छातींत मोठ्या त्वेषानें घुसणारा त्याचा खंजीर जणुं काय त्या कोमलांगीचें कोमलतर हृदय पाहून दयेनें विरघळला ! आपल्या हातून होणाऱ्या घोर पातकाचें उग्र स्वरूप जवानसिंगाच्या डोळ्यांसमोर उभें राहिल्यासारखें होऊन त्याची गाळण उडाली व तो तेथून निघून गेला.

इतक्यांत या अत्यंत नीच आणि निर्दयपणाच्या बेताची वार्ता राजवाड्यांत पसरून एकच हाहाःकार उडाला. कृष्णा कुमारीच्या आईच्या आरोळ्यांनीं सर्व वाडा दणाणून गेला. आपल्या मुलीला वांचविण्यासाठीं ती ज्याची त्याची करुणा भाकूं लागली. या निर्दय कृत्यास प्रवृत्त झालेल्या लोकांस ती अनेक परींनीं शापूं लागली. त्या सर्व राजवाड्यांत

खुद्द कृष्णेनें तेवढी आपली वृत्ति अगदीं शांत ठेविली होती. जी कर्मगति आतां आपणास भोगावी लागणार तिला ती तयार होती.

तिच्या सर्वांगसुंदर व कोमल शरीरांत आनंदानें वास करणाऱ्या प्राणास खंजिरानें बाहेर ओढून काढण्याची छाती कोणासहि होईना. अखेरीस तें काम विषप्रयोगानें पार पाडण्याचें ठरलें. कोणातरी ममतेच्या स्त्रीकडून तिला विष द्यावयाचें असा बेत झाला; परंतु तें तर मुळींच शक्य नव्हतें. बरीच भवतिनभवति होऊन एका माणसाच्या हातीं विषाचा पेला देऊन राण्याच्या नांवानें तो कृष्णेकडे पाठविण्यांत आला.

राजकन्येनें तो पूज्यबुद्धीनें पित्यास नमन करून ग्रहण केला, व तें विष पिण्याच्या पूर्वी आपल्या प्रिय पित्याचें बरें व्हावें ह्मणून तिनें परमेश्वराची भक्तिभावानें प्रार्थना केली. तिची आई तर दुःखानें भ्रमिष्ट झाली होती. तिनें राण्याला शाप दिला; परंतु कुमारी कृष्णेच्या नेत्रांतून मुळींच अश्रु आले नाहींत ! एवढेंच नव्हे तर उलट ती आपल्या आईची समजूत घालूं लागली. ती ह्मणाली "आई, तूं कां शोक करितेस ? माझ्या या वयांत मला मरण आलें तर माझीं सर्व पुढचीं दुःखें नाहीं का टळलीं ? मरण मला मुळींच भयंकर वाटत नाहीं. मी तुझी मुलगी नव्हे का ? मग मीं मरणाला काय ह्मणून भ्यावें ? बोलूनचालून आह्मी रजपुतांच्या मुली. आह्मीं जन्मास आलों ह्मणजे आमच्याबरोबरच मृत्यूचें गांठोडें असावयाचें. जगांत राहण्यासाठीं थोडाच आमचा जन्म असतो ! मी आजपर्यंत जगलें हेंच माझें मोठें भाग्य. खरोखर, माझ्या प्रिय पित्याची मी कितीतरी ऋणी आहें." असें सांगून तिनें आपल्या आईचें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला.

याप्रमाणें ती बोलत असतां तिला उलटी होऊन सर्व विष बाहेर पडलें. तिच्या शुद्ध रक्तांत त्या जालिम विषास मिसळतां येईना. परत

दुसरा पेला तयार केला, परंतु कृष्णेनें तो घेतल्यावर त्याचीहि पहिल्यासारखीच दशा झाली. तिच्या धैर्याची कसोटी पाहण्यासाठींच जणूं काय लगेच तिसरा पेला तयार झाला, परंतु तोहि टिकला नाहीं! हें मेवाडचें घराणें स्थापन करणाऱ्या मूळ पुरुषाच्या अंगीं जो दैविक गुण होता तो या कुमारीच्या ठाईं पूर्णपणें वास करीत असल्यामुळेंच कीं काय कोण जाणे, तिच्या विमल शरीरास मृत्यु स्पर्श करील असें वाटेना. तीन वेळ विष दिलें असून तें तिच्या पोटांत टिकेना. तेव्हां फिरून आणखी एकदा प्रयत्न करण्याइतक्या राक्षसी निष्ठुर कृत्यास कोणी तयार होईल असें वाटलें नव्हतें; परंतु खान आणि अजित यांच्या पाषाणहृदयांवर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. त्यांच्या अंतःकरणांस दयेचा पाझर फुटेना. प्रत्येक फुकट गेलेल्या प्रयत्नानें त्यांचीं हृदयें अधिकाधिक घट्ट होऊन त्यांचा निश्चय अधिकच जोरावर आल्यासारखा झाला. आतां त्यांनां आपला बेत केव्हां तडीस जाईल असें झालें. त्यांनीं फिरून एक जालीम कालकूट तयार केलें. हा चवथा पेला हातीं घेऊन कृष्णेनें मंदस्मितपूर्वक लगेच तो पिऊन टाकिला. व "देवा, आतां तरी यांचा प्रयत्न सफल होऊं दे," अशी तिनें प्रार्थना केली. या वेळीं मात्र तिची प्रार्थना देवानें ऐकली. हें चवथ्यांदा दिलेलें विष पिऊन ती जी झोंपीं गेली ती पुनः वर उठली नाहीं! या पातकी, नामर्द आणि निर्घृण जगांत तिच्यासारख्या शुद्ध प्राण्यांस अतःपर ठेवूं नये म्हणून विधात्यानें तिच्यासाठीं स्वर्गलोकीं उत्तम योजना करून ठेवली. याप्रमाणें तिच्या घातास उद्युक्त झालेल्या नरपशूंचा हेतु पूर्ण झाला.

कृष्णा कुमारीच्या आईस जो शोक झाला त्याचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे. तिनें आपल्या प्रिय कन्येचा असा शेवट झाल्यानंतर

जें आंथरूण धरलें, ती पुनः वर उठली नाहीं. तिचाहि शेवट लवकरच झाला.

ही दुःखद वार्ता राजपुतान्यांत पसरली तेव्हां सर्व लोकांचीं मनें अत्यंत शोकविव्हल झालीं. सर्वांस हें नीच कृत्य करणाऱ्या अधमांचा अतिशय संताप आला. कृष्णाकुमारीचा घात करून राजस्थानच्या लक्ष्मीचें हरण करणाऱ्या राक्षसास जो तो शिव्याशाप देऊं लागला. कुमारी कृष्णेचें सौंदर्य, सौजन्य आणि पितृभक्ति हीं सर्व लोक आठवूं लागले. तिच्या मरणास आज इतकीं वर्षे झालीं तरी, जेव्हां रजपूत घरांतून अथवा लष्कराच्या तळावर छावणींतून तिच्या हृदयद्रावक अंतसमयाचें स्मरण रजपूत स्त्रीपुरुषांस होतें तेव्हां त्यांचे कंठ भरून येतात व डोळ्यांतून अश्रुधारा चालतात!

## राजमाता जिजाबाई.

माता ही सर्वांची आद्यगुरु होय. आद्यशिक्षण सर्वांनां मातेकडून प्राप्त होतें. हें शिक्षण जसें असेल तसा पुढील शिक्षणाचा परिणाम माणसाच्या वर्तनावर व स्वभावावर व्हावयाचा, हें उघड आहे. मातृ-शिक्षणांत दोष असल्यास पुढें कितीहि चांगल्या शिक्षणाचा योग लाभला, तरी हे मूळचे दोष मनुष्याच्या पुढील वर्तनांत दिसून आल्या-शिवाय रहावयाचे नाहींत. 'खाण तशी माती,' आणि 'आई तशीं मुलें,' असें जें ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं.

स्त्रियांची सदाचारसंपन्नता राष्ट्राच्या उन्नतीस पुष्कळांशीं कारणीभूत होते. मातेचा करारीपणा आणि इतर सद्गुण मुलांमध्यें उतरतात. जगाच्या इतिहासांत ज्यांनीं आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेविलें आहे, त्यांच्या मोठेपणाचें कारण मातृशिक्षणांतच असलेलें पुष्कळ

ठिकाणीं आढळून येतें. शिकंदर बादशहा, आलफ्रेड धि ग्रेट, रशियाचा बादशहा पीटर, फ्रान्सचा बादशहा नेपोलियन इत्यादि महत्पदास पोहोंचलेल्या पुरुषांत ज्या गुणांचा उत्कर्ष झालेला आपण पाहतों, त्या गुणांचें बीजारोपण मातृशिक्षणानें त्यांच्या स्वभावांत लहानपणींच करून ठेविलें होतें. सभोंवतालच्या परिस्थितीचें निरीक्षण करून महत्पद प्राप्त करून घेण्यास मातृशिक्षणानें उत्पन्न झालेल्या गुणांचें या पुरुषांस उत्तम साहाय्य झालें. परंतु परिस्थिति पूर्णपणें ओळखून तज्जन्य संकटांतून मोठ्या धैर्यानें आणि शहाणपणानें पार पडून महत्वाकांक्षेचा विवक्षित मार्ग निश्चितपणानें दाखविणाऱ्या व तदनुरोधानें आपल्या पुत्रांच्या हातून पराक्रम करविणाऱ्या आया फारच थोड्या. यांमध्यें पांडवांची आई कुंती आणि शिवाजीची आई जिजाबाई, यांचा अंतर्भाव होतो. पांडव अगदीं लहान असल्यापासून तों भारती युद्धांत ते विजयी होऊन सर्व राज्याचे अधिकारी होईपर्यंत कुंती जिवंत होती. आपल्या पांचहि मुलांचें लहानपणापासून सुशिक्षापूर्वक संवर्धन तिच्याकडून झालें. लहानपणीं त्यांच्यावर आलेल्या अनेक संकटांतून तिनें त्यांचें मोठ्या धैर्यानें आणि शहाणपणानें रक्षण केलें. पुष्कळ बिकट प्रसंग आले तरीं आपल्या मुलांचा तेजोभंग तिनें होऊं दिला नाहीं. यादवांचें सख्य तिनें मोठ्या धोरणानें संपादिलें. फार काय, भारतीयुद्धांत कुंतीचें पुत्रवात्सल्य आणि धोरण यांच्या योगानें अखेर यश संपादण्याच्या कामीं पांडवांस मोठीच मदत झाली.

जिजाबाईचें चरित्र आरंभापासून मनांत आणलें व शिवाजीच्या जन्मापासून तिच्या हयातींत रंगारूपास आलेल्या स्वराज्यापर्यंत लोटलेल्या काळाचा विचार केला, ह्मणजे तिच्या आणि कुंतीच्या चरित्रांत बरेंच साम्य दिसून येतें.

दक्षिणेंतील मुसलमानी राज्य जवळजवळ दोनशें वर्षें चाललें. हें मुसलमानी राज्य ह्मटलें ह्मणजे ज्याला ब्राह्मणी किंवा बहामनी राज्य अशी इतिहासांत संज्ञा आहे, तें होय. सोळाव्या शतकाच्या आरंभीं या राज्याचे तुकडे होऊन बेदर, त्याच्या उत्तरेस वऱ्हाड आणि अहमदनगर, व दक्षिणच्या बाजूस विजापुर आणि गोवळकोंडें, अशीं पांच निरनिराळीं स्वतंत्र राज्यें झालीं. मुसलमानांची एकजातीय सत्ता करून तिच्या द्वारें लोकांवर बादशाही अंमल चालविण्याची पद्धत बहामनी राज्याच्या ऐन अमदानींतहि शक्य नव्हती. या राज्यांत महाराष्ट्रीयांस आपली महत्वाकांक्षा तृप्त करून घेण्यास राज्यकारभाराच्या सर्व खात्यांत पुष्कळ अवकाश असे. बहामनी राज्याच्या तुटक शाखा झाल्यावर मराठ्यांचें वजन प्रत्येक दरबारांत जास्त वाढलें. एकेकाच्या पदरीं राहून मराठे सरदार पराक्रम गाजवीत. कांहीं घराणीं तर आपसांत युद्धसंग्राम करणाऱ्या मुसलमानी राज्यांत कोणता तरी तेवढ्यापुरता पक्ष घेऊन मिळलेल्या योग्यतेप्रमाणें कमीअधिक स्वतंत्र सरंजामानें राहत असतात. या ज्या बहामनी राज्याच्या पांच शाखा झाल्या, त्यापैकीं विजापुर आणि अहमदनगर या दोन राज्यांशीं आमच्या चरित्रनायिकेच्या जीवनवृत्ताचा अत्यंत निकट संबंध आहे. त्या वेळीं महाराष्ट्रांत जीं अत्यंत प्रसिद्ध व योग्यतेस आलेलीं घराणीं होतीं, त्यांत शिंदखेडच्या जाधवरावांचें घराणें सोळाव्या शतकाच्या पूर्वार्धांत मोठ्या लौकिकास आलेलें होतें. जिजाबाईचे वडील शिंदखेडचे देशमुख लुकजी जाधवराव, हे अहमदनगरच्या निजामशाहींत एक सरदार होते. हे देवगिरीच्या यादवांचे वंशज असून निजामशाहीकडून त्यांनीं बारा हजार स्वारांची मनसब होती, व खर्चासाठीं जहागिरीदाखल बराच मुलूखहि मिळालेला होता.

जिजाबाईचें सासरचें घराणें ह्मटलें ह्मणजे आज सर्व महाराष्ट्रांत अत्यंत पूज्य आणि प्रसिद्ध असें जें भोंसले घराणें तें होय. जाधवरावांच्या अमदानींत हें भोंसले घराणें अमावास्येच्या लुप्ततेज चंद्रासारखें होतें असें ह्मटलें असतां चालेल. अयोध्याप्रांतीं राज्य करणारे जे सूर्यवंशी सिशोदे राजे, त्यांच्या कुळांतील एका पुरुषानें नर्मदेच्या दक्षिण तीरीं एक लहानसें राज्य स्थापन केलें होतें. शिसोद्यांची ही जी शाखा खालीं नर्मदातीरीं आली होती, तिनेंच पुढें चित्रकूट अथवा चितोरच्या इतिहासप्रसिद्ध रजपूत घराण्याची स्थापना केली. पुढें चितोरकरांनीं यवन बादशहांशीं अनेक प्रसंगीं दारुण युद्धसंग्राम करून अल्लाउदिनानें चितोरची नासाडी केल्यानंतर या घराण्यांतील उरलेल्या अल्पवयी राजपुत्रांस निबिड अरण्यें, डोंगर आणि दऱ्या यांचा आश्रय करावा लागला. राण्याच्या अतिशय आग्रहामुळें नाइलाज होऊन राजपुत्र अजयसिंह अल्लाउद्दीनाच्या वेढ्यांतून निसटून बाहेर पडला, व त्यानें आपल्याबरोबर आपल्या ज्येष्ठ बंधूचा अल्पवयी मुलगा जो हम्मीरसिंह त्यालाहि नेलें. या दोन राजपुत्राशिवाय चितोरच्या घराण्यांतील सर्व पुरुष त्या संग्रामांत गारद झाले. या चुलत्यापुतण्यांनीं आपल्या कुळास साजेल असा पराक्रम करून तशा स्थितींतहि आपलें तेज प्रगट केलें. त्यांच्या अंगीं यवनद्वेष पुरा बाणलेला होता. या उभयतांनीं थोडथोडा मुलूख काबीज करून जागजागीं आपलीं ठाणीं बसविलीं व नवीन किल्ले बांधून उदेपूर येथें आपली गादी स्थापन करून तेथें ते आपल्या स्वतंत्रतेचें क्षात्रतेजानें संरक्षण करीत राहिले.

या अजयसिंहाचा पुत्र सजनसिंह यानें दक्षिणेत सेंधवाड प्रांत काबीज करून तेथें एक स्वतंत्र गादी स्थापन केली. तेथेंहि यवनांशीं त्याचे एकसारखे युद्धसंग्राम चालू होते. तथापि सजनसिंहानें स्थापन

केलेली ही गादी चार पिढ्यांपर्यंत चालली. चवथा पुरुष जो देवराजजी महाराणा, त्याच्या कारकीर्दीत यवनांचा जोर अगदीं अनावर होऊन त्याला गादीचा त्याग करणें भाग पडलें. देवराजजी महाराणा तेथून निघाला तो तसाच खालीं दक्षिणेकडे येऊन कृष्णा व भीमा या नद्यांच्या तीरीं पाळेगारी करून राहीला. या राण्यानें आपलें नांव बदलून तो आपणास भोसावंत भोंसले असें ह्मणवूं लागला. हाच राणा महाराष्ट्रप्रसिद्ध जें भोंसल्यांचें क्षत्रिय घराणें त्याचा मूळपुरुष होय. येथेंहि या घराण्याचें शुद्ध क्षात्रतेज सभोंवार दाट पसरलेल्या यवनी मेघमंडळांतून पुढेंमागें प्रगट व्हावयाचें होतें; परंतु काळ फारच प्रतिकूल असल्यामुळें त्यांनां समशेर बाजूस ठेवून चरितार्थ चालविण्यासाठीं नांगराचा अंगीकार करावा लागला. देवराजजी राण्याच्या वंशजांनीं पुढें कांहीं गांवच्या पाटिलक्या खरेदी केल्या. त्यांत हिंगणी, बेरडी, देऊळ, व वेरूळ हे गांव भोंसले राजांच्या पाटीलकीचे ह्मणून प्रसिद्ध आहेत. या घराण्यांत बाबजी ऊर्फ शिवाजी राजे भोंसले यांचा जन्म झाला. मालोजी राजे व विठोजी राजे हे या बाबजी राजांचे पुत्र होत. मालोजी राजांचा जन्म इसवी सन १५५० या वर्षी झाला. पुढें तिसऱ्या वर्षी विठोजी राजे जन्मास आले.

या त्रोटक हकीगतीवरून शिंदखेडचे देशमुख मनसबदार लुकजी जाधवराव व भोंसल्याच्या घराण्यांतील प्रमुख पुरुष मालोजी राजे, यांच्या स्थितींत केवढें अंतर होतें, हें कळून येईल. एक निजामशाहींत थोर वजनदार सरदार, तर दुसरे थोर कुळांतले परंतु देऊळगांवचे नांगरे पाटील, अशी स्थिति जिजाबाईच्या जन्मकाळीं होती. परंतु जिजाबाईचा जन्मकाळ हा या भोंसले घराण्याच्या अभ्युदयाचा आरंभ

होऊन या भाग्यशाली स्त्रीच्या उदरीं या क्षात्रकुळाचा प्रतापरवि आपल्या संपूर्ण तेजानें प्रगट झाला.

दुष्ट दैवानें हातीं दिलेल्या नांगराचा मालोजी राजांस पुरा वीट आला. पाटिलकीच्या क्षुद्र कटकटींनां ते अगदीं त्रासून गेले. त्यांनां समजूं लागल्यापासून आपल्या घराण्याच्या स्थितीविषयीं त्यांनां एकसारखी तळमळ लागून राहिली होती. दुर्दैवानें पितृसमागमास मालोजी राजे लहानपणींच मुकले.अर्थात्, त्यांच्या सुशिक्षणपूर्वक संगोपनाचा सर्व भार त्यांच्या पुण्यशील मातु:श्रीवर पडला. प्रतिकूल परिस्थितींतहि तिनें धिमेपणानें वागून आपल्यावरील जोखीम शक्य तेवढ्या उत्तम प्रकारें पार पाडलें. दैवयोगानें त्या वेळीं प्रसिद्धीस आलेल्या वराण्यांशीं भोंसले राजांची सोयरीक जमून आली. फलटणचे देशमुख निंबाळकर यांच्या दीपाबाई नांवाच्या कन्येशीं मालोजी राजांचा विवाह झाला. हा विवाह झाल्यानंतर लौकरच त्यांनीं देऊळगांव सोडलें, व सर्व माणसांसह ते वेरूळास येऊन राहिले. नांगर सोडून देण्याचा त्यांचा पुरा निश्चय झाल्यामुळें ते कांहींतरी शिपाईगिरीचा रोजगार पाहूं लागले. निजामशाहींत जाधवरावांची चलती होती, तेव्हां त्यांच्या आश्रयानें आपल्या समशेरीचें तेज प्रगट करण्यास अवकाश मिळेल तर पहावा, ह्मणून ते बंधूसह जाधवरावांपाशीं गेले. जाधवरावांनीं या उभयतां बंधूंस मोठ्या आनंदानें आश्रय दिला, व प्रत्येकास पांच होन पगार देऊं करून शिवाय त्यांनीं आपल्या पंक्तीस भोजन करावें, असें ठरविलें.

मालोजी राजे प्रथम पायबारगीर म्हणून जाधवरावांच्या नोकरीस राहिले. ते शरीरानें मजबूत, व दुहेरी हाडाचे धिप्पाड पुरुष होते. जाधवरावांनीं प्रथम त्यांनां देवडीवर टेविलें, परंतु पुढें त्यांची बुद्धि,

हुषारी व शिपाईगिरी पाहून त्यांनीं बादशहापाशीं मालोजींची पुष्कळ तारीफ केली. त्यांची नेकी व उमदेपणा हीं बादशहासहि पसंत पडलीं. अर्थात्, जाधवरावांकडील पायबारगिरी जाऊन मालोजी-राजांस बादशहाच्या लष्करांत शिलेदारी मिळाली. वरचीं घोडीं व बारगीर लोक ठेवून मालोजी राजे बादशहाची नोकरी करूं लागले. तरी जाधवरावांचा पूर्व संबंध त्यांनीं कायम राखिला होता.

या बढतीमुळें मालोजी राजांचा संसार चांगला चालूं लागला. त्यांनीं आपला सर्व कबिला वेरूळाहून उठवून आपल्यापाशीं आणिला. शिवाय, त्यांचे बंधु विठोजी राजे यांनां किल्लेदारी मिळाली. याप्रमाणें पाटीलकी जाऊन सरदारीच्या वैभवाचा प्रकाश त्यांच्यावर पडूं लागला. पोटीं संतान नव्हतें, हीच काय ती एक गोष्ट कमी होती. तथापि विठोजी राजांस लागोपाठ आठ पुत्र झाले. पुत्रप्राप्तीसाठीं मालोजींनीं दानधर्म पुष्कळ केला. नवस पुष्कळ केले. अखेरीस नगरचा पीर शहाशरीफ त्यालाहि नवस केला. पुढें लौकरच इ० सन १५९४ या वर्षीं त्यांनां पहिला मुलगा झाला. त्याचें नांव त्यांनीं शहाजी ठेविलें. दुसरा मुलगाहि लौकरच झाला, त्याचें नांव शरीफजी असें ठेविलें. याप्रमाणें आपल्यावर अनुग्रह करणाऱ्या पीराचें स्मारक या दोन पुत्रांच्या नांवांनीं त्यांनीं आपल्या घराण्यांत चालू ठेविलें.

शहाजी राजे लहानपणीं अत्यंत हुषार व गुणी होते. त्यांची वाणी मधुर आणि वर्तन फार चांगलें असे. त्यांच्यावर जाधवरावांचा पराकाष्ठेचा लोभ जडला. बहुधा रोज त्यांनां जाधवराव आपल्या येथें आणीत. जाधवरावांची कन्या जिजाबाई ही शहाजी राजांपेक्षां दोन-अडीच वर्षांनीं लहान होती. राजे पांच वर्षांचे तर जिजाऊ सुमारें तीन वर्षांची असल्यामुळें जाधवरावांच्या घरीं या उभयतां मुलांचें मोठें

कौतुक होत असे. नाचणेंबागडणें, खेळ खेळणें वगैरे दोघांचीं बरोबरच होत असत. हीं दोन मुलें लहान असतां एक दिवस पुढील गोष्ट घडून आली. ती दिसण्यांत जरी विशेष महत्त्वाची नाहीं, तरी तिच्या योगानें या दोन घराण्यांचा पुढें निकट संबंध जुळून उभयतांच्या स्थितीवर मोठे महत्वाचे परिणाम घडून आले. अर्थात् , महाराष्ट्राच्या इतिहासांत या गोष्टीस विशेष प्रसिद्धि प्राप्त झालेली आहे.

एकदां शिमग्याच्या सणांत जाधवरावांनीं रंगपंचमीचा समारंभ केला. त्या समारंभास पुष्कळ प्रमुख गृहस्थांना आमंत्रण केलें होतें. मालोजी राजे व विठोजी राजे यांनांहि आमंत्रण होतें. पित्याबरोबर शहाजी राजेहि समारंभास हजर होते. शहाजी येतांच जाधवरावांनीं त्यांनां हांक मारिली, व नित्याप्रमाणें राजे धांवत जाऊन जाधवरावांच्या मांडीवर बसले. इतक्यांत जिजाऊहि घरांतून दुडदुड धावत येऊन जाधवरावांच्या दुसऱ्या मांडीवर बसली. हीं दोन बहुतेक सारख्या वयाचीं सुंदर मुलें पाहून जमलेल्या मंडळीस फार आनंद झाला. " मुली, हा तुला नवरा पाहिजे काय ? खरोखर हा जोडा योग्य दिसतो ! " असें जाधवराव लाडुकपणानें ह्मणाले. इतक्यांत त्या उभयतां मुलांनीं जवळ असलेल्या तबकांतील रंग व गुलाल एकमेकांच्या अंगावर यथेच्छ उधळला. हा त्यांचा बालवयास अनुरूप असा गमतीचा खेळ पाहून जमलेल्या मंडळीस फारच कौतुक वाटलें व " जोडा योग्य आहे," असें सर्वजण ह्मणूं लागले. इतक्यांत मालोजी राजे व विठोजी राजे उठून उभे राहून जमलेल्या गृहस्थांस उद्देशून मोठ्यानें ह्मणाले " ऐका हो ! जाधवराव आजपासून आमचे व्याही झाले, व जिजाऊ आमची सून झाली. ते आतां काय बोलले तें आपण सर्वांनीं ऐकलेंच आहे. आतां हा निश्चय बदलणार नाहीं. थोर लोक सभेंत

बोलल्यावर मागें सरणार नाहींत ! " असें ह्मणून तेथें हजर असलेल्या सर्वांनां त्यांनीं साक्षी ठेविलें व ते खालीं बसले.

सहज ओघानें तोंडांतून गेलेल्या शब्दांचा परिणाम येथवर आलेला पाहून जाधवरावांस मोठा विस्मय वाटला, मालोजी राजे व विठोजी राजे या उभयतांचें भाषण• ऐकून ते उगीच राहिले. दुसरे दिवशीं त्यांनीं आपल्या सर्व आप्त मंडळीस भोजनाचें आमंत्रण दिलें. उभय भोसले बंधूसहि आमंत्रण पाठविलें. " आह्मी तुह्मी व्याही झालों. आतां तुमच्याबरोबर भोजन लग्नसमारंभाच्या वेळीं होईल. मध्यंतरीं आम्हाला बोलावूं नये ! " असा निरोप मालोजी राजांनीं जाधवरावांस पाठविला. ही हकीगत जाधवरावांची स्त्री ह्माळसाबाई हिला कळली व मालोजी राजांचा हा उद्दामपणाचा निरोप ऐकून तिला अतिशय राग आला. आपल्या बरोबरीचीं निंबाळकर, शिर्के, महाडिक वगैरे घराणीं सोडून आपल्याच पदरच्या यःकश्चित् बारगिराच्या मुलास आपली मुलगी देणं म्हाळसाबाईला मुळींच पसंत पडलें नाहीं. जाधवरावांनीं मालोजींचा समज घालण्याचा प्रयत्न केला; परंतु " इतक्या लोकांसमक्ष आपण बोललां तें अप्रमाण कसें होईल ? आम्हांला आपल्याशीं सोयरीक अवश्य कर्तव्य आहे." असें त्यांनीं निक्षून सांगितलें. हा उद्धटपणा जाधवरावांस सहन न होऊन त्यांनीं कारकुनाकडून त्यांचा हिशेब चुकता करून दिला व त्या उभय बंधूंस नोकरींतून काढून टाकिलें. अर्थात्, मुलांमाणसांसकट तेथून मालोजी राजांस निघावें लागून पुनः ' येरे माझ्या मागल्या ' असें झालें, व त्या सर्वांस वेरूळास परत जावें लागलें. थोडे दिवस नांगर चुकला होता, तो पुनः परत हातीं आला !

मालोजी राजांनीं जाधवरावांसमक्ष प्रतिज्ञा केली होती, कीं, "जिजा शहाजीस नवरी करीन, तरच नांवाचा मालोजी भोसला ! आह्मी